वीणा-प्रकाशन—७

# पांढरे ढग

वि. स. खांडेकर



१ जुलै १९३९

किं. २ रु

माझे आवडते कवि

कै. केशवसुत

व

भा. रा. तांबे

यांस



१

# पर्वतीच्या पायऱ्या

टक्—टक्—टक्—

आक्काचा डोळा लागला होता. पण तो आवाज तिला चटकन् ऐकूं गेला. कदाचित् तिच्या स्वप्नांतही दारावर कुणीतरी टकटक करीत असेल!

ती झटकन् चटईवरून उठली. उशीदाखल तिनें मानेखालीं घेतलेला उजवा हात जरासा अवघडला होता. तिनें तो खालींवर केला. सहज तिची नजर आपल्या दंडाकडे गेली. चटईची नाजुक वीण त्याच्यावर उठली होती. जणुं कांहीं ऊन लाखेंत उठविलेलीं अक्षरेंच!

चटईवरल्या मोराकडे पाहून ती हंसली. त्या हंसण्यामागें दोन गोड आठवणी होत्या.

दुपारीं जेवण झाल्यावर आक्का जमिनीवरच झोंपते हें उन्हाळयांत जेव्हां अभयच्या लक्षांत आलें, तेव्हां तो म्हणाला होता 'सतरंजी घेत जा कीं!'

'कशाला?' आपण उत्तर दिलें होतें. उन्हाळयांत जमिनीवर पडलं म्हणजे कसं गार वाटतं!'

'धरणीला आई म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं !' त्यानें हंसत हंसत उत्तर दिलें होतें. पण स्वारी त्याच दिवशीं संध्याकाळीं बाजारांतून दोन लव्हाळ्यांच्या चटया घेऊन आली. त्यानें हातांत दिलेली चटई आपण उलगडली आणि एकदम त्याला म्हटलें 'हें काय रे बाबा ?'

'काय ?'

'वाघाची चटई कशाला दिलीस मला ?'

ती चटई आपल्या हातून परत घेत अभयनें उत्तर दिलं 'चुकून अदलाबदल झाली बघ !'

त्यानें दिलेली दुसरी चटई आपण उलगडून पाहिली. तिच्यावर मोराचें चित्र होतें.

दाराकडे जातां जातां ही आठवण वाऱ्याच्या झुळुकेप्रमाणें आक्काच्या मनांत येऊन गेली.

तिनें उत्सुकतेनें दार उघडलें. अभय पास झाल्याची तार आली असावी अशी तिची कल्पना होती.

बाहेर पोस्टाचा शिपाई उभा होता खरा ! पण त्याच्या हातांत तार नव्हती. कुठल्यातरी मासिकाचा एक जाड अंक होता. अभयनें दाराबाहेर लावलेल्या पत्राच्या पेटींत तें धूड कांहीं केल्या जाईना. तेव्हां नाइलाज होऊन पोस्टमननें दार ठोठावलें होतें.

तो अंक घेऊन आक्का आंत आली. तिला वाटलें—असेल कुठल्यातरी मासिकाचा दिवाळीचा खास अंक ! वरातीमागून येणाऱ्या घोड्यासारखा आतां निघालाय् !

तिनें तो अभयच्या टेबलावर टाकला. ती पुन्हां येऊन चटईवर आडवी झाली.

पण आतां कांहीं केल्या तिचे डोळे मिटेनात.

बंद खिडक्यांतून सुद्धां बाहेर रखरखीत ऊन पडलें आहे याची कल्पना येत होती. मधूनच दोन पांखरांचा कर्कश आवाज ऐकूं येई. तीं आपआपसांत भांडत असावींत असा आक्काला भास झाला. रस्त्यानें एक फेरीवाला कर्कश स्वरानें

ओरडत गेला. अगदीं बेबीच्या देठापासून ओरडत होता तो. पण कुठल्याही घरांतून 'ए फेरीवाला' अशी हांक कांहीं कुणी मारली नाहीं.

आक्का झोंपली होती तिथून अभयचें टेबल दिसत होतें. आक्काचें लक्ष मघाच्या त्या मासिकाकडे गेलें. तें घेऊन वाचत पडलें तर वेळ जाईल असें तिच्या मनांत आलें. ती उठून टेबलाकडे गेली. पण मासिक हातांत घ्यायच्या आधींच तिची दृष्टि टेबलाच्या मागच्या भिंतीवर लावलेल्या एका फोटोकडे गेली. गांधी, जवाहिरलाल, सुभाषबाबू, रॉय इत्यादिकांच्या फोटोंमध्यें लावलेला तो वडिलांचा फोटो पाहून तिला आनंद झाला.

तिला वाटलें—अभयचें आपल्या माणसांवरलें प्रेम किती उत्कट आहे! तो लहान असतांनाच आपले वडील वारले. साधे मराठी शाळामास्तर होते ते! अभय मॅट्रिक झाला तेव्हां आपल्या वडिलांना कोणत्या कारणानें मरण आलें याची अंधुक कल्पना त्याला आली! त्यानें जंगजंग पछाडून कुठल्याश्या बक्षिस-समारंभांतला त्यांचा एक लहान फोटो मिळविला, तो मोठा करून घेतला आणि आपल्या अभ्यासाच्या जागीं लावला.

आक्कानें अभिमानानें त्या फोटोकडे पाहिलें, पण पाहतां पाहतां तिच्या मनावरून भीतीची छाया झर्रकन् नाचून गेली. अंधारांत पायांत कांहींतरी विळ-विळलें म्हणजे माणसाच्या मनाची जी स्थिति होते, तसेंच कांहींतरी तिला वाटलें.

ती जसजशी टक लावून त्या फोटोकडे पाहूं लागली, तसतशी तिची भीति वाढूं लागली.

तिचें मन म्हणत होतें—अभयचे डोळे हल्लीं दादांच्यासारखे कां बरें दिस-तात? अभय मातृमुखी आहे असें सारीं माणसें म्हणत असत. आपणही तेंच खरें मानीत आलों.

पण त्याचे डोळे–दादांचे डोळे–ती काळरात्र–छेः!

कांहींतरी चाळा करायचा म्हणून तिनें खिडकी उघडली. वाऱ्याची रखरखीत झळ आंत आली.

खिडकी बंद करून ती खुर्चीवर बसली.

हाताला चिकटलेला फणसाचा डिंक चोळून काढायला लागलें कीं जसा अधिकच चिकटून बसतो, तसा मघांचा तो विचार तिच्या मनांत अधिक गुंतागुंत निर्माण करीत होता.

अभय इंटरला पहिल्या वर्गांत आला. सांगलीसारख्या ठिकाणीं त्याचें पुढलें शिक्षण झालें नसतें असें नाहीं ! पण बी. ए. झाल्यावर वकिलीच्या अभ्यासाला पुण्याला जायचें त्यापेक्षां आतांच तिथें गेलेलें बरें असें त्याला वाटूं लागलें. पुण्याला अभ्यास झाला तर अभय बी. ए. लाही पहिल्या वर्गांत येईल या आशेनें आपण तें कबूल केलें. पुण्याला आपल्या ओळखीचे कुणी डॉक्टर नाहींत, तिथें डॉक्टरिणी आणि नर्स यांना तोटाही नाहीं, त्यामुळें तिथें आपल्या धंद्याचा सांगलीसारखा जम बसणार नाहीं, या गोष्टी उघड उघड दिसत असतांनाही आपण पुण्याला आलों.

पुण्याची हवा आपल्याला मुळींच मानवली नाहीं. पण अभय बी. ए. होईपर्यंत आपण काम करीतच होतों. तो पहिल्या वर्गांत बी. ए. झाला असता तर अंगांत ताप असतांनासुद्धां रात्रीं अपरात्रीं बाळंतिणीजवळ बसून केलेल्या आपल्या जागरणांचें चीज झालें असतें. पण अभय दुसऱ्या वर्गांत आला. आपला हातखंडा असलेला गणित विषय सोडून त्यानें मधेंच इतिहास आणि अर्थशास्त्र हा विषय घेतला. त्याचा परिणाम व्हायचा तोच झाला !

बी. ए. होऊन शिकवण्या करीत त्यानें एल. एल. बी.ची पहिली परीक्षा दिली. पण गेल्या जूनमध्यें दुसऱ्या परिक्षेंत मात्र तो नापास झाला.

तो नापास झाला ती रात्र आपण अगदीं रडून घालविली. पण तो खुशाल झोंपला होता. दुसरे दिवशीं सकाळीं तो आपल्याला ह्मणाला—' आका, अगदीं वेडी आहेस तूं ! '

आपण त्याच्याकडे पाहिलें. त्याचे डोळे थेट फोटोंतल्या दादांच्यासारखे दिसत होते.

तो पुढें ह्मणाला ' पास झाल्यावर पेढे वाटण्याचे दिवस कधींच संपले आका ! आतां खरा आनंद नापास होण्यांतच आहे ! पास झालेल्याला पुढं काय करावं हेंच कळत नाहीं ! नापास झालेला ह्मणत असतो–ठीक आहे. पुन्हा परिक्षेला तर बसूं या ! '

या आठवणीनें आज अभयच्या परीक्षेचा निकाल आहे ही आक्कांची हुरहुर पुन्हां जागृत झाली.

आज तरी अभय पास होईल कां ? मराठी शाळामास्तराचा मुलगा वकील झाला, हें पहायला मिळण्याइतकें तरी आपलें भाग्य असेल कां ? इंटरमधें तो पहिल्या वर्गांत आला, तेव्हां आपण किती मनोराज्यें केलीं होतीं ! अभय असाच एल्. एल्. बी. तही पहिल्या वर्गांत येईल, तीन वर्षे वकिली करून तो सबजज्ज होईल, सबजज्ज झाल्यावर मग—

मनुष्याला सुखस्वप्नें पडतात पुष्कळ. पण त्यांतलीं फारच थोडीं खरीं व्हायचीं असतात ! अभय बी. ए. ला दुसऱ्या वर्गांत आला. एल्. एल्. बी ची पहिली परीक्षा तो पहिल्याच खेपेला पास झाला खरा. पण तीही दुसऱ्या वर्गांतच ! दुसऱ्या एल्. एल्. बीला तर तो नापासच झाला.

अभय आयुष्यांत पहिल्यांदा नापास झाला तो गेल्या जूनमधें. सहा महिने होत आले तरी आक्काच्या मनाची ती जखम अजून बुजली नव्हती. अभय नापास झाला त्या रात्रीं अनेकदां मनाचें समाधान करण्याकरतां ती स्वतःशीच म्हणाली होती ' आपल्या धंद्यांत सुद्धां हाच अनुभव येत नाहीं कां ? पहिलटकरीणच अडते असें नाहीं कांहीं ! चांगली चार मुलं झालेल्या बायकांना सुद्धां एकादं बाळंतपण जड जातं. झाला असेल अभय नापास ! त्यांत काय आहे एवढं मोठं ? '

क्षणभर तिला हें खरें वाटे. पण दुसऱ्याच क्षणीं तिच्या मनांत नाहीं नाहीं त्या कल्पनांची वावटळ उठे. गेल्या सहा महिन्यांत अशा किती तरी शंका तिच्या मनांत येऊन गेल्या होत्या.

अभयचें अभ्यासावरलें लक्ष उडालें कीं काय ?

अभ्यासांत लक्ष लागूं नये असें व्हायला त्याच्या भोंवतीं कांहींच विलक्षण घडलें नव्हतें. प्रकृति बरी नसून सुद्धां आपण नर्सचा धंदा कांहीं सोडला नव्हता ! जूनमधें नापास झाल्यावर तो मास्तर झाला, त्यानें विश्रांति घ्यायचा अगदीं आग्रहच केला, तेव्हां कुठें आपण काम करायचें सोडून दिलें.

अभय कसल्या मोहांत तर पडला नाहीं ना ?

तो आपल्याशीं पूर्वीसारखा खूपखूप बोलत नाहीं, कविता करून त्या वाचून दाखवीत नाहीं—

आक्का स्वतःलाच हंसली. जणुं कांहीं ती आपल्या मनाला म्हणत होती. अभय लहानपणींसारखा लपंडाव खेळत नाहीं. नि झोंपतांना गाणं म्हण म्हणून मागं लागत नाहीं या तक्रारी सुद्धां तूं करायला लागशील आतां! वेड्या, अभय कांहीं कुक्कुबाळ नाहीं आतां! उद्यां त्याचं लग्न होईल—'

लग्नाची कल्पना मनांत येतांच आक्काला मालेची आठवण झाली. पुण्यांत आल्यावर लवकरच बाळंतपणाच्या निमित्तानें तिच्या आईची नि आपली ओळख झाली. माला मॅट्रिकच्या वर्गांत होती तेव्हां. तिचें इंग्रजी चांगलें नव्हतें, गणित तर फारच कच्चें होतें. अभय गणित घेऊन इंटरला पहिल्या वर्गांत आला आहे हें कळल्याबरोबर दत्तोपंत्तांनीं मालेची शिकवणी त्यालाच दिली. आज तीन साडेतीन वर्षं तरी अभय तिला शिकवितोय्. अभय नापास झाला त्याच्या मुळाशीं ही शिकवणी तर नसेल ना?

माला मोठी गोड मुलगी आहे. शंभर सुंदर मुलींत उठून दिसेल ती! अभयचें तिच्यावर प्रेम बसलें असावें! आपलें प्रेम सफल होणार नाहीं या कल्पनेनें तर त्याचें अभ्यासावरलें लक्ष उडालें नसेल?

ही कल्पना आक्काच्या मनांत गेल्या चार पांच महिन्यांत अनेकदां येऊन गेली होती. पण रस्त्यानें जातां जातां मनुष्यानें एकाद्या नव्या बंगल्याकडे जसें नुसत्या कुतूहलानें पहावें, तसें तिनें या कल्पनेकडे पाहिलें होतें.

आज अभय दुसऱ्यांदा नापास होण्याचा संभव तिच्या मनांत बोचत होता. त्यामुळेंच कीं काय ती सूक्ष्म दृष्टीनें या कल्पनेकडे पाहूं लागली. रहायला जायचें असलें म्हणजे मनुष्य एखाद्या घराचा आंतला भाग सुद्धां जसा निरखून पाहतो, त्याप्रमाणें ती या कल्पनेचा विचार करूं लागली.

माला खूप सुरूप आहे हें खरें! पण दत्तोपंत देशपांडे कांहीं श्रीमंत नाहींत. सतरा अठरा वर्षांपूर्वी वकिली सोडून असहकारितेच्या चळवळींत पडलेल्या माणसा पाशीं पैसा कोठून असणार? त्यांचे भाऊ कुठें पोलिस-सुपरिंटेंडंट आहेत. पैसे पाठवितात म्हणून बिचाऱ्याचा संसार तरी चार चौघांसारखा चालतो

आणि दैव काय कमी खट्याळ आहे ? अगदीं मोकळ्या मुठीनें त्याला मुली देतंय् तें !

आक्काला मालेला चवथी बहीण झाली तो प्रसंग आठवला.

बाळंतिणीनें उत्सुकतेनें विचारलें,

' मूल बरं आहे ना ? '

आपण होय म्हणून सांगितलें.

' मुलगा कीं—'

पुढें ती बोलूं शकली नाहीं. पण मुलगी हा शब्द आपल्या तोंडून ऐकतांच तिनें आपले डोळे मिटून घेतले.

क्षणभर आपल्याला तिचा राग आला. पण दुसऱ्याच क्षणीं आपल्या मनांत आलें—ही पांचवी मुलगी. इतकीं मुलें होऊन आपल्याला मुलगा असूं नये याचें त्या आईला वाईट वाटलें यांत अस्वाभाविक असें काय आहे ? मुलीचा मुका कांहीं मुलाच्या पाप्यापेक्षां कमी गोड असत नाहीं. पण—

मनुष्य नुसत्या प्रेमावर जगूं शकत नाहीं ! मुलगा ही आईबापांची म्हातारपणींची काठी ! मुलाप्रमाणें मुलीला कुठें आपल्या आईबापांच्या उपयोगी पडतां येतें ?

आक्काच्या मनांत अभिमानाची एक लाट उसळली. सामान्य मुलीला जें करतां येत नाहीं तें आपण करूं शकलों.

आपले वडील लहानपणींच वारले. गरीबाचा संसार म्हणजे एकखांबी तंबू. तो खांबच असा अकस्मात् कोसळून पडला. दोन वर्षें अर्धांगवायूनें अंथरुणांत खितपत पडून दादा अभयला, आपल्याला आणि आईला सोडून गेले.

घरांतलें किडून भिक्षुक दादांच्या दुखण्यापायीं कधींच बाहेरची वाट चालूं लागलें होतें. पण आपण आईला धीर दिला. मुंबईला आईचे दूरचे मामा होते. त्यांच्याकडे राहून, उणीदुणीं सोसून आपण नर्सिंगचा अभ्यासक्रम पुरा केला. आपण नर्स झालों नसतों तर—

तर अभय आज कुठल्यातरी खेड्यांत मराठी शाळामास्तर होऊन बसला असता. आज तो पास होईल–उद्यां वकील होईल—खूप पैसा मिळवील–आपल्याला मालेसारखी वहिनी मिळेल–हें सारें पहायला आई हवी होती.

आईची आठवण होतांच आक्काचें मन गंहिवरून आलें. पापण्यांच्या कडा ओल्या झाल्या. लक्ष दुसरीकडे जावें म्हणून मघांशी टेबलावर टाकलेला अंक तिनें उचलला.

हाताला येईल तें पान तिनें उघडलें.

'दोन मेघ.'

कविता असावी असें वाटून ती तें पान उलटणार होती. पण ती कविता नाहीं असें तिला दिसलें.

तिनें लेखकाचें नांव पाहिलें

**कु. कल्पलता.**

नांव मोठ्या गमतीचें वाटलें तिला. ती वाचूं लागली—

दोघेही लगबगीनें जात होते. धक्का लागताच त्यांनीं एकमेकांकडे पाहिलें.

दोन ढग होते ते !

पांढरा ढग वरवर जात होता; काळा खालीं खालीं येत होता.

पांढऱ्या ढगानें काळया ढगाकडे तुच्छतेनें पाहिलें. क्षणभर थांबून तो उद्गारला 'कुठं निघालास ?'

'पृथ्वीवर. तूं कुठं चाललास ?'

'स्वर्गांत !'

पांढरा ढग उड्डाण करणाऱ्या विमानाप्रमाणें वरवर जाऊं लागला.

काळा ढग मोडलेल्या विमानाप्रमाणें भरभर खालीं येऊं लागला.

पांढऱ्या ढगाने अभिमानानें मागें वळून पाहिलें.

किती सुंदर दिसत होता तो काळा ढग! त्याच्यांतून लखकन् चमकणारी ती वीज—

दिव्यत्वाचा साक्षात्कार होता तो! पांढऱ्या ढगानें स्वतःकडे निराशेनें पाहिलें. विजेचा पुसट चमकारा सुद्धां तिथें दिसत नव्हता.

त्यानें उत्सुकतेनें वर पाहिलें. लवकरच आपला स्वर्गांत प्रवेश होणार या आनंदांत त्याला काळया ढगांतल्या त्या दिव्य तेजाचा विसर पडला.

थोड्या वेळानें त्यानें वळून खालीं पाहिलें.

काळा ढग कुठेंच दिसत नव्हता. मात्र धरणी स्नान-मंदिरांतून बाहेर पडणाऱ्या तरूणीसारखी दिसत होती, वृक्षलता गुदगुल्या झालेल्या बालकांप्रमाणें हंसत होत्या आणि पांखरें झाडा-वर बसून आपलीं अंगें झाडीत होतीं.

पांढरा ढग स्वर्गाच्या दारांत जाऊन पोंचला. आपल्याला आंत सहज प्रवेश मिळेल अशी त्याची कल्पना होती.

पण दारावरला रक्षक त्याला आंत जाऊं देईना. तो सांगूं लागला 'आंत एकच जागा रिकामी होती. पण ती नुक्तीच भरली!'

आपल्या मागून येणारे पुष्कळ पांढुरके ढग या पांढऱ्या ढगानें पाहिले होते. तो आठवूं लागला. छेः! आपल्यापुढें कुणीच नव्हतें!

पांढरा ढग भांबावून गेला. त्यानें विचारलें

'कुणाला मिळाली ती स्वर्गातली जागा?'

‘ एका काळ्या ढगाला ! ’ रक्षक उत्तरला.

‘ काळ्या ढगाला ? ’

‘ हो. तापून गेलेल्या पृथ्वीला शांत करण्याकरितां त्यानं आपलं जीवन—सर्वस्व दिलं ! ’ आकाशवाणी झाली.

या गोष्टींत कांहीं तरी गूढ अर्थ आहे असें आक्काला वाटलें. पण त्या गूढतेबरोबर तिच्यांत रम्यताहि होती यांत शंका नव्हती.

ती स्वतःशीच हंसून म्हणाली ‘ आयुष्यही असंच आहे, नाहीं कां ? तें गूढ आहे म्हणूनच रम्य आहे ! ’

झोंपाळ्यावर बसून ती विचार करूं लागली.

ही कल्पलता कोण बरें असावी ?

एकादा पुरुषच बाईचें नांव घेऊन लिहीत नसेल ना ? विभावरी शिरूरकर प्रकरण मधें किती रंगलें होतें ! ही कल्पलता त्या विभावरी सारखीच असेल कुणीतरी !

इतक्यांत पलीकडच्या बिऱ्हाडांतून रडें ऐकूं येऊं लागलें. आक्का चटकन् उठली आणि पुढलें दार उघडून तिनें हांक मारली ‘ चारु, अरे चारु— ’

रडणें अधिकच मोठ्यानें ऐकूं येऊं लागलें.

आक्कानें पुढें जाऊन त्या दुसऱ्या बिऱ्हाडाचें दार अर्धवट उघडलें.

तिला शब्द ऐकूं आले ‘ अवलक्षणी कारटं कुठलं ! म्हणे मोटार हवी मला ! देऊं कां आणखी एक रट्टा ? ’

आक्का हळूच आंत गेली. एका चार वर्षांच्या रडून रडून तांबडा लाल झालेल्या मुलाला तिनें चटकन् उचललें आणि रट्टा देण्याच्या पवित्र्यांत उभ्या असलेल्या त्याच्या आईकडे न पाहतांच ती परत आपल्या खोलींत आली.

मुसमुसणाऱ्या चारूला पोटाशीं धरून ती म्हणाली ‘ चारुचंद्र म्हनून एक शाना मुलगा आहे ! ’

हातानें नाक पुशीत चारुचंद्रानें उत्तर दिलें ‘ आई म्हनते तो वेडा आहे ! ’

‘ मग चालू काय म्हनतों ? ’

‘ मी नाच्चायला लादतों ! ’

आक्कानें आश्चर्यानें चारूकडे पाहिलें.

कुणी वेडें म्हटल्याबद्दल या चिमुरड्याला इतका आनंद कां व्हावा ? चारू सांगत होता ‘ आज्योबा—नि अभय दादा बोलायला लागले किनई म्हनजे आज्योबा दादाला म्हनतात—तूं वेडा आहेस. मला दादा व्हायचंय् आक्का ! म्हनून किनई—”

अभयला चारुचंद्राचे आजोबा वेडे म्हणतात काय ?

आक्कानें मानेनेंच त्यांच्या या विधानाचा निषेध केला. आजोबांना टिळकांचा फार अभिमान ! टिळक–आगरकरांच्या बरोबर कोल्हापूर–प्रकरणांत ते होते म्हणे ! त्यांना अभयसारख्या आजच्या तरुणाचीं मतें कशीं पटायचीं ? आणि ज्याला जें पटत नाहीं तें त्याला वेडेपणाचेंच वाटतें !

चारुचंद्रानें झोंपाळ्यावरून उडी मारून टेबलावरला अंक उचलला, आंत कुत्र्यामांजरांचीं चित्रें नाहींत म्हणून तो फेंकून दिला, आक्काकडे चहाची मागणी केली आणि तो वसूल होतांच स्वारी समोरच्या कलेशीं खेळण्याकरितां निघूनही गेली.

त्याच्या नाचऱ्या पाठमोऱ्या आकृतीकडे पाहतां पाहतां आक्काला अभयची आठवण झाली. अभयही लहानपणीं असाच अवखळ होता, असाच थोडासा बोबडा बोले ! पण त्यावेळीं तो आपल्याला कसा चिकटून असे ! हल्लींचा अभय–

नवीं नवीं कलमें केल्यावांचून पुरुषाच्या जीवनवृक्षाचा विकास होतच नाहीं कां ?

तिनें स्वयंपाकघरांतल्या कोंपऱ्यांत ठेवलेल्या घड्याळाकडे पाहिलें. साडे-पांच वाजून गेले होते !

अजून अभयचा पत्ता नव्हता !

आक्कानें खिडकी उघडून खूप दूर—अगदीं कोंपऱ्यापर्यंत पाहिलें. अभय कुठेंच दिसत नव्हता.

‘ आज रजा घेतलीय् मी ’ असें सांगून तो दुपारीं गेला. तो पोस्टांत जाईल आणि पास झाल्याची तार येतांच धांवत घरीं येईल अशी आपली कल्पना होती.

पण तो अजून आला नाहीं ! याचा अर्थ ?

तो पुन्हां नापास झाला असेल ? कीं—

बाहेरच्या उतरत्या उन्हांत वृद्ध मनुष्याच्या दृष्टींतला उदासपणा दिसत होता. रस्त्यावर फिरायला चाललेलें एक जोडपें आक्काला दिसलें. त्यांतल्या तरुणीनें सहज मान वळवून पाहिलें. आपला काळेपणा लपविण्याकरतां तिनें तोंडाला खूप पॉवडर फांसली आहे हें आक्काच्या चटकन् लक्षांत आलें. समोरच्या घरांत ‘ प्रीतिविण वेडापिसा ’ हें गाणें लावलें होतें. त्यांतले ‘ वेडापिसा वेडापिसा ’ हे निरनिराळ्या रीतीनें आळविलेले शब्द आक्काच्या कानांना कसेसेच वाटले.

तिला वाटलें—अभय केव्हां येईल याचा काय नेम आहे ? तोंपर्यंत त्याच्या निकालाची काळजी करीत बसायचें ? त्यापेक्षां पर्वतीला जाऊन यावें, तितकाच वेळ मन दुसऱ्या गोष्टींत रमेल !

× × ×

वाटेच्या बाजूला असलेल्या चिंचांच्या झाडाखालीं दोन तीन मुलें चिंचांचीं बोटकें पाडून तीं मोठ्या आवडीनें खात होतीं आणि आंबट चेहरे करून मिटक्या मारीत होती, तें पाहून आक्काला हंसू आल्यावांचून राहिलें नाहीं. तिला वाटलें संसारांतलीं सुखें अशीच आहेत.

पर्वतीच्या पायथ्याशीं थोडासा विसावा घेण्याकरितां ती उभी राहिली. आज आपल्याला अगदीं गळल्यासारखें कां वाटतेंय् हें तिला कळेना.

निम्म्या पायऱ्या चढून गेल्यावर तिला बसावेंच लागलें.

तिच्या मागून चार पांच मुलांचें एक टोळकें येत होतें. वानराप्रमाणें उड्या मारीत येत होतीं तीं सारीं !

थोडा विसावा घेऊन ती पुन्हा चढूं लागली. वर गेल्यावर देवदर्शन घेऊन ती तटाच्या बाजूला गेली.

रागावलेल्या आईनें राग शांत झाल्यावर मुलाला पोटाशीं धरून त्याचे पटापट मुके घ्यावेत, त्याप्रमाणें वायुलहरींचें आतांचें वागणें वाटत होतें. संध्याकाळच्या त्या किंचित् पिंवळसर उन्हांत पुण्याचा विविध विस्तार मोठा मौजेचा दिसत होता.

आक्का डोळे भरून तो पाहूं लागली. तिच्या मनांत आलें—अभय यावेळीं कुठें बरें असेल ?

पलीकडे मघाच्या त्या मुलांत पर्वतीला पायऱ्या किती आहेत याबद्दल कडाक्याचा वाद सुरू झाला होता. वादाचा शेवट पैजेंत होणार असें दिसूं लागलें. आक्काच्या कानांवर मधेंच एक वाक्य पडलें ‘ मी सांगू किती पायऱ्या आहेत त्या ? फार थोड्या आहेत. स्वर्गापर्यंत जाणाऱ्या पायऱ्या हव्या होत्या म्हणजे—’

आक्कानें विस्मयानें वळून त्या बोलणाऱ्या मुलाकडे पाहिलें.

फार तर अकरा बारा वर्षांचा असेल तो ! पण उजव्या हाताची मूठ पुढें धरून तो मोठ्या ऐटीनें आणि वीरश्रीनें बोलत होता.

आक्काच्या डोळयांपुढें अभय उभा राहिला ! बोलण्याच्या रंगांत आल्यावर त्यालाहि उजव्या हाताची मूठ अशीच पुढें धरून नाचविण्याची संवय होती.

## २

# नेलि कोणी झाँप काळा ?

घर जवळ येईपर्यंत आक्काच्या मनांत त्या मुलाचे शद्ब राहून राहून घुमत होते—

' स्वर्गापर्यंत जाणाऱ्या पायऱ्या हव्या होत्या. म्हणजे—'

म्हणजे काय करणार होता तो ?

त्याचे पुढचे शद्ब तिला ऐकूं आले नव्हते. पण तो पुढें काय बोलला असावा याची ती पुनः पुन्हा कल्पना करीत होती. स्वर्गापर्यंत जाणाऱ्या पायऱ्या असत्या तर हा मुलगा भरभर त्या चढून गेला असता ! नाहीं कां ?

पुढें ?

स्वर्गाचें दार बंद आहे म्हणून तो परत आला असता ? छेः ! असलीं मुलें फार अवखळ असतात ! अभय लहानपणीं असेंच कांहींतरी विचित्र बोलत असे !

या मुलानें स्वर्गाचे दार जोरानें ठोठावलें असतें.

मग काय झालें असतें ?

तिच्या कल्पनेचे पंख इथेंच गळून पडले.

स्वतःच्या या स्वैर विचारांचें तिचें तिलाच हंसूं आलें.

कवितेंत कांहींतरी विलक्षण कल्पना असतात ना? त्या मुलाचें बोलणेंही तसेंच होतें कीं!

तें मनांत घोळवून फुलवत बसणें म्हणजे वेडेपणा नाहीं कां?

आज आपल्या मनाला असें झालें आहे तरी काय? हं हं! मघांशी 'दोन ढग' म्हणून त्या कल्पलतेची गोष्ट वाचली ना आपण? ती आपल्याला आवडली नि तिच्यासारखी आपल्यालाही कल्पना करतां येते कीं काय हें आपण पहायला लागलों. इतक्यांत त्या मुलाचें तें विचित्र वाक्य आपल्या कानांवर पडलें—

तो धागा मिळाला.

मग काय? मनुष्य सुतानें स्वर्गाला जातो तो असा.

कोंपऱ्यावरून आपल्या बिऱ्हाडाकडे वळतां वळतां हे सारे विचार आक्काच्या मनांतून भुर्रकन् उडून गेले.

तिच्या डोळ्यांपुढें दुसरेंच चित्र उभें राहिलें.

अभय घरीं येऊन आपली वाट पाहत बसला असेल. पास झाल्याची बातमी कळतांच तो धांवत घरीं आला असेल! आपण घरीं नाहीं असें पाहून—

तिला वाटलें—आपण पर्वतीला जायला नको होतें. तार कोणत्यावेळीं येईल याचा कांहीं नेम आहे कां?

ती लगबगीनें चालूं लागली. आपली घाई पाहून रस्त्यानें जाणारे दोन म्हातारे आपल्याकडे टकमक पाहत आहेत हें तिच्या लक्षांत आलें.

क्षणभर तिचें पाऊल मंदावलें. पण दुसऱ्याच क्षणीं ती झपझप चालूं लागली.

घर अगदीं जवळ आलें. बाहेरूनच अभय म्हणून मोठ्यानें हांक मारावी असें तिला वाटलें.

इतक्यांत समोरच्या घरीं बसायला गेलेली चारूची आई परत येत असलेली तिला दिसली.

ती मुकाट्यानें आंत गेली. तिनें उत्सुकतेनें दाराकडे पाहिलें. दाराला लावलेलें कुलूप जसेंच्या तसें होतें.

× × × ×

कुलूप उघडतां उघडतां अभय घरीं येऊन थोडा वेळ आपली वाट पाहून कुणातरी मित्राकडे—बहुधा मालेकडे-गेला असेल अशी कल्पना तिच्या मनांत येऊन गेली. कुलूप घाई घाईनें टेबलावर ठेवून तिनें मोठ्या आशेनें इकडे तिकडे पाहिलें. अभयची चिट्ठी कुठेंच नव्हती. मघाचा मासिकाचा अंक तेवढा तिथें पडला होता.

ती खिडकीपाशीं जाऊन उभी राहिली. कोपऱ्यापर्यंत दिसणारीं माणसें तीं न्याहाळीत होती. पण अभयचा भास सुद्धां तिला कोठें झाला नाहीं.

हळुहळु अंधार पडूं लागला. समोरच्या बंगल्यांतले दिवे लागले. चार पांच छोटीं मुलें हातांत क्रिकेटचें सामान घेऊन तावातावानें कांहींतरी बोलत पलीकडच्या वाड्यांत शिरलीं. आजोबांचें बोट धरून चारु परत येत होता. त्यानें हांक मारली ‘ आक्का ! ’

अभयचा मात्र कुठेंच पत्ता नव्हता ! झोंपाळ्यावर अंग टाकून तिनें डोळे मिटून घेतले. दिवा लावावा अशीसुद्धां तिला इच्छा झाली नाहीं.

तिच्या अंतर्मनांतून दोनच शब्द पुनःपुन्हां उसळून वर येत होते. पुरुषांची जात—पुरुषांची जात !

वाढत्या वयाबरोबर पुरुष कठोर होत जावा असा जगाचा नियमच आहे कां ?

लहानपणीं आपले वडील आपल्यावर किती माया करीत असत ! आदित-वारीं घरीं मुलें कांहीं विचारायला आलीं आणि त्याचवेळीं आपण घोडा-घोडा करण्याचा हट्ट धरला तरी ते तो पुरवीत. आपण त्यांच्या पाठीवर बसलों कीं मुलें हंसायला लागत. पण त्यांना त्याचें कांहींच वाटत नसे. उलट ‘ चाबूक हवा कां विमल ? ’ असें ते हंसत हंसत विचारीत.

पण तेच दादा पुढें आपल्याला किती कठोरपणानें वागवायला लागले. आईनें सांगितलेलें काम आपण केलें नाहीं म्हणून त्यांनीं एकदां आपल्याला

मरेमरेतों चोप दिला. आपण नव्या नव्या पातळाचा हट्ट धरला कीं ' विमलला वेड लागलंय् ! ' असें म्हणून ते गप्प बसत. आणि अर्धांगवायूनें अंथरुणाला खिळल्यावर आपण त्यांना भरवत असूं तेव्हां तर ते इतक्या विचित्र दृष्टीनें आपल्याकडे पाहत कीं—

एके दिवशीं रात्रीं आपणांला मधेंच जाग आली. आईचा हुंदका आपल्या कानांवर पडला. आपण कान टवकारून ऐकूं लागलों. दादा लुडब्या शद्बांत म्हणाले ' ही कारटी जन्माला आली नसती तर किती बरं झालं असतं ! अभय काय मुलगा आहे ! पण—'

दादा गेले. आईसाठीं आणि अभयसाठीं आपण मोठ्या कष्टानें नर्स झालों. परोपकाराच्या त्या कामांत एक दोन वर्षें आपण किती रंगून गेलों होतों. पण चांगल्या गोष्टींचा सुद्धां माणसाला लवकर वीट येतो. त्या रातपाळ्या, तें रोग्याशीं कृत्रिम मायेनें वागणें, मनांतले दुसरे विचार काढून टाकण्याकरितां तो गीतेचा अध्याय वाचणें—सारेंच हळुहळु निर्जीव वाटूं लागलें आपल्याला. आपण लग्न केलें तर अभयचें कसें होईल हा प्रश्न वारंवार आपल्या मनांत येऊं लागला. पुरुषांशीं बोलावें, हंसावें, खेळावें असें आपल्याला वाटायला लागलें. आणि—

पुरुष ?

जगांतला सारा कठीणपणा एके ठिकाणीं घालून देवानें पुरुषाचें मन घडविलें असावें !

इस्पितळांतली ती रात्र !

कुठेंशी मोठी आग लागली होती. त्या आगींत एक लहान मूल सांपडलें होतें. त्याला वांचविण्याकरितां एका तरुणानें आपला जीव धोक्यांत घातला. मूल सुरक्षित बाहेर आलें. पण तो तरुण बराच भाजला होता. त्याला इस्पितळांत आणलें. सुदैवानें त्याच्या शुश्रूषेचें काम—

सुदैवानें कीं दुर्दैवानें ?

क्षणभर आक्काचें मस्तक सुन्न झालें. मोटारीच्या चाकांतली हवा एकदम निघून जावी तशी तिच्या विचारांची स्थिति झाली.

तिनें डोळे उघडून पाहिलें. खोलींत अंधार आहे असें पाहून तिला बरें वाटलें. तिनें डोळे मिटून घेतलें. तिच्या डोळयांपुढें तें इस्पितळांतलें दृश्य नाचूं लागलें—

मध्यरात्र उलटून गेली आहे. एक तरुणी एकदम जागी होते. घड्याळाकडे दृष्टी जातांच ती दचकते. औषधाची वेळ तर केव्हांच होऊन गेली होती !

ती हळूच डोस घेऊन रोग्याच्या बिछान्याजवळ येते. भाजलेल्या जागीं पट्ट्या बांधल्यामुळें त्याचें तोंड कुणालाही विद्रूप दिसलें असतें. पण त्यांतली प्रत्येक पट्टी त्याच्या पराक्रमाची पताका आहे असेंच त्या तरुणीला वाटत होतें.

त्याला झोंप लागली आहे असें तिला दिसतें. औषध देण्याकरितां त्याला उठवावें कीं उठवूं नये या विचारांत ती पडते.

ती परतणार इतक्यांत त्याच्या मुद्रेवर हंसूं दिसूं लागतें. किती मधुर, किती मोहक !

तिला वाटलें—तो जागा असून आपली थट्टा करीत आहे. ती हळूच उद्गारते ' बरं हं ! '

त्याच्याकडून कांहींच उत्तर येत नाहीं. आतां तिला खरी कल्पना येते–तो स्वप्नांत हंसत असावा !

तिच्या मनांत विलक्षण हुरहुर उत्पन्न होते.

त्याला कसलें बरें स्वप्न पडत असावें ? त्याच्या स्वप्नांत आपणांला जागा मिळेल कां ?

ती खालीं वांकून त्याच्याकडे निरखून पाहते. तो एकदम डोळे उघडतो. तिच्याकडे पाहत तो म्हणतो ' स्वप्नं फार लवकर खरीं होतात म्हणायचीं ! '

त्याच्या डोळ्यांतली गोड ओढ तिला ओढूं लागते.

मान उचलून दूर होण्याची शक्ति सुद्धां तिला राहत नाहीं.

किती विचित्र क्षण !

जितका विचित्र तितकाच गोड !

आक्काची तंद्री एकदम भंग पावली. तिला वाटलें—अभय दार ठोठावीत आहे. झटकन् उठून तिनें दिवा लावला.

पलीकडच्या बिऱ्हाडांत चारु रडत होता! आक्का दार उघडून तिकडे गेली. तिला मायलेंकरांचा संवाद ऐकूं येऊं लागला.

चारूनें गाणें म्हणून मला निजीव असा आईपाशीं हट्ट धरला होता. गाणें म्हणायला मी कांहीं सिनेमांतली नटी नाहीं असें आई मुलाला उत्तर देत होती.

आक्का दिसतांच चारूनें आपलें रडें आवरतें घेतलें. त्याला कडेवर घेऊन ती आपल्या बिऱ्हाडीं आली.

आक्काच्या मांडीवर डोकें ठेवून चारु म्हणाला,

'गानं, गानं!'

'कुठलं गानं म्हणूं?'

'लाघूमैना निदल्या—'

आक्का मधुर स्वरानें गुणगुणूं लागली—

'राघूमैना निजल्या वेल्हाळा बाळा
चिमण्या मोराचा ग कां वाजत वाळा?
तारा या पेंगुळल्या राईही झोंपीं जाई
निजला वारा राजा—'

पुढचे शब्द आठवेनात म्हणून आक्का मधेंच थांबली. पण चारु कांहीं कमी लबाड नव्हता! अर्धवट मिटलेले डोळे उघडून तो म्हणाला 'शंपलं नाहीं तें!'

आक्का आठवून म्हणूं लागली—

'कां अजुनी निजेना मैना?
ही खुदकन् हांसे कोणा
कां लगबग माझी तारा
ही उघडुनि पाही दारा
झोंपे बाई गगनीं तारांचा राणा
नयनीं राजाच्या ग कां नीज फुलेना?

चारूच्या डोळ्यांची उघडझांप आक्काला मोठी गंमतीची वाटली. आक्का थांबली असें पाहून तो जड स्वरानें म्हणाला ‘ एक जम्मत शांगूं कां तुला ? ’

‘ हूं ! ’

‘ तुझं नांव आक्का नाहीं ! ’

आक्का हंसली.

तिला लडिवाळपणानें मिठी मारून चारू म्हणाला

‘ तुझं नांव आई ! ’

‘ मग तुझ्या आईचं नांव काय ? ’

‘ तिचं नांव आक्का ! ’

आपल्या या नवीन गंमतीवर खूष होऊन चारूनें डोळे मिटून घेतले. हां हां म्हणतां त्याला झोंप लागली.

चारूच्या या बोलण्याची आक्काला प्रथम मौज वाटली. पण तो निजल्यावर त्याच्या डोक्यावरले केंस सारखे करीत आणि मधूनच हंसणाऱ्या त्याच्या लाडक्या मुद्रेकडे पहात ती त्या वाक्यांचा जसजसा विचार करूं लागली, तसतसें तिला वाटूं लागलें—

लहान मुलांच्या विचित्र बोलण्यानें आपल्याला हंसूं येतें. पण त्या बोलण्यांत कितीं तरी खोल अर्थ भरलेला असतो !

चारु वर्षाचा होतो न होतो तोंच त्याचा बाप वारला होता. त्याची आई पुरी वीस वर्षांची सुद्धां नव्हती ! जमिनीच्या तुटपुंज्या उत्पन्नावर चारूचे आजोबा आपली विधवा सून आणि नातू यांचा सांभाळ करीत होते. एकुलता एक मुलगा म्हणून चारूवर आईचें खूप खूप प्रेम असायला हवें होतें. पण नवऱ्याच्या मुळावर आलेलें मूल म्हणून तिच्या मनांत त्याच्याविषयीं विलक्षण अढी उत्पन्न झाली होती. शेजारपाजारच्या सुखवस्तु कुटुंबांकडे पाहून ती मनांत खिन्न होई, आपला नवरा असतां तर आपणही अशीच सुखी झालों असतो या विचा-

रानें ती उद्विग्न होऊन जाई, आपण सुखी असूनही दुःखी आहों याचा तिला राग येई, आणि हा सारा ती चिमुकल्या चारूवर काढी.

चारूला जें आईचें प्रेम हवें आहे तें आपल्याकडून मिळत आहे! म्हणून गुलामानें आक्काचें नांव आई आणि आईचें नांव आक्का अशी अदलाबदल करायचें ठरविलें असावें.

दार वाजलें.

दुपार पासून अभयची वाट पाहून कंटाळून गेलेलें आक्काचें मन स्वतःशी म्हणालें 'चारूची आई आली असेल त्याला न्यायला!"

ती जागेवरून उठली नाहीं. दार ढकलून बाहेरली व्यक्ति आंत आली. अभयच होता तो!

आक्कानें अभयच्या चेहऱ्याकडे पाहिलें. फार उल्हासित दिसत होता तो!

ती धांवतच पुढें आली.

'पास झालास ना रे?' तिनें प्रश्न केला. खुंटाळयाच्या एका खुंटीला अभय कोट लावीत होता. हातांतला कोट तसाच हातांत धरून तो एकदम वळला आणि म्हणाला 'म्हणजे? तुला कळलं नाहीं?'

'कोण सांगणार? तूं तर आत्तां येतोयस् घरीं!'

'मालेला सांगितलं होतं मी! ती आलीच नाहीं इकडें?' अभयनें आश्चर्यानें विचारलें.

आपण पर्वतीला गेलों होतों तेव्हां माला कदाचित् येऊनही गेली असेल असें आक्काला वाटलें.

ती म्हणाली 'तिची माझी चुकामुक झाली असेल. मी पर्वतीला गेलें होतें.'

'भर दुपारीं?'

'दुपारीं नाहीं रे! संध्याकाळीं.'

'पण ती तर मला दोन वाजतां भेटली होती!' अभयच्या स्वरावरून तो मालेवर रागावला आहे हें उघड उघड दिसत होतें.

आक्काला एका गोष्टीचें नवल वाटलें. मालेनें आपला निरोप कळविला नाहीं म्हणून अभय तिच्यावर रागावला होता. पण ही आनंदाची गोष्ट सांगायला त्यानें स्वतःच यायला नको होतें कां ? आज त्याला शाळा सुद्धां नव्हती !

आक्काच्या मनांत हें सारें येऊन गेलें. पण कांहीं न बोलतां तिनें अभयच्या हातांतला कोट घेऊन तो खुंटीला लावला.

अभयचें लक्ष झोंपाळ्यावर निजलेल्या चारूकडे गेलें. तो हंसून म्हणाला ' स्वारी इथेंच निजली वाटतं ? '

' त्याला पोंचवून ये बाबा ! नाहीं तर ती आक्का—'

' आक्का ? '

' चारूनं नांवं बदललीं आहेत आमचीं ! माझं नांव आई ठेवलं आहेन् मुलामानं ! आणि आपल्या आईला आक्का म्हणणार आहे स्वारी ! '

हंसत हंसत अभयनें चारूला उचललें आणि तो त्याला पोंचविण्याकरितां गेला.

× × ×

आजोबांच्याकडे अभय सहज गेला तरी अर्ध्या तासाच्या आंत त्याची कधींच सुटका होत नसे ! कुठलाही विषय निघाला तरी त्यांत ते टिळकांचा उल्लेख करीत आणि अभयनें ' आतां टिळकांचा काळ राहिला नाहीं ! ' असें कांहीं तरी म्हटलें कीं त्याला एक लांबलचक व्याख्यान सुनावीत.

आतांही तसेंच झालें.

आजोबांच्या पुढें कुठलें तरी एक साप्ताहिक पडलें होतें. त्यांत सात नोव्हेंबरला कामगारांवर झालेल्या गोळीबाराबद्दल बरीच टीका होती. ती टीका दाखवीत आजोबा म्हणाले ' वर्तमानपत्रं काढण्यापेक्षां सव्रून काढावं या लोकांनीं ! '

अभयनें त्या वर्तमानपत्राची बाजू घेतली.

गांधींच्या अनुयायांनीं तरी शांतता राखण्याकरितां गोळीबार करायला नको होता असें तो म्हणाला.

आजोबा एकदम उसळून ह्मणाले ‘ या गांधीचं तत्वच मुळांत चूक आहे. लोकमान्यांनीं गीतारहस्यांत चक्क सांगितलंय् कीं—शठं प्रति शाठ्यम् असं वागलं पाहिजे. दंगा धोपा होऊं लागला तर गोळीबार केलाच पाहिजे. प्रत्यक्ष भगवंतांनीं अर्जुनाला लढण्याचा सल्ला दिला तो काय उगीच ? ’

‘ पण अर्जुनाला दुष्ट कौरवांच्या विरुद्ध लढायचं होतं ! इथं बिचाऱ्या गरीब मजुरांवर—’

मजुरांना चार शिव्या हांसडून आजोबांनीं टिळक असते तर ते या संपाच्यावेळीं कसे वागले असते याची अभयला पूर्ण कल्पना आणून दिली.

अभयनें त्यांचें भाषण मुकाट्यानें ऐकून घेतलें. आजोबांच्या तडाक्यांतून लवकर सुटका करून घेण्याचा हाच एक मार्ग होता !

मात्र आजोबांच्या बिऱ्हाडांतून बाहेर पडल्यावर एकदम आपल्या घरांत न जातां तो बाहेर आला.

अंधारांत चमकणाऱ्या तारका पाहून त्याच्या मनाला जरा बरें वाटलें. इतक्यांत वाऱ्याच्या झुळकाही समोरच्या बागेंत फुललेल्या फुलांचा सुगंध घेऊन आल्या. तारका आणि फुलें !

तारकांना सुगंध नाहीं; पण तेज आहे !

फुलांना सुगंध आहे; पण तेज नाहीं.

अभयला लगेच स्वतःच्या या कल्पनांचें हंसूं आलें. दुपारच्या संभाषणांतलें एक वाक्य त्याला तत्काळ आठवलें—‘आतां कविता नकोत; क्रांति हवी ! ’

तो घरांत परत आला. आक्काचा भात शिजत आला होता.

अभयनें दोन पाट घेऊन ते जवळ जवळ मांडले. भिंतीला लावलेल्या ताटांना त्यानें हात लावला. इतक्यांत आक्काचें लक्ष त्याच्याकडे गेलें. तिनें उठून त्याचा हात धरला.

‘ ताटं बिटं काढायचीं नाहींत हं आतां ! ’

‘ कां ? ’

‘ आतां मोठा वकील होणार आहेस तूं! असलीं कामं करायला वेळ तरी मिळेल कां तुला ?’

अभय नुसता हंसला.

अभयचा पहिला भात कांहीं केल्या लवकर संपेना.

आक्कानें विचारलें ‘ आज मेजवानी होती वाटतं कुठं ?’

‘ हं !’

‘ कुणाकडे ?’

‘ एका स्नेह्याकडे !’

अभयनें आक्काकडे पाहिलें. तिच्या दृष्टीचा अर्थ त्याला पुरेपूर कळला. ती म्हणत होती—परीक्षा पास झाल्याच्या आनंदांत, स्नेह्यांच्या सहवासाच्या आनंदांत तूं बहिणीला विसरलास.

अभय मुद्दाम म्हणाला ‘ इथं नव्हती ती मेजवानी आक्का !’

‘ मग कुठं ? मुंबईला ?’

‘ अं हं ! खडकीला !’

‘ खडकीला कोण आहे तुझ्या ओळखीचं ?’

‘ एक हॉटेलवाला !’

अभय हंसला म्हणून आक्काही हंसली. पण अभयच्या बोलण्यामागें कांहींतरी रहस्य लपलें आहे अशी तिची खात्री झाली.

आक्काच्या मनाचा गोंधळ अभयला जाणवला. त्यानें दुपारची सारी हकीकत तिला सांगितली.

आज त्यानें रजा घेतली होती ती परीक्षेचा निकाल होता म्हणून नव्हे ! तर त्यानें आणि त्याच्या आठ दहा स्नेह्यांनीं मिळून जें मित्रमंडळ गतवर्षी काढलें होतें, त्याचा वाढदिवस साजरा करायचा होता म्हणून !

या वाढदिवसासाठीं पाहुणा म्हणून एक संयुक्त प्रांतांतला युवक कुणाच्या तरी ओळखीनें आला होता.

तो स्पेनच्या रणभूमीवर लढला होता, रशियांत कांहीं महिने राहिला होता, जर्मनी आणि इटाली यांच्या अंतरंगाविषयींही त्याला प्रत्यक्ष माहिती होती. बैठक कुणाच्याही घरीं भरवली तर हवा तितका वेळ हव्या त्या विषयाची चर्चा करतां येणार नाहीं म्हणून सर्वांनीं ती खडकीला भरवायचें ठरविलें.

आपल्यासाठीं सर्वांचा खोळंबा होऊं नये म्हणून अभय निकालाची अधिक वाट न पाहतांच पोस्ट ऑफिसांतून परस्पर जायला निघाला होता. इतक्यांत त्याची तार आली. ती घरीं आक्काकडे पाठवायचा विचार करीत असतांनाच त्याला माला भेटली. मालेकडे निरोप देऊन तो निघून गेला तो खडकीला गेला होता.

अभयची हकीगत संपल्यावर आक्का म्हणाली ‘ आत्तां माझ्या जिवांत जीव आला बाबा ! ”

‘ म्हणजे ? मी कुठं पळून बिळून गेलों असं वाटलं कीं काय तुला ? ’

‘ तसं नाहीं रे ! मला वाटलं—तार आली नाहीं म्हणून तूं एकटाच कुठं-तरी दूर फिरायला गेला असशील—’

‘ आणि पोटभर हवा खाऊन परत येशील ! ’

‘ पुरुष सार्‍याच गोष्टी थट्टेवारी नेतात ! पण बायकांना—’

आक्काला काय सांगायचें हें कांहीं केल्या अभयच्या लक्षांत येईना.

शेवटीं तीच म्हणाली ‘ अपरात्रीं एकट्यानं फिरणं सुरक्षित नाहीं हल्लीं. मागं पर्वतीच्या पायथ्याशीं एकावर हल्ला झाला होता, परवां लॉ कॉलेजकड—’

अभयच्या चेहर्‍यावर हास्याची रेषा चमकून गेली.

आक्का त्याला म्हणाली ‘ खूप उशीर झालाय् ! निज जा आतां ! ’

पाठमोर्‍या अभयला आक्काचे शब्द ऐकूं आले—‘ आज आई असायला हवी होती ! ’

× × × ×

स्वयंपाक घरांत खणकन् कांहींतरी आवाज झाला म्हणून आक्का उठली. आंत जाऊन तिनें पाहिलें. एका चोरट्या मांजरानें लोखंडी घडवंचीवरला डबा खालीं पाडला होता.

मांजराला हांकून आक्कानें खिडकी लावली. मात्र मधल्या खोलींत आल्याबरोबर तिला आश्चर्य वाटलें. अभयच्या खोलींत दिवा नव्हता. पण या खोलींतला प्रकाश त्याच्या अंथरुणाच्या मधल्या भागावर पडला होता. अभय कांहीं अंथरुणावर नव्हता !

कुठें गेला हा ?

आक्का हळूच त्याच्या खोलींत गेली. चांदण्याच्या मंद प्रकाशांत असलेली ती आकृति--

अभयच होता तो ! त्याच्याजवळ जाऊन त्याच्या खांद्यावर प्रेमळपणानें तिनें आपला हात ठेवला. अभयनें मागें वळून पाहिलें. तो हंसत होता.

'कां रे हंसलास ?'

'उगीच !'

'उगीच ? अशी फसायला मी कांहीं चारु नाहीं ! खरं सांग ! माझ्या गळ्याची शपथ—'

खो खो करून हंसत अभय म्हणाला 'गळ्याची शपथ घातल्याबरोबर घाबरून जायला मीही कांहीं चारु नाहीं !'

दोघेंही मनापासून हंसलीं. हंसण्याचा भर ओसरल्यावर आक्का म्हणाली 'सांग ना काय झालं हंसायला तें ?' अभय स्तब्धच राहिला.

आक्का हंसत हंसत म्हणाली 'म्हातारीनें कोंबडं झांकून ठेवलं तरी—मी सांगूं आज तुला झोंप कां आली नाहीं तीं ?'

'हं !'

'पास झाल्याच्या आनंदानं !'

अभयनें नकारार्थी मान हलविली.

'मालेच्या नांवाचा जप करीत बसला असशील !'

'आतां खरं सांगायलाच हवं तुला ! नाहीं तर वाटेल ते तर्क करीत बसशील तूं !'

आक्का उत्सुकतेनें अभयकडे पाहूं लागली.

अभय सांगूं लागला—' आज बोलून बोलून तोंड दुखायला लागलं होतं बघ. केव्हां एकदां अंथरुणावर पडतो असं झालं होतं. स्वयंपाकघरांतून आलों—तों सुपारीचं खांड तोंडांत टाकण्याकरितां टेबलाकडे गेलों. तिथं मासिकाचा नवा अंक पडला होता. सहज तो उघडला. एक लहान गोष्ट दिसली, गंमतीनं ती वाचली—'

' दोन मेघ ही ना ? '

' हो. तूंही वाचलीस कां ती ? चांगली आहे नाहीं ? याच मासिकाच्या कुठल्या तरी मागल्या अंकांत या कल्पलतेची गोष्ट आली होती. त्यावेळीं वाचली नव्हती ती मी. पण ही गोष्ट वाचल्यावर मोठी चुटपुट लागली मनाला. तो अंक शोधून काढला, ती गोष्ट वाचली, नि मग दिवा मालवून अंथरुणावर पडलों पण ती दुसरी गोष्ट एकसारखी मनांत घोळूं लागली. ती गोष्ट, दुपारीं त्या परदेशीं जाऊन आलेल्या माणसाशीं झालेला वादविवाद—'

दिवा लावून आक्का टेबलाकडे गेली. दुपारीं आलेल्या मासिकाचा एक जुना अंक तिथें पडला होता. तिनें तो उत्सुकतेनें उचलला, लेखांची अनुक्रमणिका चाळली, कल्पलता या नांवावर नजर जातांच त्याच्या पुढलें पृष्ठ पाहिलें आणि घाई घाईनें तें उघडून ती वाचूं लागली—

## ' घरटें आणि धरणीकंप '

आक्काला मोठें विचित्र नांव वाटलें हें! पण जी गोष्ट अभयला आवडली, ज्या गोष्टीनें त्याची झोंप नाहींशी केली, तिच्यांत कांहींतरी विशेष असलें पाहिजे या समजुतीनें ती वाचूं लागली—

' फार जुनें झाड होतें तें ! '

नुकत्याच उडूं लागलेल्या त्या चिमण्या पांखराच्या कित्येक पिढ्या त्याच झाडावर आपलें घरटें बांधीत आल्या होत्या.

त्या झाडानें अनेक वावटळींना तोंड दिलें होतें, कितीतरी वादळें पाहिलीं होतीं. पण त्याच्यावरलें एक सुद्धां घरटें कधीं मोडून पडलें नव्हतें.

एके दिवशीं तें झाड थरथर कांपूं लागलें.

त्या चिमण्या पांखराच्या आईला वाटलें—बाहेर वादळ सुरू झालें आहे.

पिलानें बाहेर डोकावून पाहिलें. आकाश अगदीं निरभ्र होतें !

आई पिलाला आंत ओढीत म्हणाली ' कुठली तरी वावटळ असेल, झोंप तूं ! '

आईच्या स्पर्शाचा मधुर आनंद आज त्याला नकोसा झाला !

त्यानें पुन्हां बाहेर डोकावून पाहिलें.

झाड अधिकच हालूं लागलें होतें. जणुं कांहीं धरणीमातेवर कुणीतरी एक प्रचंड चवरी फिरवीत होतें.

चिमणें पांखरूं पाहूं लागलें–वावटळीचें एकही लक्षण दिसत नव्हतें.

हां हां म्हणता भोंवतालचीं मंदिरें कोसळूं लागलीं–देवालयें, राजवाडे–

धाड–धाड–धाड—

आई–आई–आई ग—

ते भयंकर आवाज कानांवर पडतांच तें पांखरूं आईला घरट्या-बाहेर ओढूं लागलें.

आई त्याला परत घरट्यांत ओढूं लागली.

पिलूं म्हणत होतें ' आई, ही वावटळ नाहीं, हें वादळ नाहीं, हा धरणीकंप आहे ! '

आई सांगत होती ' बाळ, आपलं झाड फार जुनं आहे. असले खूप धरणीकंप पाहिले आहेत त्यानं ! '

घरट्याच्या तोंडांत एकमेकांवर प्राणापेक्षांही प्रेम करणारे ते दोन जीव भांडूं लागले.

आई म्हणे ' बाळ, कसला धरणीकंप घेऊन बसलास् ? बाहेर प्रळय सुरू झाला आहे. घरट्याला चिकटून राहिलों तरच आपले प्राण वांचतील. हें जुनं झाड मोठं खंबीर आहे ! '

पिलूं म्हणे ' आई, धरणीकंपाची कल्पना नाहीं तुला ! घरट्याबाहेर पडलों तरच आपले प्राण वांचतील. या जुन्या झाडाचा कांहीं नेम नाहीं आतां ! '

पिलानें आईला जवळ जवळ घरट्याबाहेर ढकललें. इतक्यांत त्याला दूर लोटून ती रागानें आंत आली.

तिच्या धक्क्यानें तें पिलूं घरट्याबाहेर पडलें.

कानठळ्या बसविणारा एक प्रचंड आवाज झाला—कड—कड—कड—
—काड—काड—काड—तो जुना वृक्ष मुळासकट उपटून पडला होता !

तें चिमणें पांखरूं आईला शोधण्याकरितां त्या वृक्षाभोंवतीं घिरट्या घालूं लागलें.

× × × ×

' **दोन मेघां** 'प्रमाणें याही गोष्टींत कांहींतरी विचित्र गूढ रम्यता आहे असें आक्काला वाटलें.

ती अभयला म्हणाली ' ही गोष्ट वाचून हंसत होतास तूं ? '

' गोष्ट वाचून नाहीं; चांदणं पाहून ! मी खिडकीपाशीं जाऊन उभा राहिलों तेव्हां जिकडे तिकडे अंधार पसरला होता. त्या अंधाराकडे पाहून मन कसं गुदमरायला लागलं. पृथ्वीच्या हृदयावर कुणीतरी काळ्या फत्तरांच्या

राशीच्या राशी ठेवल्या आहेत असं वाटायला लागलं मला! पण लगेच चंद्र उगवला. अर्ध्या घटकेंत साऱ्या फत्तरांचीं फुलं झालीं!'

'खूप दिवसांनीं तुझी कविता मिळणार म्हणायची वाचायला!'

अभय हंसून म्हणाला 'तीन चार वर्षांपूर्वी असं कांहीं सुंदर पाहिलं कीं मला कवितेच्या ओळी सुचूं लागत. पण मघाशीं मात्र—'

'मघाशीं काय सुचलं?'

'मला वाटलं—आजच्या आपल्या समाजांत अंधाराचं असंच राज्य आहे! पण उद्यां क्रांति झाल्यावर—'

अभयनें आपल्या अंथरुणापर्यंत येऊन पोंचलेल्या सुंदर चांदण्याकडे मोठ्या कौतुकानें पाहिलें.

क्रांति ही वणव्यासारखी असते असें आक्कानें अनेकदां वाचलें होतें!

तिला अभयच्या बोलण्याचा, पाहण्याचा, कशाचाच अर्थच कळेना.

ती त्याच्याजवळ जाऊन म्हणाली 'आजपर्यंत अभ्यासासाठीं दोन दोन वाजेपर्यंत जागत होतास. आतां—चल, पड पाहूं अंथरुणावर!'

अभय मुकाट्यानें अंथरुणावर जाऊन बसला.

'ऊं हूं! बसायचं नाहीं!'

अभय आडवा झाला.

'डोळे मिटून घ्यायचे!'

'आतां तूं अंगाईगीत म्हणायचंच काय तें राहिलंय्! ' अभय डोळे मिटून घेत म्हणाला.

आक्का त्याच्याजवळ येऊन बसली. तिच्या मनांत आलें—अभय कितीही मोठा झाला तरी आपला धाकटा भाऊच आहे! रात्रीं चारूला आपण गाणें म्हणून निजवलें नाहीं कां? अभयला झोंप येईपर्यंत त्याच्याजवळ बसून आपण एकादें गाणें म्हणायला काय हरकत आहे?

कुठलें बरें गाणें म्हणावें?

‘ राघूमैना निजल्या— ’

छेः ! तें एकून चारू झोंपीं जातो. पण अभय ?

राघूमैना निजल्या—

कल्पलतेची ती दुसरी गोष्ट आक्काला आठवली. त्या गोष्टींतलें तें लहान पांखरूं—त्याची ती आई–राघूमैना निजल्या ! धरणीकंपांत त्या कशा निजणार ?

तिचें मन म्हणालें—किती भयंकर गोष्ट आहे ती ! एखादा पुरुषच आपल्या बायकोच्या नांवानें त्या गोष्टी लिहीत असेल.

तिनें अभयच्या डोक्यावर सहज हात ठेवला.

अगदीं कढत झालें होतें त्याचें कपाळ !

आक्काला दुसरेंच अंगाई गीत आठवलें—

अंगाई—पुरे चाळा !
नेलि कोणी झोंप बाळा ?
लावितां तीट ना
झोंपला चंद्रमा
अंगाई—पुरे चाळा !

# ३

# दोन नांवें

सात वाजले तरी अभय जागा झाला नाहीं हें पाहून आक्काला आश्चर्य वाटलें. अभय कितीही उशीरां झोंपला तरी उजाडल्यावर त्याला सहसा झोंप येत नसे.

स्टोव्ह पेटवून चहा करावा, तोंपर्यंत अभय जागा होईल, असें तिच्या मनांत आलें. पण कांकडा स्पिरिटमध्यें बुडवितां बुडवितां तिला वाटलें--अभयची झोंप अगदीं हलकी आहे. स्टोव्हच्या आवाजानें सुद्धां तो जागा होईल—

भिजलेला कांकडा स्टोव्हला तसाच अडकवून ठेवून ती परत अभय निजला होता तिथें आली. झोंपलेल्या अभयकडे पाहतां पाहतां तिचें हृदय भरून आलें.

त्याची मुद्रा एखाद्या लहान मुलाच्यासारखी दिसत होती. त्यानें पहाटे अंगावर पांघरूण ओढलें असावें. पण त्या पांघरुणांतूनही निजलेली व्यक्ति चांगली उंच आहे आणि तिचें हाडपेर मजबूत आहे हें कोणाच्याही लक्षांत आलें असतें. आक्काच्या मनांतही तेंच आलें. तिला लहानपणचा नाजुक अभय आठवला.

लहानपणीं अभय वरचेवर आजारी पडल्यामुळें त्याचा नंबर खालीं जाई, आडदांड मुलें त्याला धाकदपटशा देत आणि मग रडतां रडतां अगदीं पुरेवाट होई त्याची !

शेवटीं अभयनें शरीर कमवायचें ठरविलें.

त्याचें तें पहांटेचें उठणें–ते नमस्कार– तीं आसनें–सारें सारें आक्काला आठवलें. प्रकृति सुधारल्यावर तो म्हणाला होता 'नाजुक माणसांना या जगांत जागा नाहीं ! त्यांच्याकरितां जागा रिझर्व करून ठेवलेल्या असतात ! पण त्या परलोकांत ! '

वाऱ्याबरोबर भुरुभुरु उडणाऱ्या अभयच्या केंसांकडे आक्काचें लक्ष गेलें.

लहानपणीं कुणी वात्रट मुलानें हळूच कात्रीनें शेंडी कापली तेव्हां अभय अगदीं ओक्साबोक्शीं रडला होता ! आणि परवां तोच अभय केंस कापून घेणाऱ्या कॉलेजांतल्या एका मुलीचें वकील–पत्र घेऊन चारुच्या आजोबाशीं भांडत होता.

अभयचे केंस विपुल आणि काळे कुळकुळीत होते. पण केंसांना तेल लावणें मात्र त्याच्या अगदीं जीवावर येई. मग भांगबिंग काढणें तर दूरच राहिलें !

आक्का आपल्या या विचारतंद्रींत गुंग असतांनाच अभय एकदम ओरडला 'अरे बापरे ! '

'काय रे ? '

अभयनें टेबलाकडे बोट दाखविलें. आक्कानें तिकडे पाहिलें. पण टेबलावरली कुठली वस्तु पाहून अभय एवढा दचकला हें कांहीं केल्या तिच्या लक्षांत येईना. तिनें अभयकडे वळून पाहिलें. अभय उद्गारला 'तो—तो डोंगर बघून माझी छातीच हबकली ! '

टेबलावरल्या एक्सरसाईज–बुकांच्या राशीकडे अभय पाहत होता. एकाद्या लहान मुलानें हत्तीसारखा प्रचंड प्राणी पाहिला कीं त्याच्या मुद्रेवर जो आश्चर्याचा भाव दिसतो, तोच अभयच्या चर्येवरही प्रतिबिंबित झाला होता.

अंगावरलें पांघरूण झटकून उठतां उठतां अभय म्हणाला 'आमच्या सासुबाई येणार आहेत पुढल्या आठवड्यांत!'

'सासुबाई?'

'हो सासुबाई! हेड्मास्तरांनीं इन्स्पेक्टराला ठेवलेलं नांव आहे तें! हा ढोर तपासून व्हायला हवा तोंपर्यंत!'

अभय वळकटी गुंडाळण्याकरितां खालीं वांकला, तोंच आक्का पुढें होऊन ती गुंडाळूं लागली.

अभय म्हणाला 'असले लाड बरे नव्हेत हं आक्का!'

'उद्यां वकील झाल्यावर काय तूंच आपलं अंथरूण गुंडाळीत बसणार?'

'वकीलांना हल्लीं कोर्टांत कामं मिळताहेत कुठं? तेव्हां असलं कांहीं तरी करायलाच हवं त्यांना! कांहीं कांहीं ठिकाणीं वकील मोटार-एजंट व्हायला लागले आहेत! आहेस कुठं तूं आक्का?'

'बरं बरं! तोंड धू जा आधीं!'

आपल्या बुद्धिवान भावानें, थट्टेनें कां होईना, स्वतःला मोटार-एजंटांच्या पंक्तींत बसवावें, हें आक्काला मुळींच रुचलें नाहीं.

चहा पितां पितां अभय आक्काला म्हणाला 'मालेची शिकवणी सोडावी म्हणतों आतां!'

'बराच लबाड आहेस कीं रे!'

'लबाड?'

'नाहीं तर काय? आतां मी वकील होणार आणि मालेशीं लग्न करणार, असं सरळ सांगायचं सोडून—'

'तुम्हां बायकांना लग्नाखेरीज दुसरं कांहीं सुचतच नाहीं कां ग?'

अभयच्या तोंडून हे शब्द बाहेर पडेपर्यंत तो हंसत आक्काकडे पाहत होता. पण लगेच तो गंभीर झाला. मान वळवून तो दुसरीकडे पाहूं लागला. आपल्या तोंडांतून हे शब्द जायला नको होते असें त्याला वाटलें.

लग्नाशिवाय बायकांना कांहीं सुचतच नाहीं असें आपण म्हटलें, पण आक्का अविवाहित राहिली म्हणूनच आपलें संरक्षण झालें नी शिक्षण होऊं शकलें. आक्का नसती किंवा लग्न होऊन दूर गेली असती तर आयुष्याच्या प्रातःकाळांत जें कोंवळें उबदार ऊन आपल्याला मिळालें तें कधींही मिळालें नसतें. पायाला चटके बसत असतांनाच आपल्याला आयुष्याच्या प्रवासाचा आरंभ करावा लागला असता !

'कांहीं तरीच बोललों हं मी !' असें दृष्टीनें म्हणत अभय बाहेर गेला. टेबलावरला वह्यांचा गठ्ठा त्यानें अलीकडे ओढला.

× × × ×

पण हेडमास्तरांच्या सासूबाईच्या भीतीनें जें काम तो झटपट संपवून टाकणार होता, त्याला त्याचा हातच लागूं नये असा विधिसंकेत होता.

तांबड्या शाईची दौत जवळ घेऊन अभयनें मान खालीं केली न केली, तोंच बाहेरून हांक आली 'अभय, ए अभय—'

अभयनें स्वर ओळखला—मोतीराम मणेरीकर ! स्वारी बहुधा पेढे मागायला आली असावी ! कुणी ओळखीचा मनुष्य पास झाला कीं त्याच्याकडे पेढे मागायचे आणि पाठीवर शेंपटा सोडलेली जराशी बरी पोरगी दिसली कीं तिची ओळख करून घ्यायची हाच धंदा मोतिराम गेलीं दोन वर्षें करीत होता !

क्षणमात्र त्या हांकेला ओ देऊं नये असें अभयला वाटलें. पण लगेच त्याच्या मनांत आलें—ही पीडा कांहीं सुखासुखी परत जाणार नाहीं. एकवेळ सी. आय्. डी. च्या माणसाला चुकवितां येईल ! पण मोतिराम मणेरीकराच्या हातावर तुरी देणें ब्रम्हदेवाच्या बापाला सुद्धां साधणार नाहीं. एका मुलीची ओळख करून घेण्याकरितां तो दहा वेळां तिच्या बंगल्यावर गेला होता. बिचारी घरांत असूनही नसल्याचें सोंग करी ! 'तिच्या घरीं जायचा अजून कसा रे तुला कंटाळा आला नाहीं ?' असें कुणीतरी विचारतांच वीर मोतिराम उत्तरला होता, 'महंमद गझनीनें हिंदुस्थानावर सतरा स्वाऱ्या केल्या होत्या. मीं तिच्या बंगल्यावर अठरा स्वाऱ्या करणार आहे !'

या एक पूर्णांक एक सतरांश महंमद गझनीला केव्हां तरी चहा दिल्यावांचून सुटका नाहीं हें उघड होतें.

अभय उठला आणि दरवाजा उघडण्याकरितां गेला.

दरवाजा उघडतां उघडतां त्याच्या डोळ्यांपुढें मोतिरामाची मूर्ति उभी राहिली. डाव्या खांकेंत चार पांच वर्तमानपत्रें, उजव्या हातांत दोन तीन जाड पुस्तकें आणि बरोबर एकादी पोरगी, असा त्याचा नेहमींचा सरंजाम असे.

दरवाजा उघडतांच अभयला जें हंसूं आलें तें आपल्या कल्पनेंतली मूर्ति जशीच्या तशी समोर उभी असलेली पाहून ! सकाळ–संध्याकाळ खरवडून दाढी केल्यामुळें काळसर हिरवट दिसणारे ते मोतिरामाचें जाड ओंठ, जुन्या बाजारांत विकत घेतल्यामुळें असो अथवा पेशवाईतल्या शिंप्याकडून शिवून घेतल्यामुळें असो, अगदीं गबाळ दिसणारा तो त्याचा सूट—

बी. ए. च्या वर्गांत हाच मोतिराम आपला प्रतिस्पर्धी होता, हें आठवून अभयच्या मनांत त्याच्याविषयीं एक प्रकारची कींव उत्पन्न झाली. मोतिरामानें पुढें केलेला हात त्यानें हस्तांदोलनाकरतां हातांत घेतला, तेव्हां अगदीं सकाळीं त्याच्या हाताचे तळवे घामानें ओले कां व्हावेत, हें कांहीं केल्या त्याच्या लक्षांत येईना.

अभयच्या खोलींत दोनच खुर्च्या होत्या. मोतिरामानें आपल्या बरोबरीच्या मुलीपुढें एक खुर्ची केली आणि दुसरी स्वतःच पटकावली ! खुर्चीवर बसतां बसतां तो म्हणाला ' अगदींच सनातनी आहेत तूं अभय ! सोशॅलिझमची एवढीं पुस्तकं वाचतोस आणि घरांत चार खुर्च्या सुद्धां ठेवीत नाहींस ! संस्कृति–संरक्षक मंडळाचा सभासद झालायस् कीं काय हल्लीं ? '

आपण मोठा विनोद केला या कल्पनेनें मोतिरामानें हंसत त्या मुलीकडे पाहिलें. ती एकाद्या पुतळीप्रमाणें स्तब्ध बसली होती.

झोंपाळ्यावर बसतां बसतां अभय म्हणाला ' मोतिराम, माझ्यापेक्षां तूंच सनातनी आहेस ! '

' मी नि सनातनी ? गृहस्था, एकाद्या आजीबाईचं देवदर्शन चुकेल. पण माझी लकींतली हजिरी चुकणार नाहीं कधीं ! तिथं कांहीं भेंड्याची भाजी खायला जात नाहीं कुणी ! '

मोतिरामानें स्वतःच्या विनोदाचें कौतुक करण्याकरितां पुन्हां हास्य केलें. पण त्या मुलीच्या मुद्रेवर स्मिताची रेषा सुद्धां उमटली नाहीं.

अभयला आश्चर्य वाटलें. मोतिराम आपल्या मैत्रिणी म्हणून ज्या मुलींची वारंवार ओळख करून देत असे, त्यांपैकीं बहुतेक असल्या विनोदावर बेहाय खूष असलेल्या दिसत !

लहानसा झोंका घेत अभय म्हणाला ' हें पहा मोतिराम, सुधारणा खाण्यापिण्यांत, पोषाखांत, बैठकींत नि असल्याच गोष्टींत असली तर मी सुद्धां तुझ्यापेक्षां मोठा सुधारक आहे ! '

नेकटायचें टोंक दांतांनीं कुरतडीत मोतिरामानें प्रश्न केला, ' तें कसं काय बुवा ? '

जोराचा झोंका घेत अभय म्हणाला ' तुझी खुर्ची काय जागच्या जागीं बसली आहे. पण माझा झोंपाळा—हा पहा कसा पुढं जातोय् तो ! '

आतां मात्र ती मुलगी हंसली.

थोडेंसें हंसतांच तिच्या उजव्या गालाला खळी पडते हें अभयच्या लक्षांत आलें. त्या खळीची त्याला मोठी मौज वाटली. लहानपणीं पाण्यांतले लहान लहान भोंवरे पाहतांना त्याला असाच आनंद होत असे.

अभयच्या बोलण्याला मोतिराम कांहींतरी उत्तर देईल अशी त्या मुलीची कल्पना असावी ! तिनें त्याच्याकडे मोठ्या उत्सुकतेनें पाहिलें. पण त्यानें आपल्या जवळचा एक जाडाजुडा ग्रंथ चाळायला सुरवात केली होती. अभयच्या तोंडावर तो त्यांतला एकादा लांबलचक उतारा फेंकणार होता कीं काय कुणाला ठाऊक !

हाताच्या बोटांची चाळवाचाळव करीत ती मुलगी अभयकडे वळून म्हणाली ' खुर्चीवर बसलेल्या माणसाइतकींच झोंपाळ्यावर बसलेली माणसंही सनातनी असतात ! '

तिच्या धिटाईचें कौतुक वाटून अभयनें हंसत विचारलें ' तीं कशीं ? '

‘ झोंपाळा हालचाल करतो हें खरं! पण तो जितका पुढं जातो, तितकाच मागं येतो. त्याच्यावर बसलेल्या माणसांची कांहीं खरी प्रगति होत नाहीं!’

बोलतांना ती मुलगी बिलकुल अडखळली नाहीं! मात्र बोलणें संपतांच अभयवरली आपली दृष्टी टेबलामागें असलेल्या महात्मा गांधींच्या फोटोकडे तिनें वळविली.

‘ प्रगति म्हणजे काय ?’ हा प्रश्न विचारून तिला अडवून पहावें, असा विचार अभयच्या मनांत येऊन गेला. पण स्वतःच्या शाब्दिक पराजयापेक्षां त्या मुलीच्या चतुर उत्तराचें कौतुकच त्याला अधिक वाटलें. तो तिच्याकडे निरखून पाहूं लागला.

तिचा वर्ण काळासांवळाच होता. पण आपला काळेपणा लपविण्याकरितां पुष्कळ मुली चेहऱ्याची जी रंगरंगोटी करतात ती तिनें मुळींच केली नव्हती. उन्हानें, वाऱ्यानें आणि घामानें असल्या गिलाव्यांतला कांहीं भाग उडून गेल्यावर मुलींचे चेहरे चुना निखळलेल्या भिंतीसारखे विद्रूप दिसतात हें अभयनें पाहिलें होतें. मालेसारखी सुंदर मुलगी सुद्धां नुसतें फिरायला जायचें असलें तरी रंगपटांतल्या नटीप्रमाणें किती तरी वेळ नटत बसते, हाही अनुभव त्याला होता. त्यामुळें आपल्या स्वरूपाला मुलामा देण्याच्या फंदांत न पडणाऱ्या या मुलींत कांहीं तरी असामान्य असलें पाहिजे असें त्याला वाटलें.

अभय स्तब्ध बसलेला दिसतांच ती परत त्याच्याकडे पाहूं लागली. अभयला वाटलें—गालांतल्या गालांत ती हंसतही असावी! तिच्या उजव्या गालावर पुन्हां खळी दिसूं लागली होती.

तिचें नाक थोडेसें नकटें आहे, कपाळही किंचित् पुरुषी थाटाचें आहे हें अभयच्या लक्षांत यायला वेळ लागला नाहीं. मात्र तिच्या केंसांतली पिंगट झांक त्याला मोहक वाटली नि तिचे डोळे—

अभय मनांत म्हणाला–She is all eyes. कुठल्या तरी इंग्लिश कादंबरींतल्या नायिकेचें वर्णन वाचतांना हें वाक्य त्याला मौजेचें वाटलें होतें. त्यावेळीं नायिकेची मूर्ति मात्र त्याच्या डोळ्यांपुढें मुळींच उभी राहिली नव्हती. ती नायिका आतां आपल्यापुढें मूर्तिमंत बसली आहे असा त्याला भास झाला.

त्याचें मन त्या कादंबरींतल्या नायिकेचा स्वभाव कसा आहे, याबद्दल विचार सुद्धां करूं लागलें असतें--

पण मोतिराम हातांतला जाडा ग्रंथ दाखवीत म्हणाला ' काय सुंदर पुस्तक आहे ! '

पुस्तक न वाचतांच त्याला सुंदर म्हणण्याची मोतिरामाची हातोटी अभयला अपरिचित नव्हती. त्यानें त्या पुस्तकाच्या नांवाची सुद्धां चौकशी केली नाहीं. तो टेबलावरल्या चोपड्यांच्या ढिगाकडे पाहूं लागला.

मोतिरामानें आपलें वक्तव्य सुरू केलें--' अभय, परीक्षेची फीस्ट मिळायला हवी हं ! '

' अलबत् ! आमची आक्का इतका सुंदर स्वयंपाक करते कीं-'

' परीक्षेची फीस्ट म्हणजे कांहीं श्राद्धपक्ष आहे वाटतं ? आपण नाहीं बुवा घरीं जेवायला तयार ! इराणी लोक आपली मातृभूमि सोडून या पवित्र देशात आले आहेत, कोंपऱ्या कोंपऱ्यावर आपल्याकरितां त्यांनीं दुकानं थाटलीं आहेत ! त्यांच्या स्वार्थ-त्यागाचं चीज आपण अवश्य केलं पाहिजे. फीस्ट कॅफेंतच झाली पाहिजे ! '

अभय मधेंच म्हणाला ' माझ्या घरचं जेवण ज्यांना आवडेल त्यांनीं यावं ! ज्यांना आवडणार नाहीं त्यांना कांहीं मी आग्रहानं ओढून आणणार नाहीं ! '

हें उत्तर ऐकून मोतिराम जरा सरदलाच. विषय बदलण्याच्या हेतूनें तो म्हणाला ' फीस्टचं मग ठरवूं ! आधीं यांचं काम तर करून टाक ! '

अभयनें त्या मुलीकडे पाहिलें.

' मी तिकीटं खपवायला आलें आहे ! ' ती म्हणाली.

' कसलीं ? '

' नाटकाचीं ! आमच्या शाळेच्या मदतीसाठीं नाटक करतोंय् आम्ही ! '

' कुठलं ? '

सोन्याचा कळस ! '

'त्या नाटकांत बिजलीचं काम या स्वतः करणार आहेत!' मोतिराम अर्धंच म्हणाला.

अभय स्तब्ध राहिलेला पाहून मोतिरामानें प्रश्न केला 'नायकाचं काम कोण करणार आहे, ठाऊक आहे कां?'

'कोण? तूं करणार असलास तर आपण एक सुद्धां तिकीट विकत घ्यायला तयार नाहीं!'

अभयची थट्टा मोतिरामाला चांगलीच झोंबली! पण त्या चिमब्यानें आपल्याला जणुं कांहीं गुदगुल्या झाल्या असें दाखवीत तो म्हणाला 'यांचा थोरला भाऊ बिट्टू कृष्णा होणार आहे.'

'काय करतात ते?'

'महिन्यापूर्वी विलायतेहून आले आहेत! फोटो सुद्धां आला होता त्यांचा वर्तमानपत्रांत—कांचन कुलकर्णी!'

आपल्या समोर बसलेली मुलगी श्रीमंत असून तिचें आडनांव कुलकर्णी आहे हें आतां अभयला कळलें!

त्याचें जागृत झालेलें कुतूहल म्हणत होतें—या मुलीचें नांव काय बरें असावें? हा मोतिराम सूट घालून मिरवितो! पण एकाद्याच्या घरीं कुणाला घेऊन गेलें तर आधीं पाहुण्याची ओळख करून द्यायला हवी ही साधी गोष्ट सुद्धां बिचाऱ्याला कळत नाहीं!

अभय त्या मुलीला म्हणाला 'खुर्चीचीं दोन तिकीटं द्या!'

'एक तुझं नि एक मालेचं वाटतं?' मोतिरामानें हंसत विचारलें,

'अं हं! एक माझं नि दुसरं आक्काचं!'

ती मुलगी तिकीटें फाडूं लागली.

इतक्यांत आक्का एका लांकडी ट्रेमध्यें चहाचे तीन पेले घेऊन बाहेर आली. तिच्या हातांतून ट्रे घेत अभय म्हणाला 'बैस न आक्का!'

आक्का झोंपाळ्यावर बसली. अभयनें एक पेला त्या मुलीच्या हातांत दिला. दुसरा मोतिरामाला देऊन तो झोंपाळ्यावर बसण्याकरतां वळला.

पण आपल्याला झोंपाळ्यावर बसणें शक्य नाहीं असें त्याला आढळून आलें. त्याची पाठ वळली असतांना ती मुलगी हळूच खुर्चीवरून उठून झोंपाळ्यावर आक्कापाशीं जाऊन बसली होती. अर्थात् अभयला तिच्या खुर्चीवर बसावें लागलें.

त्या मुलीच्या या लाघवीपणाचें आक्कालाही कौतुक वाटलें असावें. सकाळीं दुसऱ्यांदा चहा घ्यायचा नाहीं असा नेम असूनही तिचें मन मोडूं नये म्हणून तिनें बशींत ओतून दिलेला चहा आक्कानें घेतला.

रंगी बेरंगी हातरुमालानें आपलें तोंड पुशीत मोतिराम म्हणाला ' आक्का, या लता कुलकर्णी ! '

' लता ? ' चहाचा घोट घेण्याकरितां अभयनें ओठापाशीं नेलेला पेला हातांतल्या हातांतच राहिला.

अभयच्या स्वरांतलें आश्चर्य लतेलाही जाणवलें असावें !

मोतिराम अभयला म्हणाला ' यांचं खरं नांव निराळंच आहे ! '

' म्हणजे हें आपलं सिनेमानटीसारखं जाहिरातीसाठीं घेतलेलं नांव आहे कीं काय ? '

' तसं नाहीं रे ! पण यांना लता म्हणणें म्हणजे यांची योग्यता कमी करण्यासारखं आहे ! साधी लता नाहीं ही ! ' खो खो करून मोतिराम हंसला.

आक्का म्हणाली ' हेमलता, पुष्पलता, असं कांहींतरी नांव असेल ! '

आपण एकादें विलक्षण रहस्य सांगत आहोंत असा चेहरा करून मोतिराम उत्तरला

' छेः ! यांचं नांव कल्पलता आहे ! '

अभयच्या मुद्रेवर मघापेक्षांहि अधिक आश्चर्य प्रगट झालें. बहीण-भावंडांमधें थोडेसें डोळ्यांचें संभाषण झालें असाही लतेला भास झाला. ती

क्षणभर गोंधळली. पण लगेच अभयकडे वळून ती म्हणाली ‘ माझ्या नांवाचं इतकं कांहीं नवल वाटायला नको तुम्हांला ! ’

‘ कां ? ’

‘ तुमचं नांवही तसंच आहे कीं ! ’

अभय हंसून म्हणाला ‘ माझे वडील खेड्यांत शाळामास्तर होते. तिथं मासिक मनोरंजनाखेरीज दुसरं कांहीं वाचायला मिळत नसे त्यांना ! आणि मनोरंजनांत त्यावेळीं बंगाली कादंबऱ्यांचीं भाषांतरं येत असत ! त्यांतलं कुठलं तरी नांव त्यांना आवडलं होतं. तेंच त्यांनीं मला ठेवलं झालं ! ’

‘ असं नाहीं कांहीं ! ’ आक्का अभयला थांबवून म्हणाली. ‘ दादांना भित्रे-पणाची मोठी चीड होती. मामलेदाराला भिणारे व्यापारी, इन्स्पेक्टराला भिणारे मास्तर आणि पोलिसाला भिणारे शेतकरी पाहिले कीं ते अगदीं संतापून जात. ते नेहमीं म्हणायचे—आमच्यांतला भित्रेपणा नाहींसा होईपर्यंत आम्ही गुलामच राहणार ! अभय हें नांव कांहीं त्यांनीं उगीच ठेवलं नाहीं याला ! ’

अभयच्या नांवाचा हा उगम लतेला मोठा मनोरंजक वाटला असावा ! ती हंसत हंसत अभयला म्हणाली ‘ तुमच्या वडिलांनीं अगदीं बरोबर नांव ठेवलं तुमचं ! ’

‘ कशावरनं ? ’

‘ सावरकरांच्या त्या सभेंत मोठी दंगल झाली होती ना ? तिथं एक लहान मुलगी अगदीं चेंगरून जाऊं लागली. त्या गर्दींत घुसून तिला कुणी उच-ललं तें— ’

‘ तुम्ही होतां त्या सभेला ! ’

‘ हो ! नि त्या सभेला नसते तरी वडिलांनीं तुम्हाला अगदीं योग्य नांव ठेवलंय् असंच म्हटलं असतं मी ! ’

‘ मी बऱ्याच लढाया मारल्या आहेत असा तुमचा समज—म्हणजे गैरसमज—झालेला दिसतो ! ’

लता हंसत म्हणाली ‘ आमच्या शेजारचा एक मुलगा शाळेंत जातो. परवां त्याची निबंधाची वही पाहिली मी. त्यांतले विषय फार फार आवडले

मला—'झांशीची लक्ष्मीबाई', 'गरीबाच्या घरांतल्या भाकरीचें आत्मवृत्त', 'शर्यतीचा घोडा आणि टांग्याचा घोडा यांचा संवाद'—सारे विषय कसे छान आहेत! हे विषय पाहून माझ्या मनांत आलं--आपण उगीच लवकर मॅट्रिक झालों! आमचा ड्रायव्हरही तुमच्या गोष्टी सांगत होता. दिवाळीच्या सुट्टींत तुम्हीं त्याच्या खेड्यांत गेला होतां म्हणे—'

लतेनें फाडून ठेविलेलीं तिकीटें अभयनें आक्काच्या हातांत दिलीं. आक्का पैसे आणण्याकरितां आंत उठून गेली.

लतेकडे रोखून पाहत अभय म्हणाला 'माझं नांव अगदीं सार्थ आहे असं सिद्ध करण्याचा तुम्हीं चंगच बांधलेला दिसतो. पण मला वाटतं-तुमचं नांव माझ्यापेक्षांही अधिक अन्वर्थक आहे!'

'तें कसं?'

टेबलावर पडलेले मासिकाचे दोन अंक उचलून ते अभयनें उघडले आणि लतेच्या हातांत दिलें.

लतेच्या मुखावर आनंदाची एक विलक्षण लाट उचंबळली-पण लगेच त्या लाटेवर लाजेची लाली चमकूं लागली.

झोंपाळ्याच्या कडीला धरून ती झोंके घेऊं लागली.

मोतिराम आपल्या जागेवरून उठला आणि त्यानें लतेजवळचा एक अंक उचलून तो उघडला. खो खो हंसत तो म्हणाला 'काय पण तुमच्या गोष्टींचं नांव आहे लताताई! **दोन मेघ.** त्या खांडेकराचं मोठं वेड आहे यांना अभय! पण मी म्हणतों—चार कोट्यांखेरीज आहे काय खांडेकराच्या लिहिण्यांत? आणि काय एक एक नांवं आहेत पुस्तकांचीं! दोन ध्रुव-दोन मनं! छानसं विडंबन करणार आहे मी याचं. दोन गाढव हें आपलं आमच्या कादंबरीचं नांव!'

'कसं बरोबर नांव शोधून काढलंत! एक लिहिणारा नि दुसरा तो छापणारा! मिळून—' गंभीरपणानें लता उद्गारली.

लतेचा हा टोमणा अभयला मनांतून आवडला. पण जणुं कांहीं आपण लतेचें बोलणें ऐकलेंच नाहीं असें दाखवीत तो मोतिरामाला म्हणाला 'आलोंच हं मी!

अभय आंत जाऊन पाहतो तों स्वयंपाकघराच्या मागच्या खिडकींतून आक्का चारुला कांहींतरी सांगत होती.

तो आक्कापाशीं गेला तेव्हां चारु आपल्या घराच्या मागच्या खिडकींतून अदृश्य झाला होता.

'तीं तिकीटं आहेत हं आक्का. पास नव्हेत!' अभय थट्टेनें उद्गारला.

'म्हणूनच चारुला हांक मारली मी!'

'कां?'

'आजोबांच्याकडून दोन रुपये घेऊन यायला सांगितलं त्याला!'

'म्हणजे?'

'घरांत एकच रुपया शिल्लक आहे!'

'पण या महिन्याचा पगार--'

अभय मधेंच थांबला. हंगामी शिक्षक म्हणून आपल्याला आक्टोबरचा पगारच मिळालेला नाहीं हें आतां त्याच्या लक्षांत आलें. दिवाळीच्या सुट्टींत आपण केळीपाडीं पहायला गेलों. परत आलों तो शाळा--परीक्षेचा निकाल—

आपल्याला बँक बुकांतून पैसे काढून आणण्याची आठवणही राहिली नाहीं.

तो हंसत म्हणाला 'आजोबांचा शेजार आहे म्हणून बरं! नाहीं तर--'

'आक्का--आक्का-' अशी हांक मारीत चारु धांवतच आला. त्यानें आपल्या उजव्या हाताचीं मूठ आक्काच्या मुठींत हळूच दिली. त्याला उचलून घेत अभय म्हणाला 'मोठा लबाड आहेस हं तूं चारु!'

चारु गंभीर मुद्रेनें म्हणाला 'आजोबा म्हणतात-लबाडी करूं नये, खोटं बोलूं नये—'

'चॉकोलेटचा हट्ट धरूं नये-होय ना?'

आक्कानें बाहेर जाऊन लतेच्या हातांत पैसे ठेवले.

अभय आणि आक्का तिला पोंचविण्याकरितां दारापर्यंत गेलीं. मोतिराम पुढें चालला होता.

येतें हं ' म्हणून लतेनें मागें वळून दोघांना नमस्कार केला.

अभयच्या डाव्या खांद्यावर बसलेला चारु उजवा हात खालींवर करीत बाय, बाय ' म्हणून तिला निरोप देऊं लागला.

लतेला त्याचें कौतुक वाटून ती म्हणाली ' येतोस कां माझ्या बरोबर मोटारींतून फिरायला ? ' चारूनें अभयच्या अंगावरून लतेकडे झेंप घेतली. त्याला घेण्याकरितां दोन्ही हात पसरून ती पुढें आली.

झाडावरली खार वाटेनें जाणाऱ्या माणसाकडे टकमक पाहत असते. पण चाहूल जराशी जवळ आली कीं अंग मुरडून नि शेंपटी फुलवून ती लपायला धांवूं लागते.

चारूनेंही तसेंच केलें आतां.

लता हात पसरून पुढें आलेली पाहतांच एकदम अंग चोरून तो अभयला चिकटून बसला.

लतेच्या हातांत चारूच्या ऐवजीं अभयच आला.

त्याच्या अंगाला स्पर्श होतांच ती क्षणभर गोंधळली. झटकन् तिनें आपले हात मागें घेतले.

' कशी झाली एका माणसाची जम्मत ! ' म्हणून चारु टाळ्या पिटीत होता.

लतेनें हळुच आक्काकडे पाहिलें. आक्काही हंसत होती.

तिनें अभयकडे पाहिलें. तो शांतपणानें म्हणाला ' एक गोष्ट विसरूनच गेलों होतों मी. तुमची ती **घरटें आणि धरणीकंप** फार आवडली मला !

मोतिराम थोडा पुढें जाऊन वर्तमानपत्र वाचीत उभा राहिला होता. एकदम मान वर करून तो म्हणाला ' कोण आवडली रे तुला ? ती माला असेल ! मोठा भाग्यवान आहेस बुवा ! '

दुसऱ्याच क्षणीं मोतिरामाला आपण अभयपेक्षांही भाग्यवान आहों असें वाटलें. बोलतां बोलतां तो थांबला.

शेजारच्या बिऱ्हाडाच्या दारांत एक तरुण विधवा येऊन उभी राहिली होती !

# ४

## देवांच्या मदतीस चला तर

अभय घाईघाईनें वह्या तपासूं लागला.

पण त्याचें लक्ष कांहीं नेहमींप्रमाणें आपल्या कामांत लागेना.

त्याला वाटलें—आपण रात्रीं फार वेळ जागे राहिलों होतों. जाग्रणामुळें आपलें शरीर आळसावलें आहे. थोडा चहा घेतला कीं हुषारी येईल.

स्वयंपाक घरांत आक्का भाजी चिरीत बसली होती.

अभय दारांत दिसतांच ती म्हणाली ‘ अगदीं लवकर करते हं जेवायला ! ’

‘ चहा दे थोडा आधीं मला ! ’

‘ आतां पुन्हां चहा घेतलास तर संध्याकाळीं दूध घ्यावं लागेल हं ! दिवसांतून तीनच वेळां चहा घ्यायचं कबूल केलं आहेस तूं ! आहे ना ध्यानांत ? ’

अभयला बी. ए. च्या वर्गांतले ते दिवस आठवले. गणित घेऊन पहिल्या वर्गांत येण्याची खात्री असतांना सुद्धां आपण तो विषय सोडून दिला. इतिहास

आणि अर्थशास्त्र हाच आजच्या समाजाच्या जिव्हाळ्याचा विषय आहे असें आपल्याला वाटूं लागलें होतें. नवा विषय घेऊनही पहिल्या वर्गांत यायची आपली महत्वाकांक्षा होती. रात्रीं तीनतीनदां चहा पिऊन आपण जाग्रणें केलीं. आपली तयारी उत्तम झाली होती. पण अर्थशास्त्रांतल्या प्रश्नांचीं निव्वळ पुस्तकी उत्तरें आपण लिहिलीं नाहींत. त्याचा परिणाम आपला पहिला वर्ग जाण्यांत झाला !

बी. ए. च्या निकालानंतर आपल्याला निद्रानाशाचा विकार जडल्यासारखें झालें. तो चहाचा अतिरेक–तीं जाग्रणें–पथ्यपाण्यानें पुढें बरें वाटूं लागलें खरें ! पण डॉक्टरांनीं चहा पिऊन जाग्रणें करण्याबद्दल आपली सडकून हजेरी घेतली. एल्. एल्. बी. च्या परीक्षेच्या वेळीं आपण जाग्रणें करून पुन्हां प्रकृति बिघडवून घेऊं म्हणून आक्कानें आपल्याकडून आधींच कबुली करून घेतली. आपणही दिवसांतून तीन वेळा पेक्षां जास्ती चहा पिणार नाहीं असें तिला सांगितलें. तो नियम मोडण्याची आपल्यावर पाळीही आली नाहीं कधीं !

अभय पुन्हां टेबलापाशीं येऊन बसला. एक वही काढून त्यानें ती तपासली. तांबड्या शाईनें रंगलेलें तें पान उघडें टाकून तो खुर्चीत मागें रेलला.

अंगाला आळेपिळे देऊन गठ्ठ्यांतली अगदीं वरची वही उचलण्याचा त्यानें प्रयत्न केला. पण त्याची दृष्टी टेबलावर पडलेल्या वहीवरच खिळली.

त्या वहींत तांबड्या शाईनें केलेली खाडाखोड किती ठळकपणानें नजरेंत भरत होती !

त्याच्या मनांत आलें—एका विद्यार्थ्याला शुद्धलेखन शिकविण्याकरितां इतक्या चुका दुरुस्त कराव्या लागतात. मग समाजांतले दोष नाहींसे करण्याकरितां—

रक्तानें खोडल्याशिवाय समाजाला स्वतःच्या भयंकर चुका कधींच कळत नाहींत !

रक्त ?

कुणाचें रक्त ?

भिंतीवरल्या गांधींच्या फोटोकडे पाहून तो हंसला. आपल्या मनांत आलेली कल्पना या फोटोला कळली असती तर त्याला वाचा फुटून तत्काळ त्यानें आपला धिक्कार केला असता असें त्याला वाटलें.--

हंसतां हंसतां त्याच्या डोळ्यांपुढें कांहीं स्मृति-चित्रांच्या रेषा स्पष्ट होऊं लागल्या.

दिवाळीच्या सुट्टींत खेड्यांपाड्यांतून फिरतांना भर सुगीच्या दिवसांत सुद्धां शेतकऱ्यांचीं कुटुंबें किती कष्टानें दिवस काढीत असतात हें त्यानें पाहिलें होतें!

शेतकरी कितीही कष्ट करो, त्याला बायकोला नवें लुगडें घेण्याचें त्राण असत नाहीं, मुलाला चार अक्षरें शिकविण्याची हिंमत होत नाहीं, घरांत कुणी मरायला लागलें तरी डॉक्टर आणण्याची ताकद उरत नाहीं. एकादा दुसरा खेडेगांवांत चालणारा धंदा निर्माण करून किंवा सूत काढण्याचा यज्ञ करून हा प्रश्न आतां सुटणार नाहीं, हें गेल्या सुट्टींत त्याला प्रतिक्षणीं पटलें होतें.

या प्रवासांत रात्रीं कुठल्या तरी झोंपडींत घोंगडीवर अंग टाकून अभय पडत असे. उद्यांची भ्रांत असणारा त्याच्या शेजारीं निजलेला झोंपडीचा मालक हां हां म्हणतां झोंपीं जाई. पण डोळे मिटून घेतले, आक्काच्या किंवा मालेच्या सहवासांतल्या गोड क्षणांची आठवण केली, उद्यां वकील झाल्यावर करायच्या समाजसेवेचीं रम्य चित्रें रेखाटलीं, कांहीं कांहीं केलें तरी अभयला झोंप येत नसे.

त्याच्या डोळ्यांपुढें गांधी उभे राहत. तो तीन वर्षांचा असतांना असहकारितेची चळवळ सुरू झाली होती. तिची त्याला पुसट सुद्धां आठवण नव्हती. पण पुढें घरोघर चरके फिरूं लागले, तेव्हां छोट्या अभयनेंही चरक्याचा हट्ट धरला होता. तो इंग्रजी पांचवींत असतांना मिठाचा सत्याग्रह झाला. त्यांत सामील होण्याकरितां अभयनें आक्कापाशीं अगदीं हट्ट धरला होता. त्याच्या सर्व आवडत्या मास्तरांनीं आपलें वजन खर्च केलें नसतें, तर त्यावेळीं आक्काचें मन मोडून तो घरांतून निघूनही गेला असता!

आयुष्यांतल्या या जुन्या भावना जाग्या होऊन त्या झोंपडींत अभयच्या कानांत कुजबुजूं लागत—

'गांधींच्या मार्गानं जाऊनच आपल्या मातृभूमीचं कल्याण होणार आहे- अशी पूर्वी तुझी श्रद्धा होती ना ? रशियाविषयींचीं पांच पन्नास पुस्तकं वाचून, मूठभर समाजवादी लोकांचीं भाषणं ऐकून, तुझ्या डोक्यांत विचारांचं काहूर उठायला लागलंय् ! पण लक्षांत ठेव—पसतीस कोटि लोकांच्या या देशांत अनेक धर्म आहेत, शेंकडो जाती आहेत, भयंकर अज्ञान आहे, कल्पनातीत दारिद्र्य आहे. बंदुकी घेतलेले चार पोलिस दिसले कीं लोक मेंढरांप्रमाणं मुकाट्यानं खालीं मान घालून चालूं लागतात. गांधींचा सत्य अहिंसेचा मार्गच इथं निःशस्त्र क्रांति घडवून आणूं शकेल !'

या भावनांना उत्तर देणारे विचार उसळून म्हणत 'गांधी या व्यक्तीचा देशाला फार मोठा उपयोग झाला यांत संशय नाहीं. गांधींनीं पंचा नेसून पोषाखी मोठेपणाचं बंड मोडून टाकलं, सत्ताधारी संगिनींना निःशस्त्र प्रजा किती निर्भयपणानं तोंड देऊं शकते हें कायदेभंगाच्या मोहिमेंत सिद्ध केलं, हरिजनांच्या चळवळीला चालना देऊन समाजांतल्या खालच्या थरांकडे जनतेची दृष्टि वळविली—

हें सारं खरं आहे पण—

पण एवढ्यानं आजचे बिकट सामाजिक प्रश्न कसे सुटणार ? इकडे बेकारीचा वणवा पेटला आहे आणि तिकडे गांधी खादीवर जोर देत आहेत. खादीच्या पांढऱ्या ढगांत हा वणवा विझविण्याचें सामर्थ्य आहे असं गांधींना वाटतं ! मोठ्या मनुष्याचे भ्रमही मोठेच असतात ! गांधी समाजाचा रोग होमिओ-पाथीच्या गोळ्या देऊन बरा करूं पाहत आहेत ! पण शस्त्रक्रियेवांचून या रोगाचं निर्मूलन होणार नाहीं !'

अभयची तंद्री समोर दिसणाऱ्या वहींतल्या तांबड्या शाईतल्या खोडा-खोडीनें भंग पावली. तो मनांत म्हणाला 'गांधींना रक्ताचा थेंब सुद्धां जमिनीवर पडायला नकोय्. लाखो लोकांचीं रक्तं आंतल्या आंत जळताहेत हें मात्र त्यांना—'

डोळे मिटून घेऊन तो स्वस्थ बसला. 'रात्रीं फार जागलं म्हणजे असं होतं हं !'

आक्काचे हे शद्ब ऐकतांच अभयनें दचकून मागें पाहिलें.

ती चहा घेऊन आली होती. तिच्या हातांतून चहाचा पेला घेत अभय म्हणाला ‘ आतां कांहीं संध्याकाळीं चहा मिळणार नाहीं आम्हांला ! ’

‘ इथं नाहीं तर नाहीं ! मालेच्या घरीं मिळेल कीं ! ’

आक्का निघून गेल्यावर अभयचें विचारचक्र सुरू झालें—

आपली आक्का किती प्रेमळ आहे. मानवजातीच्या मनांतल्या या प्रेम-भावनेलाच आवाहन देण्याचा गांधी प्रयत्न करीत आहेत.

पण प्रेमाची ही भावना प्रत्येकांत असली तरी ती कांहीं व्यक्तीपुरतीच मर्यादित राहणार ! आणि एका व्यक्तीचें दुसऱ्या व्यक्तीवरलें उत्कट प्रेम तरी निःस्वार्थी असतें कां ?

छेः ! आपल्या आक्कासारखीं माणसें फार विरळा. प्रेम निःस्वार्थी नाहीं हेंच खरें ! नाहींतर काल माला आपल्याशीं अशी वागली असती कां ?

गेलीं तीन वर्षें आपली नि मालेची ओळख आहे. एकाद्या तोंड ओळ-खीच्या मनुष्याला आपण कालचा निरोप सांगितला असता तर त्यानें सुद्धां अगदीं धांवत जाऊन तो आक्काला सांगितला असता ! आनंदाची बातमी सांगण्यांत सुद्धां विलक्षण आनंद असतो. नाहीं कां ?

मालेनें तर अगदीं नाचत येऊन आपण पास झाल्याचें आक्काला सांगायला हवें होतें. आपला निकाल ऐकायला आक्का किती उत्सुक झाली असेल याची काय तिला कल्पना नव्हती ? शिक्षक म्हणून, स्नेही म्हणून––

छेः ! आतां आपलें मालेशीं त्याहूनही जवळचें नातें आहे. दत्तोपंतांचें नि आपलें प्रत्यक्ष बोलणें झालें नसलें तरी त्यांच्या घरांतलीं सारीं माणसें भावी जांवई म्हणून आपल्याकडे पाहतात हें काय सिद्ध करायला हवें ?

चहा न घेतां चुकून आपण निघून आलों तर मालेच्या आईचा जीव कसा कासावीस होतो ! ‘ अभय, तुम्ही पास झालांत कीं मालाही पास होणार आहे ’ असें तिची धाकटी बहीण अलीकडे पुनः पुन्हां म्हणते ! त्याचा अर्थ काय उघड करून सांगायला हवा ?

आणि दिवाळीची सुट्टी सुरू झाली तो दिवस !

आपण सारी सुट्टी जवळचीं खेडीपाडीं पाहण्यांत घालवायचें ठरविलें. दुसरे दिवशीं पहांटे आपण निघणार होतों. माला आणि आपण खूप लांब फिरायला गेलों. अंधार पडला तरी टेकडीवरल्या एका बाजूला खडकावर आपण दोघें तसेंच बसलों होतों.

' खूप उशीर झाला. चल उठ ! ' असें आपण म्हटलें तरी माला जागची हालेना.

' रात्रभर इथंच बसणार आहेस कीं काय ? ' आपण थट्टेनें विचारलें.

ती ' हुं ' म्हणाली.

आपण म्हटलें ' इथं शपथेला सुद्धां प्रकाश नाहीं कुठं ! '

' आहे ना ? ' ती उत्तरली.

' कशाचा ? '

' चांदण्यांचा ! '

' चांदण्यांना फारसा प्रकाश नसतो ! '

' आकाशांतल्या चांदण्यांना नसतो. पण पृथ्वीवरल्या दोन चांदण्यांना मात्र—'

लाजेनें ती पुढें बोलूं शकली नाहीं. पण थोड्या वेळानें ' तुला भीति नाहीं वाटत इथं ? ' असें आपण विचारलें तेव्हां तिनें आपल्या नांवावर मोठी गंमतीदार कोटी केली—' अभय जवळ असल्यावर कुणाला भय वाटेल का ? '

खूप वेळानें आपण टेंकडी उतरूं लागलों. अंधारांत नीट कांहींच दिसत नव्हतें. एका खडकावरून तिचा पाय लटकन घसरला असें वाटून आपण झटकन् तिचा हात धरला. आपण जोरानें ओढल्यामुळें तिचा तोल गेला. ती खालीं पडूं नये म्हणून आपण तिला चटकन् घट्ट धरलें. घाबरून गेल्यामुळें तिनें आपलें डोकें आपल्या खांद्यावर टेकलें. तिच्या केंसांचा तो मृदुस्पर्श ! जणुं कांहीं जाईजुईंची वृष्टिच आपल्या स्कंधावर होत होती. त्या पुष्पराशींचा तो

मधुर पण किंचित् उन्मादक सुगंध ! त्या एका क्षणांत युगायुगांतला आनंद सामावला होता.

या मधुर स्मृतींत रंगून गेलेल्या अभयच्या मनाला मालेचें कालचें वर्तन पुनः पुन्हां बोंचूं लागलें. नकळत कल्पलतेची मूर्ति त्याच्यापुढें उभी राहिली. त्याला वाटलें--माला ही नुसती संगमरवरी पुतळी आहे. पण लता ? लता मालेइतकी सुंदर नसली तरी ती मालेपेक्षां अधिक बुद्धिवान आहे, अधिक सहृदय आहे.

तिच्या गोष्टी किती सुंदर आहेत !

वावटळींत उडणाऱ्या एखाद्या पानासारखी आपल्या मनाची स्थिति झाली आहे असें अभयला वाटलें. स्वतःचाच राग आला त्याला. तो निश्चयानें वह्या तपासूं लागला. इतक्यांत आक्कांची हांक आली ‘ पाणी उपसलंय् रे तुझं ! ’

× × × ×

मधल्या सुट्टींत पोस्टांतून पैसे आणण्याकरितां अभयनें बँक बुक बरोबर आणलें होतें. सुट्टी होतांच तो बाहेर जायला निघाला तेव्हां एक शिक्षक म्हणाले ‘ अहो अभय, चहा घेऊन जा ना ! ’

दुसरे उद्गारले ‘ पांच मिनिटं उशीर झाला म्हणून कांहीं बँक बुडत नाहीं ! अहो, सरकारी बँक आहे ती ! ’

‘ मला चहा नकोय् आज ’ असें उत्तर देऊन अभय निघून गेला तेव्हां सर्वांनाच थोडेंफार आश्चर्य वाटलें. सकाळीं घरीं, दुपारीं शाळेंत आणि संध्याकाळीं मालेच्या घरीं अभयचा चहा होत असतो ही गोष्ट अगदीं जगजाहीर झाली होती. अर्थात् अभय पोस्टाकडे गेला नसून दुसरीकडेच कुठें तरी गेला असावा अशी कित्येकांना शंका आली.

पुढचे दांत पडलेले एक पन्नाशीच्या घरांतले शिक्षक म्हणाले ‘ दुसरीकडे कुठं जाणार स्वारी ! पहिलीकडेच गेली असेल ! दत्तोपंत देशपांड्यांचं घर पोस्टापाशींच आहे कीं !

एका तरुण शिक्षकांनीं त्यांना दुजोरा दिला ' नि ती बँक कुठली ठाऊक आहे कां ? दत्तोपंतांची ती कॉलेजांत जाणारी मुलगी–माला ! '

' या बँकेंतून अभय काय घेऊन येणार आहे बुवा ? ' तिसऱ्या सद्‌गृहस्थांनीं प्रश्न केला.

' काय ? अहो या बँकेंतून कितीही रक्कम उचलली तरी मूळ भांडवलाला कांहीं धक्का लागत नाहीं ! '

या बोलण्यानें उत्पन्न झालेला हंशा चहा तयार होईपर्यंत चालू राहिला होता.

× × × ×

आपल्या पाठीमागें आपल्या सहकारी शिक्षकांत काय काय बोलणीं चाललीं असतील याची अभयला कल्पना नव्हती असें नाहीं. पण त्याचें मन एकसारखें मालेविषयीं विचार करीत होतें.

आज संध्याकाळीं आपण तिच्या घरीं जावें कीं जाऊं नये ?

पायांत मोडलेलें कांट्याचें टोंक सलत राहावें तसें मालेचें कालचें वर्तन अभयच्या मनाला बोंचत होतें.

पोस्ट–ऑफिसपाशीं सायकलवरून उतरून तो सेव्हिंग्‌–बँकेच्या खिडकी-पाशीं गेला. पैसे काढण्याचा एक फॉर्म घेऊन त्यानें तो भरला. मास्तरांनीं दिलेल्या पन्नास रुपयांच्या नोटा मोजून त्यानें पुस्तकांतल्या रकमेकडे पाहिलें—

सातशेंपांच रुपये, आठ आणे, नऊ पै !

त्या आंकड्याच्या मागें रात्रीं अपरात्रीं बाळंतिणीच्या उशाशीं जागणारी आक्काची मूर्ति उभी आहे असा त्याला भास झाला.

सायकलकडे जाण्याकरितां तो वळला.

त्याचा आपल्या डोळ्यांवर विश्वासच बसेना.

माला !

मालेचें पोस्टांत काय बरें काम असावें ? कालही ती इथेंच भेटली होती आपल्याला ! वाटलें होतें--आपली तार आली कीं नाहीं हें पहायला ती आली होती !

तिच्याकडे न पाहतां अभय पुढें जाऊं लागला.

मधुर स्वरांतली हांक आली-' अभय, अभय--'

अभय थांबला.

माला जवळ येऊन म्हणाली 'एक माणूस खूप खूप रागावलंय् ! होय ना ?'

मालेचा खेळकरपणा पाहतांच अभयचा निम्मा राग नाहींसा झाला. तो तिच्याकडे वळून म्हणाला.

' रागवायचं कशाबद्दल ? कुणाला कुठलं काम सांगायचं हें मला कळायला हवं होतं ! '

मालेच्या मुद्रेवर एक करुण छटा येऊन गेली. तिचे डोळे भरून आले.

आपण उगीच तिला टाकून बोललों असें अभयला वाटलें.

त्यानें मालेकडे पाहिलें. एकाद्या भ्यालेल्या सशासारखे तिचे डोळे दिसत होते.

दोघेंही जरा बाजूला गेलीं.

अभयनें विचारलें ' पोस्टांत कशाला आलीस ? तुझा रिझल्ट बिझल्ट आहे कीं काय आज ? '

' हं ! '

' तार आली कां ? '

' अजून नाहीं ! '

' नापास झाली असशील ! '

' तर तर-मी कुणाच्या हाताखालीं शिकतेंय् ठाऊक आहे का ? '

' कुणाच्या ? '

‘ अभय कोल्हटकर, बी. ए. एल्. एल्. बी. मोठे वकील आहेत हं ते! त्यांचं महिन्याचं प्रॅक्टिस किती आहे याची कुणाला कल्पना सुध्दां यायची नाहीं!’

‘ मला आहे पूर्ण कल्पना ! सांगू ? ’

‘ हं ! ’ पाठीवरला वेणीचा शेंपटा उजव्या खांद्यावरून पुढें घेऊन तो हातानें चाळवीत माला लाडकेपणानें म्हणाली.

‘ महिना ४० रुपये प्रॅक्टिस आहे तुझ्या या वकिलाचं. ऑक्टोबरचं प्रॅक्टिस शून्य. म्हणून तर पोष्टांतले पैसे काढायला आला तो ! ’

‘ इश्श ! आज फारच रूक्ष झालाय् तुम्ही ! मी माझं स्वप्न सांगत होतें तुम्हांला ! ’

‘ मनुष्य स्वप्नांवर जगत नाहीं माला ! ’

‘ तुम्ही नेहमीं असंच कांहीं तरी बोलतां ! ’ असें मालेनें मानेला गोड मुरड देऊन सुचविलें.

अभयला तिचा तो अभिनय मोठा मोहक वाटला. सत्यापेक्षां मालेच्या सौंदर्यांत स्वप्नाचाच भाग अधिक आहे असें अनेकदां त्याच्या मनांत आलें होतें, आतांही त्याला तोच भास झाला.

अभय कांहीं बोलत नाहीं असें पाहून माला म्हणाली ‘ काल रात्रभर झोंप आली नाहीं मला ! ’

‘ ढेंकूण फार झालेत वाटतं ? ’

अभयकडे रागानें पाहत मालेनें खालचा ओठ चावला. दोन्ही हातांचीं बोटें एकमेकांत गुंतवून तीं सारखीं चाळवीत ती हळूच म्हणाली ‘ चुकलें हं मी काल ! ’

अभय कांहींतरी उत्तर देणार होता. इतक्यांत मागून आवाज आला, ‘ ओहो ! मी तर फरासखान्यांत जायला निघालों होतों. मला वाटलं कुणी पळविली तुला ! ’

मालेबरोबर अभयनेंही मागें वळून पाहिलें. अगदीं अद्यावत् पोषाखांत एक तरुण धूम्रवलयें सोडीत त्यांच्याकडे येत होता. गौरवर्ण आणि भरदार अंगयष्टि यांच्यामुळें त्याच्याविषयीं कुणाचाही अनुकूल ग्रह झाला असता ! पण त्याच्या दृष्टींत एक प्रकारचा मिस्किलपणा होता. आणि त्याचा तो खालचा ओंठ– तो ओंठ पाहतांच अभयला आठवण झाली ती संभाजीच्या एका छाया-चित्राची ! त्या चित्रांतला ओंठही असाच.

माला म्हणत होती ‘ हे अभय—’

‘ ओहो हो ! गेले तीन आठवडे ही दररोज तुमच्याविषयीं बोलत असते माझ्यापाशीं ! ’ अभयचा हात हातांत घेऊन तो जोरानें दाबीत तो तरुण गृहस्थ उद्गारला. ‘ तुम्ही मोठे भाग्यवान् आहां अभय ! ’

अभय आतांच्या हस्तांदोलनाविषयीं विचार करीत होता. त्या स्पर्शांत सौजन्य नव्हतें, स्नेहही नव्हता, सत्तेचा मात्र भास होत होता.

अभय नुसता हंसला. तो तरुण म्हणाला ‘ जॉन्सनला जसा बॉस्वेल मिळाला तशी तुम्हाला ही शिष्यीण मिळाली आहे ! ’

अभयनें मालेकडे पाहून सहेतुक हास्य केलें.

ती एकदम म्हणाली ‘ अय्या ! यांचं नांव सांगायचं विसरलेंच, कीं ! हे कांचन कुलकर्णी––विलायतेहून नुकतेच आलेत. यांचे मामा किनई बाबांचे मोठे स्नेही आहेत ! ’

‘ नि ते आज संध्याकाळीं इथं येत आहेत. आतांच तार आली ! ’ मालेला हातांतला पिवळा लिफाफा दाखवीत कांचन म्हणाला.

तार हातांत घेऊन माला वाचूं लागली. ती वाचीत असतांना कांचन अभयकडे पाहून म्हणाला ‘ आमचे मामा म्हणजे एक वल्ली आहे ! गृहस्थ मुंबईच्या गिरणींत हजार रुपयांच्या जागेवर आहे. पण तारेचं उत्तर पाठवायला दीड दिवस लागला त्यांना. काल दुपारपासनं आम्हीं आपले हेलपाटे घालतोय् ! ’

कांचनच्या हातांत तार परत देत माला अभयला म्हणाली ‘ आज जेवायला यायचं हं रात्रीं आमच्याकड. यांचे मामा येणार आहेत. मोठे बडे गृहस्थ आहेत ते ! त्यांची नि तुमची ओळखही होईल—’

अभय स्तब्ध राहिलेला पाहून माला त्याच्या जवळ येऊन लडिवाळपणानें म्हणाली ‘ विसरायचं नाहीं हं ! ’

‘ मी कांहीं तुझ्यासारखा विसराळू नाहीं ! ’

‘ बरं बरं ! कोण विसराळू आहे तें संध्याकाळीं ठरवूं ! अगदीं न विसरतां–लवकर लवकर या हं ! ’

माला धांवतच गेली आणि बाहेर उभ्या असलेल्या मोटारचें दार उघडून पुढच्या जागेवर बसली. तिच्या मागून कांचन शांतपणानें गेला. चाक हातीं घेऊन त्यानें गाडी सुरू केली.

लगेच त्याचें लक्ष अभयकडे गेलें. अभयनें उजवा हात वर करून नमस्कार केलेला दिसतांच कांचननें चाकावरचा हात सोडून प्रतिनमस्कार केला आणि पुन्हा चाक हातीं घेऊन गाडी लीलेनें कोंपऱ्यावरून वळविली. गाडीला सुद्धां आपली सत्ता जाणविण्याची त्याची ती वृत्ती अभयच्या लक्षांत आल्यावांचून राहिली नाहीं.

× × × ×

आज अभयला शेवटचा तास नव्हता. तेव्हां हेडमास्तरांना सांगून साडेचार वाजतांच मालेच्या घरीं जावें आणि तिला चकित करावें असा बेत तो मनांत करीत होता.

त्याला वाटलें—आपल्याला पाहतांच माला म्हणेल ‘ इतक्या लवकर नव्हतं बोलावलं तुम्हांला ! भूक फार लागलीय् वाटतं ? ’

‘ भूक लागलीय्—पण ती पक्वान्नाची नाहीं ! ’

‘ मग ? ’

सहावीचे मराठीचें शिक्षक दुपारीं आले नव्हते. त्यांचा शेवटचा तास घेण्याविषयीं अभयला हेडमास्तरांची चिठ्ठी आली. मालेच्या ‘ मग ’ या प्रश्नाला द्यायचें उत्तर जिथल्या तिथेंच राहिलें.

मधल्या महिन्याचा पगार न देतां भरपूर काम करून घेणाऱ्या हेडमास्त-रांचा त्याला खूप राग आला !

मात्र हा राग शेवटचा मराठीचा तास घेतांना कुठल्या कुठें नाहींसा झाला. केशवसुतांची तुतारी वर्गांत निम्मी झाली होती. तिचा पुढचा भाग शिकवितांना अभय अगदीं रंगून गेला.

मात्र एकीकडून मुलांना मंत्रमुग्ध करणारा त्याच्या वक्तृत्वाचा ओघ वाहत असतांना दुसरीकडे त्याचें अंतर्मन निराळ्याच गोष्टींचा विचार करीत होतें.

मॅट्रिकच्या वर्गांत असतांना त्यानें ही कविता पहिल्यांदा वाचली, तेव्हां त्यांतलें एक कडवें त्याला अतिशय आवडलें होतें. त्यानें तें आपल्या सुभा-षितांच्या संग्रहांत टिपूनही ठेवलें होतें ! एवढेंच नव्हे, तर एखाद्या वेळीं अभ्या-साचा कंटाळा आला तर तें कडवें म्हटलें कीं सारा शीण नाहींसा होतो असाही अनुभव आला होता त्याला !

प्राप्तकाल हा विशाल भूधर
सुंदर लेणीं तयांत खोदा
निजनामें त्यावर तीं नोंदा
बसुनी कां वाढवितां मेदा
विक्रम कांहीं करा चला तर !

या त्या स्फूर्तिदायक ओळी !

या कडव्यांतली कल्पना मुलांना मोठी आकर्षक वाटली असावी ! त्यांच्या मुद्रेवर आनंद नाचत होता !

पण अभय मात्र या कडव्यावर मनांत रुष्ट झाला होता.

त्याच्या डोक्यांत जणूं कांहीं एक वावटळ उठली होती. तिच्यांत अनेक प्रश्न भिरभिरत होते—

डोंगरांत कुणी लेणीं खोदलीं तर तीं पाहणारांना आनंद होईल हें खरें! पण तो आनंद सर्वांना मिळेल कां? एखाद्या उपाशी मनुष्याला हीं लेणीं दाखविलीं तर तो आपली तहानभूक विसरून जाईल कां?

डोंगरांत लेणीं खोदण्यापेक्षां डोंगर फोडून त्यांतल्या दगडांनीं घरें बांधणें, डोंगरांतून वाहणाऱ्या ओढ्याचें पाणी अडवून शेतें पिकविणें, या गोष्टींना अधिक किंमत आहे कीं नाहीं?

या लेण्यांवर आपलीं नांवें कोरून ठेवा असें कवि म्हणतो. आपलें नांव मागें ठेवणें हेंच कां मनुष्याचें सर्वांत मोठें ध्येय आहे? तसें पाहिलें तर रानटी काळांत मानवजातीची प्रगति व्हावी म्हणून ज्यांनीं धडपड केली त्यांच्यापैकीं कितीकांची नांवें आपल्याला ठाऊक आहेत? रक्तानें नाहलेल्या रणभूमीवर एकही समाधि असत नाहीं. म्हणून सैनिकांचा त्याग वाया गेला असें कां मानायचें?

एके काळीं आपल्याला स्फूर्ति देणारें हें सुंदर कडवें आज आपल्याला निर्जीव वाटावें, ह्या अनुभवाचें अभयला सुद्धां आश्चर्य वाटलें.

थोड्या वेळानें आश्चर्याचा याही पेक्षां मोठा धक्का त्याला बसला.

तो खालील कडवें शिकवूं लागला होता--

धार धरिलिया प्यार जिवावर
रडोत रडतिल रांडा पोरें
गतशतकांचीं पापें घोरें
क्षालायाला तुमचीं रुधिरें
पाहिजेत रे स्त्रैण न व्हा तर!

विद्यार्थी असतांना त्याला या कडव्यांतला रांडापोरें हा शब्द कसासाच वाटला होता! केशव-सुतासारख्या कवीनें असला ग्राम्य शब्द वापरावा याचा राग सुध्दां आला होता त्याला! कविता करण्याचा नाद असल्यामुळें त्यानें ही ओळ ‘रडोत रडतिल बाया पोरें’ अशी दुरुस्तही केली होती.

आज मात्र ' रडोत रडतिल रांडापोरें ' ही ओळ त्याला अत्यंत समर्पक वाटली. रांडापोरें म्हणजे नुसतीं बायका पोरें नव्हेत ! आयुष्याच्या लढाईला भिऊन पळणारीं सगळीं माणसें रांडा-पोरांतच जमा होतात ही कल्पना एका क्षणांत त्याच्या मनांत चमकून गेली. त्याला वाटलें—व्यक्तीच्या सुखापलीकडे नजर न टाकणारीं, घराच्या चार भिंतींत आपलें जग आहे असें मानून राहणारीं, साहसापेक्षां सुखवस्तुपणाकडे लक्ष देणारीं सारीं माणसें एका दृष्टीनें बायका पोरा-इतकींच दुबळी असतात !

गत शतकांचीं पापें घोरें

क्षालायाला तुमचीं रुधिरें

पाहिजेत रे स्त्रैण न व्हा तर !

अभय पंधरा सोळा वर्षांचा होता तेव्हां गत शतकांच्या पापांत त्यानें जातिभेद, स्त्रियांची गुलामगिरी, अस्पृश्यता, इत्यादि गोष्टींची गणना केली होती.

आतां त्याला वाटलें--मानवजातीच्या पापांचा कळस शोभणारें महापाप निराळेंच आहे ! जाति मोडल्या, स्त्रिया शिकूं लागल्या, अस्पृश्यांना समाजांत मिसळतां येऊं लागलें, तरी या भयंकर पापाची तीव्रता रतिभर सुध्दां कमी झालेली नाहीं. उलट ती वाढतच आहे ! गुलामगिरी हें तें महापाप ! एका वर्गानें दुसऱ्या वर्गावर पिढ्यान् पिढ्या स्वामित्व मिरवावें, एका नालायक पशूच्या चैनी-साठीं हजारों लायक माणसांनीं जन्मभर घाण्याला जूंपून घ्यावें--

छे: ! एका वर्गाला हिंस्र पशु आणि दुसऱ्या वर्गाला त्याच्या भक्ष्यस्थानीं पडणारा दुबळा पशु करणारी आजची समाजरचना नाहींशी व्हायलाच हवी !

बाहेर शाळा सुटायची घंटा वाजली.

अभयला ती अगदीं अस्पष्ट ऐकूं आली.

' नियमन मनुजासाठीं जाणा

नसे नियमनासाठीं मानव '

या ओळींत तो पुन्हां रंगून गेला.

तास होऊन पांच मिनिटें झालीं, दहा मिनिटें झालीं.

एकही मुलगा जागचा हलला नाहीं. अभय आतां शेवटचें कडवें शिकवूं लागला होता.

पूर्वीपासुनि अजुनि सुरासुर
तुंबळ संग्रामाला करिती
संप्रति दानव फार माजती
देवांवर झेंडा मिरविती
देवांच्या मदतीस चला तर !

सात वर्षांपूर्वी जगांत माजलेल्या दैत्यांत अभय नुसत्या दुष्ट लोकांची गणना करीत होता !

आज त्याला वाटलें—हरतऱ्हेच्या विषमतेची पूजा करणारी समाज-व्यवस्था ही सर्वांत मोठी राक्षशीण आहे !

वर्गांतलीं मुलें एकदम उभीं राहिली. क्षणभर काय झालें तें अभयला कळलेंच नाहीं.

लगेच त्याच्या लक्षांत आलें--

वर्गांत हेडमास्तर आले आहेत. टेबलाजवळ येऊन ते रुक्ष स्वरानें म्हणाले शाळा सुटून पंधरा मिनिटं झालीं. युवराजांची मोटार बाहेर खोळंबली आहे ! '

वर्गांत कुठलेतरी युवराज आहेत याचा अभयला आतां पत्ता लागला !

तो म्हणाला ' सारीं मुलं आनंदानं बसलीं आहेत ! '

' मुलांना काय ? कसल्याहि गप्पा चालतात ! '

' गप्पा ? ' अभयनें रागानें प्रश्न केला.

‘ गप्पा नाहींतर काय ? परवांच्या वादविवादांच्या सभेंत मुंबईच्या संपाचा कांहींतरी संबंध होता कां ? पण सहज मघाशीं सभेचा अहवाल पाहिला तों तुम्हीं अगदीं कॉंग्रेस मंत्रिमंडळावर झोड उठवली आहे ! ’

‘ मुलं जाऊं देत घरीं मग सावकाश बोलूं या आपण या विषयावर ! ’

‘ तुमचं व्याख्यान तर त्यांनीं ऐकलंय् ! मग पुढच्या चर्चेची चोरी कशाला हवी आतां ? ’

‘ तसं नाहीं. शद्बावरनं शद्ब वाढतो ! ’

‘ वाढेना ? शाळेला काय भीति आहे कुणाची ? ’

‘ हो, आहे ! ’

‘ भीति आहे ? कुणाची ? ’

‘ आमच्यासारख्या मास्तरांची ! ’

‘ मास्तरांची ? ’ उपहासानें हेडमास्तर उद्गारले.

अभयच्या कानांत मघाची ओळ घुमत होती--

संप्रति दानव फार माजती

तो एकदम बोलून गेला ‘ चार चार वर्षं काम करणाऱ्या मास्तरांना सुद्धां शाळा मे महिन्याचा आणि आक्टोबरचा पगार देत नाहीं ! हें जर साऱ्या मुलांन कळलं तर—’

हेडमास्तर रागानें पाय आपटीत निघून गेले हें अभयला दिसलें, पण तें दृश्य अगदीं पुसट होतें.

त्याच्या डोळ्यांपुढें तीन ओळी ठळकपणानें नाचत होत्या—

संप्रति दानव फार माजती
देवांवर झेंडा मिरविती
देवांच्या मदतीस चला तर !

# कालवा आणि कारंजें

मुलें निघून गेल्यावर अभय वर्गाबाहेर पडला.

शाळेचा शिपाई तिथें उभा असेल अशी त्याची कल्पना होती. 'साहेबांनीं बोलविलंय् तुम्हांला' हे त्याचे शब्द दरवाजाबाहेर पाऊल टाकतांच आपल्या कानांवर पडणार या अपेक्षेनें अभयनें इकडे तिकडे पाहिलें.

वर्गांतून बाहेर पडलेलीं मुलें सर्वत्र रेंगाळत होतीं. पण शिपाई कुठेंच नव्हता!

अभय मालेच्या घरीं जायला निघाला. मघाशीं वर्गांत आपला आणि हेडमास्तरांचा खटका उडायला नको होता असें त्याला राहून राहून वाटत होतें! पण झाल्या गोष्टींत आपला दोष नाहीं असेंही त्याचवेळीं त्याच्या मनांत येत होतें.

कुठल्यातरी युवराजाच्या मोटारीचा खोळंबा झाला म्हणून काय हेडमास्तरांनीं तावातावानें वर्गांत यायचें? बरें, वर्गांत आल्यावर तरी सभ्यपणानें वागायचें कीं नाहीं? हाताखालचा शिक्षक म्हणजे कांहीं मुका गुलाम नव्हे! वाद-

विवाद मंडळांतल्या आपल्या भाषणासंबंधानें त्यांना कांहीं सांगायचें होतें, तर तें स्वतःच्या खोलींत बोलावून नेऊन सांगतां आलें नसतें कां ?

अभय मालेच्या घरीं पोंचला तेव्हां साडेपांच होऊन गेले होते.

मालेच्या धाकट्या बहिणीनें ती बाहेर गेली असल्याचें सांगितलें.

अभयच्या मनांत आलें—सव्वापांच वाजेपर्यंत आपली वाट पाहून ती कंटाळली असेल. कालच्या रागानें आपण आज आलों नाहीं अशी रुखरुख तिच्या मनाला लागली असेल. ती बहुधा आपल्या घरीं जाऊन तिथें आपली वाट बघत बसली असावी !

अभयनें मालेच्या बहिणीला विचारलें ‘ चालतच गेली आहे ना माला ? ’

‘ अं हं ! ’

‘ मग ’

‘ मोटारींतन ! ’

‘ कुणाच्या ’ हा शब्द त्याच्या ओंठावर आला होता. पण ‘ कांचनच्या ’ हें उत्तर ऐकण्याची त्याच्या कानांना उत्सुकता नव्हती.

तो सायकलवरून निघाला. बुधवारांतल्या गर्दीतून नेहमीच्या चपळपणानेंच तो सायकल चालवीत होता. मधेंच एक मूल धांवत आडवें आलें, तेव्हां त्यानें ज्या कौशल्यानें अपघात चुकविला तें तर सर्कसमधल्या एखाद्या नामांकित खेळाडूला शोभण्यासारखें होतें. पण असें असूनही त्याचें मन कांहीं जाग्यावर नव्हतें.

आज नेहमीप्रमाणें फुलांच्या दुकानांतल्या सुंदर दृश्यानें तो प्रसन्न झाला नाहीं किंवा रिकामे टांगे पाहून त्याच्या डोळ्यांपुढें टांगेवाल्यांच्या घरांतलीं जीं चित्रें उभीं राहत तींही राहिलीं नाहींत !

मधांशीं त्याला हेडमास्तरांचा राग आला होता. आतां त्याला त्यांची कींव वाटूं लागली. मालेच्या वडिलांच्या ओळखीनें जूनमधें या शाळेंतली जागा त्याला मिळाली होती. अभय शाळेंत रुजू झाल्यानंतर चारपांच दिवसांनीं दत्तोपंतांनीं त्याला विचारलें होतें ‘ कसे आहेत तुमचे हेडमास्तर ? ’

अभयनें उत्तर दिलें होतें ' ठीक आहेत ! ' नाहींतरी दुसरें काय उत्तर द्यायचें ? पन्नास पावसाळे पाहिलेल्या मनुष्याला सुद्धां जिथें स्वतःच्या स्वभावाची पुरी कल्पना येत नाहीं, तिथें चार आठ दिवसांच्या सहवासावरून एकानें दुसऱ्याच्या स्वभावाची परीक्षा करणें चुकीचेंच नाहीं कां ?

दत्तोपंतांनीं त्यावेळीं हेडमास्तरांची जी माहिती सांगितली होती तिच्यांतलें अक्षर नि अक्षर आतां त्याला आठवूं लागलें—

एका भिक्षुकाचा मुलगा !

पोटाला चिमटा घेऊन त्यानें अभ्यास केला. प्रोफेसर होण्याची त्याची महत्वाकांक्षाही सफळ झाली. असहकारितेच्या चळवळीच्या वेळीं हा ज्या कॉलेजांत होता त्यांतल्या प्रोफेसरांत दोन तट पडले होते. बहुमत विरुद्ध पक्षाचें होतें म्हणून यानें कॉलेज सोडलें आणि हा चळवळींत सामील झाला.

आपल्या वक्तृत्वानें कॉलेज ओस पाडण्याची महत्वाकांक्षा त्यानें अंशतः सिद्धीला नेली. सूडाचें हें समाधान लाभतांच स्वारी चळवळी विषयीं उदासीन झाली. बाळपण दारिद्र्यांत गेल्यामुळें खाणेंपिणें कपडालत्ता इत्यादि गोष्टींत त्याचें मन वखवखल्यासारखें झालें होतें. खादी पेहरून आणि कुठल्यातरी राष्ट्रीय शाळेंत मास्तर होऊन त्याची ही उपभोगाची वृत्ति तृप्त होणें अगदीं अशक्य होतें.

हळुहळु तो चळवळीपासून दूर गेला. एका इंग्रजी वर्तमानपत्रांत टोपण नांवानें राष्ट्रीय चळवळी विरुद्ध लेख लिहून पैसे मिळवायला त्यानें सुरवात केली. तें रहस्य उघडकीला येतांच देशभक्तांतून त्याची हकालपट्टी झाली.

पण गृहस्थ कांहीं स्वस्थ बसणारा नव्हता. लोकप्रियता मिळविण्याकरतां ' मातृपद हा स्त्रीचा जन्मसिद्ध हक्क आहे ! मग ती स्त्री विवाहित असो वा नसो ! ' या तत्वाचें प्रतिपादन करणारे लेख त्यानें लिहिले ! प्रत्येक अविवाहित स्त्री जणूं कांहीं याचे लेख प्रसिद्ध होण्याची वाटच पाहत होती अशा समजुतीनें सनातनी लोक त्याच्यावर तुटून पडले ! सनातन्यांच्या आरडाओरडीमुळें लोकांचें लक्ष त्याच्याकडे वेधलें. कांहींतरी नवीन हवें असणाऱ्या तरुणांचा हा पुढारी बनला.

पण असल्या पोकळ प्रतिष्ठेनें कांहीं कुणाचें पोट भरत नाहीं !

एका नव्या संस्थेला हुषार हेडमास्तराची जरुरी होती. याला ती जागा मिळाली. पांच पंचवीस शिक्षकांवर हुकमत गाजविण्यांतच त्याला आनंद वाटूं लागला. हा स्वतः उत्कृष्ट शिक्षक असल्यामुळें शाळेचा मॅट्रिकचा निकाल चांगला लागे. चालक त्याच्यावर खूष झाले. शाळेच्या चिमण्या जगांतले सत्तेचे कण त्याच्या मुठींत एकवटले.

मोठेपणाच्या कल्पनेला बळी पडून एका श्रीमंत घराण्यांतल्या मुलीशीं त्यानें लग्न केलें होतें. तिची बरदास्त ठेवायला याला शाळेंतला पगार अपुरा पडूं लागला. आपला पगार वाढावा म्हणून हंगामी शिक्षकांच्या नेमणुकीला त्यानें प्रोत्साहन दिलें. विश्वविद्यालयाच्या परीक्षकांत आपली वर्णी लागावी, सरकार-दरबारीं आपलें वजन राहावें म्हणून तो हजार खटपटी लटपटी करूं लागला. मोतिलाल नेहरूंच्या निधनादिवशीं गैरहजर राहिलेल्या मुलांना शाळेच्या चौकांत छडीनें फोडायला कांहीं त्यानें कमी केलें नाहीं ! त्यावेळीं गांधी सरकारचे शत्रु होते !

पण कॉंग्रेस मंत्रिमंडळ येतांच सर्व शाळांनीं खादीचा गणवेष धारण करावा अशी सूचना जाहीर रीतीनें करण्यांत त्यानें पुढाकार घेतला !

दत्तोपंतांच्या तोंडून ही हकीगत ऐकत असतांना अभयला जी शंका आली होती, तीच तिचें स्मृतिदर्पणांत पडलेलें प्रतिबिंब पाहतांना आतांही आली.

असल्या मनुष्याशीं दत्तोपंतांचा स्नेहभाव कायम कसा राहिला ? दत्तोपंत तर असहकारितेच्या काळापासून गांधींचे कट्टे भक्त आहेत. त्यांची भक्तिही कांहीं तकलुपी नाहीं. प्रपंचाचा भार अंगावर असूनही त्यांनीं पुन्हां वकिली केली नाहीं. विषम तापानंतर डॉक्टरांनीं आग्रह केला तरी ते अंड्याला शिवले नाहींत !

अभय आतां टेकडीपर्यंत आला होता. पण नेहमींच्या जागीं जाऊन बसावें असें त्याला वाटेना. एकांत शोधण्याकरितां परतून तो कालव्याच्या वाटेनें जाऊं लागला.

बाभळीच्या रानाजवळची एक निवांत जागा त्यानें पसंत केली. गजबजलेल्या घराला छोटेसें तळघर असावें तसें तें स्थळ वाटलें त्याला.

पलीकडे हांकेच्या अंतरावर रस्ता होता. सहा वाजायला आल्यामुळें त्याच्यावरली वर्दळ बरीच वाढली होती. पण जवळून भांडल्याप्रमाणें वाटणारीं तरुणांचीं बोलणीं इथें पक्ष्यांच्या किलबिलाटाइतकी अस्पष्ट ऐकूं येत होतीं. मावळत्या सूर्याच्या पिवळसर उन्हानें रंगलेल्या भोंवतालच्या बाभळींच्या झाडांकडे पाहतां पाहतां अभयला वाटलें—आपण एकाद्या सुंदर आंबराईंत बसलों आहों.

कालव्यांतलें पाणी हळुहळु वाढत होतें. वाढत्या पाण्याबरोबर त्याचें सौंदर्यही वृद्धिंगत होत होतें.

अभयनें अनेकदां कोरडा झालेला हा कालवा पाहिला होता. त्यांतला तो तळाचा गाळ—त्या काटक्या—त्या गवताच्या काड्या—कांठाला वाढलेलें तें शेवाळें—हें सारें पाहिलें कीं त्याला कसेसेंच वाटे !

तो आतां निरखून पाहूं लागला. कालव्यांतल्या पाण्यावर लहान लहान तरंग उठत होते.

अली–अलीकडे मालेच्या सहवासांत आपल्या हृदयांत मुग्ध भावनांचा जो नाजुक नाच चालतो, त्याच्यासारखेंच त्या तरंगांचें नर्तन आहे असें त्याला वाटलें.

गाळ, काटक्या, गवताच्या काड्या, शेवाळें, सर्व कांहीं आतांही कालव्यांत होतें. पण एरवीं ओंगळ दिसणाऱ्या या गोष्टी पाण्याच्या वाहत्या प्रवाहांत कुठल्या कुठें लोप पावल्या होत्या.

अभयच्या मनांत आलें––पाण्याला जीवन हें नांव कांहीं उगीच नाहीं दिलें कुणी !

जीवन !

समाजांतलीं सगळीं वैगुण्यें अशींच जीवनाच्या वाहत्या प्रवाहांत लोपून जायला हवींत !

पण आपल्या समाजांत जीवनाचा वाहता प्रवाह आहे कुठें ? कुठें या प्रवाहाच्या आड जात येते, कुठें अठराविश्वे दारिद्र्याची भयंकर भिंत मधें उभी राहते ! आपला धर्म, आपली संस्कृति, आपलें तत्वज्ञान--सारीं शुष्क होऊन गेलीं आहेत. त्यांच्यापासून जीवनाचा लाभ तर समाजाला होतच नाहीं ! उलट त्यांच्यातला गाळ मात्र--

विचारांनीं मन पुन्हां अस्वस्थ होऊं नये म्हणून अभय आसपास पडलेले खडे उचलून ते एकामागून एक कालव्यांत टाकूं लागला.

प्रथम त्यानें हळूच एक खडा टाकला.

एक लहान वलय निर्माण झालें. नाचत नाचत तें पुन्हां पाण्यांत अदृश्य झालें. त्याला एकदम सकाळीं पाहिलेल्या लतेच्या गालावरल्या खळीची आठवण झाली.

दुसरा खडा--थोडें मोठें वर्तुळ !

तिसरा खडा--त्याहूनही मोठें वलय !

चवथा खडा--पांचवा खडा--सहावा खडा--

अभय एकदम दचकला. सातवा खडा त्याच्या हातांतच होता. पण पाण्यांत मात्र मागून कुणी तरी मोठा खडा टाकला होता आणि त्यानें निर्माण झालेलें वर्तुळ कालव्याच्या दोन्हीं बाजूंना नाचत नाचत स्पर्श करीत होतें.

त्यानें मागें वळून पाहिलें--लता ! आश्चर्यचकित होऊन तो तिच्याकडे पाहूं लागला.

' भ्यालांत वाटतं ? '

' हं ! '

' प्रेमसंन्यासांत गोकुळच्या मागं त्याची कुरूप बायको गुपचुप येऊन उभी राहते. नि तिच्या एका तोंडाचीं दोन तोंडं करण्याकरितां तो जेव्हां मागं पाहतो तेव्हां अशीच गम्मत होते ! '

अभयला वाटलें--भलताच दाखला दिला हिनं. 'या पाण्यांत आधीं आपलं रूप पहा नि मग--' असें कांहींतरी बोलायचें त्याच्या मनांत आलें–पण त्याच्या तोंडांतून शब्द आले, 'बसा ना !'

'तुम्हींच उठा कीं !'

'कां ? माझ्या जागेवर बसायचा बेत आहे वाटतं ? सकाळीं तें साधलं ! पण आतां--'

'ही जागा म्हणजे कांहीं सिंहासन नव्हे ! आमच्या घरीं घेऊन जाणार आहे मी तुम्हांला !'

'कशाला ?'

'माझ्या गोष्टी दाखवायला. सकाळपासनं एकसारखी तुमची आठवण येतेय् मला !'

'स्तुति करणारा मनुष्य कुणाला आवडत नाहीं ?'

लता हंसली.

'कां हंसलांत ?' अभयनें प्रश्न केला.

'मोतिरामाची आठवण झाली मला ! तो भेटेल त्या मुलीची स्तुति करीत असतो ! पण प्रत्येक मुलगी भेटेल त्या माणसापाशीं त्याची निंदाच करते !'

लता पुन्हां हंसली. तिच्या गालावरली खळी अभयला सकाळपेक्षांही अधिक मनोहर वाटली.

× × × ×

लतेच्या बंगल्याच्या फाटकापाशीं अभय क्षणभर थबकला. फिरायला जातांना अगर फिरून येतांना तो अनेकदां या बंगल्यावरून गेला होता. बागेच्या कोंपऱ्याकोपऱ्यावर फुलणारीं गुलमोहराचीं झाडें, त्यांतल्या एका झाडाच्या पुढें बांधलेला सुंदर झोंपाळा, त्या झोंपाळयाच्या पुढलें गुलाबदाणीची आठवण करून देणारें तें कारंजें, रात्रीं जणूं कांहीं दोन पौर्णिमेचे चंद्रच प्रकाशत आहेत असा भास उत्पन्न करणारे गच्चीच्या दोन्ही बाजूचे भव्य विद्युद्दीप इत्यादि गोष्टी गेल्या उन्हाळयांत त्यानें जेव्हां पाहिल्या, तेव्हांच या नव्या बंगल्यांत कुणीतरी रहायला

आलें हें त्यानें ओळखलें. गच्चीवर एकदां त्यानें एक बाईही पाहिली होती. ती बाई गुजराथी असावी असा त्याच्या बरोबर असलेल्या मालेनें तर्कही केला होता. अभयनें उत्तर दिलें होतें 'कुणी कां असेना, आपल्याला कांहीं तिच्याशीं लग्न करायचं नाहीं!'

सायकल ठेवून अभय लतेच्या मागून बागेंत गेला. झोंपाळ्यापाशीं गेल्यावर ती म्हणाली

'आलेंच हं मी!'

ती बहुधा चहा सांगायला गेली असावी असें अभयला वाटलें. तिला हांक मारून चहा नको असें म्हणावें असेंही त्याचा मनांत आलें. पण एखाद्या अल्लड पोरीप्रमाणें नाचत बागडत ती क्षणार्धांत अदृश्य झाली. बंगल्यांत जातां जातां तिनें पाठीवरला वेणीचा शेंपटा सहज उचलून मोठ्या गंमतीनें गरगर फिरविला. लहानपणीं एका गारुड्यानें हातांत घेऊन फिरविलेल्या नागाचें दृश्य अभयनें मोठ्या कौतुकानें पाहिलें होतें. त्याची त्याला आतां आठवण झाली.

बंगला अगदीं शांत होता. अभयला वाटलें–जणुं कांहीं दगडांचा एक सुंदर कुंजच कुणी निर्माण केला आहे! मागच्या बाजूचा तो वाटोळा जिना–त्याची घडण अगदीं वेलींच्या नाजुक वेटोळ्यांसारखी दिसत होती.

लता धांवतच परत आली. त्याच्या हातांत एक वही देऊन ती पुन्हां म्हणाली 'आलेंच हं मी!'

'डॉक्टरांनीं पळण्याचा व्यायाम करायला सांगितलाय् कीं काय तुम्हांला?'

परत जायला निघालेल्या लतेनें मान मागें वळवून पाहिलें. शकुंतला सासरीं जायला निघते त्यावेळीं तिची लाडकी हरिणी तिच्याकडे ज्या दृष्टीनें पाहते, तीच लतेच्या डोळ्यांत नाचत होती.

अभयनें ती वही उघडली. तो थोडासा निराश झाला. लतेचें अक्षर सुंदर असेल अशी त्याची कल्पना होती. पण तें तर अगदींच सामान्य दिसलें. मात्र तें मालेच्याप्रमाणें किरटें, नटवें, कोरून काढलेलें असें नव्हतें. एका

ओळींत फार तर पांच सहा शब्द आणि प्रत्येक अक्षर कसें अगदीं मोठें! जणुं कांहीं धनिणीच्या डोळ्यांकडे पाहूनच त्या अक्षरांनीं आपलें रूप धारण केलें होतें!

सूर्य मावळला असला तरी बागेंत वाचण्याइतका प्रकाश होता.

अभयनें वही उघडून पहिलीच गोष्ट वाचायला सुरवात केली—

## कारंजें आणि कालवा

नगराबाहेरच्या सुंदर उद्यानांत एक पुतळा ठेवावा असें श्रीमंत नागरिकांनीं ठरविलें.

शहराबाहेरचीं शेतें वर्षांतून कांहीं महिनेच हिरवींगार असत. पण ती बाग मात्र बाराही महिने फुललेली असे! त्यामुळें ती अधिक सुंदर दिसावी असें संध्याकाळीं गांवाबाहेर फिरायला जाणाऱ्या प्रत्येकाला वाटूं लागले होतें.

बागेंत पुतळा ठेवावा याबद्दल कुणाचाच मतभेद नव्हता! पण तो पुतळा कुणाचा असावा याबद्दल मात्र मोठी खडाजंगी उडाली.

म्हाताऱ्या माणसांनीं तो शुक मुनीचा असावा अशी सूचना केली.

प्रौढ माणसांनीं राधाकृष्णाच्या मूर्तीची उपसूचना आणली. असा जोड पुतळा करण्यांत शिल्पकाराला आपलें कौशल्य दाखवायला अवसर मिळेल असें त्यांचें म्हणणें होतें!

तरुणांनीं रतीच्या मूर्तीचा पुरस्कार केला.

आपल्याशिवाय तरुणांचे हट्ट कुणी पुरविणार नाहीं, असा पोक्त विचार करून वडील मंडळींनीं आपआपल्या सूचना मागें घेतल्या.

बागेंत रतीच्या सुंदर मूर्तीसमोर एक सोनेरी कारंजे अहोरात्र थुई-थुई नाचूं लागलें.

कारंजांतून वर उसळून खालीं येणाऱ्या जलधारांकडे पाहतांना कुशल नर्तकींचें नृत्यच आपण पाहत आहों असा प्रेक्षकांना भास होई.

बागेपलीकडून वाहणाऱ्या दरिद्री कालव्याशीं गप्पागोष्टी करायची या कारंजाला लहर येऊं लागली. आपल्या जातीचें दुसरें कुणीच त्याला जवळ दिसेना !

एकदां कारंजें कालव्याला म्हणालें, 'काय करतोयस् रे ?'

'नमस्कार !'

'कुणाला ?'

'काळ्या ढगांना !'

कारंजें हंसत सुटलें.

त्याचें नृत्य अधिक मनोहर दिसूं लागलें.

तें कालव्याला म्हणालें 'अरे मूर्खा, या काळ्या ढगांना ना रंग ना रूप ! माझ्याकडं बघ—सूर्यकिरणांत माझं नृत्य सुरू झालं कीं इंद्र-धनुष्यांची वृष्टि होऊं लागते माझ्यावर ! मला नमस्कार कर !'

'तुला ? नद्या आणि समुद्र सोडून—'

'नद्या आणि समुद्र ? त्या खारट पाण्याच्या अगडबंब तळ्याला कोण किंमत देणार ? आणि नदी—? त्याच समुद्राची बायको !'

दुसरे दिवशीं आकाशांत काळे ढग दिसेनासे झाले.

हळुहळु नदीचें पाणी आटूं लागलें. लोकांच्या तोंडचें पाणी पळालें.

कालव्याचें पाणी शेतांना पुरेनासें झालें.

बाग सुकली तर सुकली, शेतें पिकलीं पाहिजेत असें सर्वांनीं ठरविलें.

कालव्यांतून बागेला दिलें जाणारें पाणी बंद करण्यांत आलें.

कारंज्याच्या मोत्यांच्या माळा क्षणार्धांत नाहींशा झाल्या. इंद्रधनुष्यें हां हां म्हणतां लोप पावलीं. एकाद्या प्राचीन मूर्तीच्या भग्न अवशेषाप्रमाणें तें दिसूं लागलें.

कालव्यानें त्याला विचारलें ' काय रे करतोयस् ? '

' नमस्कार. '

' कुणाला ? '

' न दिसणाऱ्या काळ्या ढगांना ! '

× × × ×

गोष्ट वाचून होतांच अभयनें वर पाहिलें.

दिवस आणि रात्र यांचें मधुर मीलन गंगा–यमुनांच्या संगमासारखें भासत होतें. एकाद्या रंगी बेरंगी पानांच्या वेलींवर मधेंच एकदोन कळ्या दिसूं लागाव्यात, त्याप्रमाणें पश्चिमेकडल्या मेघांच्या मालिकेमधें दोन तीन चांदण्या अस्पष्ट दिसूं लागल्या होत्या. अभयच्या डोक्यावरून एक एकटेंच पांखरूं चिवचिवत गेलें. अभयला वाटलें—बिचारी चिमण्या पिलांची आई असावी ! चारा शोधतां शोधतां इतका उशीर झाला असेल ! केव्हां एकदां आपण आपलें घरटें गांठतो असें तिला झालें असावें.

त्याला एकदम आक्काची आठवण झाली. आपण शाळेंतून परस्पर इकडे आलों. आक्का घरीं एकसारखी आपली वाट पाहत बसली असेल !

लतेचा निरोप घेऊन जावें असें त्याच्या मनांत आलें न आलें, तों लताच एका चांदीच्या ट्रेमधें चार बशा आणि दोन पेले घेऊन आली.

ट्रे मधें ठेवून ती झोंपाळ्यावर बसली.

बशी उचलून पोहे तोंडांत टाकीत अभय म्हणाला 'आज उगीच आलों मी इथं!'

लतेनें त्याच्याकडे आश्चर्यानें पाहिलें.

'मला जेवायला जायचंय् रात्रीं! आतां हें खाल्ल्यावर जेवण कसलं जाणार?'

'धांवण्याचा व्यायाम करावा जरा! म्हणजे—'

फिक्कया हिरव्या रंगाच्या सोनेरी कडा असलेल्या सरबताकडे पाहत अभय म्हणाला 'तुमच्यापाशीं कांहीं जादू बिदू आहे वाटतं?'

'हं! यावेळीं तुम्हांला चहा नकोय् हें मी बरोबर ओळखलं कीं नाहीं?'

'ओळखलं खरं! पण तें कसं?'

'जादूगार कधीं आपला मंत्र सांगत नाहीं!'

अभय कांहींतरी उत्तर देणार होता इतक्यांत घरांतला गडी एक चिठ्ठी घेऊन आला.

लता झोंपाळ्यावरून उठली. पलीकडे जाऊन तिनें दिवा लावला आणि चिठ्ठीवरून नजर फिरवीत ती गड्याला म्हणाली 'उद्यां सकाळीं यायला सांग त्यांना!'

अभय सरबत संपवून उठत उठत म्हणाला 'जातों मी! खूप उशीर झालाय्!'

परत झोंपाळ्यावर येऊन बसत लता म्हणाली 'एवी तेवीं उशीर झालाच आहे. तेव्हां आणखी थोडा वेळ बसायला कांहीं हरकत नाहीं!'

‘ वाः ! थोडसं कर्ज असलेल्या माणसानं कर्ज काढीत सुटावं असं तुमचं मत दिसतं ! ’

लता हंसली.

अभयला बसावें लागलें.

ती हळूच म्हणाली ‘ त्या गृहस्थांना आतां भेटायची इच्छा नाहीं माझी ! ’

‘ मोतिराम आलाय् कीं काय ? ’

‘ अं हं ! सिनेमा कंपनींतले एक गृहस्थ ! ’

अभयचें कुतूहल जागृत झालें होतें. पण त्यानें एकही प्रश्न विचारला नाहीं.

लता म्हणाली ‘ मी सिनेमांत एकदां तरी काम करावं म्हणून फार मागं लागलेत ते माझ्या ! ’

‘ नि तुम्ही तर दूर दूर पळताय् ! होय ना ? मघांशी तुम्ही एकसारख्या धांवत कां होतां, हें आतां लक्षांत आलं माझ्या ! ’

हें बोलल्यावर अभयच्या मनांत आलें—आपण गप्प बसलों असतो तर बरें झालें असतें. पण कोटीचा—त्यांतून प्रतिकोटीचा मोह मनुष्याला आवरतां येत नाहीं हेंच खरें !

सिनेमांत काम करायची आपल्याला भीति वाटते असें अभयनें, थट्टेनें कां होईना, सुचवावें हें लतेला आवडलें नाहीं.

लगेच ती म्हणाली ‘ मी एका पायावर तयार आहे जायला. पण आई नको म्हणतेय्—मॅट्रिक झाल्यावर कॉलेजांत जाण्यापेक्षां कांहींतरी नवीन करावं असं माझ्या मनानं घेतलं ! आईनं नर्सिंगच्या कोर्सला पाठविलं. पण तो मधेंच सोडून मी पळून आलें ! ’

आपण हें बोलायला नको होतें असें वाटूनच कीं काय जीभ चावून लता मधेंच थांबली.

अभय म्हणाला ‘ बराय्, येतों मी ! ’

‘ केव्हां ? ’

‘ येतों म्हणजे जातों ! ’

‘ असेच कां शब्दाचे अर्थ सांगतां शाळेंत मुलांना ? ’

हा प्रश्न करून मनमोकळेपणानें हंसणारी लतेची मूर्ति अभय सायकलवर बसून खूप दूर गेला तरी त्याला दिसत होती.

लतेविषयींच्या विचारांनीं त्याच्या मनांत जणुं कांहीं खोखोचा खेळच मांडला होता—

मालेपेक्षां ही मुलगी बुद्धिवान आहे हें उघड आहे !

पण ‘ कारंजें आणि कालवा ’ या गोष्टींतली कल्पना एकाद्या तरुण श्रीमंत मुलीला सुचावी हें मोठें आश्चर्यच नाहीं कां ?

लता आपल्या कुटुंबाविषयीं एक अक्षरही बोलली नाहीं. तिनें आपल्याला बंगला पहायला आंत बोलाविलें नाहीं, इंग्लंडहून नुक्त्याच आलेल्या भावाच्या गोष्टी सांगितल्या नाहींत, कांहीं नाहीं !

काय विचित्र मुलगी आहे !

हिच्या गोष्टींत गरिबांविषयीं कळवळा निःसंशय आहे.

मग नर्स व्हायचा कंटाळा कां यावा हिला ?

आपल्या आईच्या इच्छेविरुद्ध ती नटी होईल कां ? होईना !

पण नटी होऊन तिचें जीवन सफल होईल कां ?

अभय कोंपऱ्यावरून वळत होता. त्यानें आपली सायकल एकदम चपळाईनें वळविली.

दुसऱ्या बाजूनें आलेली मोटार झर्रकन् निघून गेली.

कांचन मोटार चालवीत आहे हें अभयला स्पष्ट दिसलें.

गाडींत त्याच्या पलीकडे कुणीतरी मुलगी बसली होती. कुणीतरी नव्हे !

माला ?

हो, मालाच असावी ती !

छेः ! इतका वेळ कांचन बरोबर माला कशाला फिरत राहील ? त्यांतून आज तर तिच्या घरीं पाहुणे येणार आहेत !

पण मालेचा काय नेम आहे ? काल आपला निरोप कुठें पोंचविला तिनें ?

काल दुपारीं दोन वाजल्यापासून तिला घटकाभर सुद्धां सवड मिळाली नाहीं हें चारुला सुद्धां खरें वाटणार नाहीं.

आपण दुपारीं तिच्यावर खूप रागवायला हवें होतें.

कां बरें आपण रागावलों नाहीं ? माला आपल्यापुढें उभी राहिली कीं सौंदर्याचे तुषार आपल्या भोंवतीं उडूं लागतात, तिनें आपल्याकडे पाहिलें कीं शेकडों इंद्रधनुष्यें नाचूं लागल्याचा आपल्याला भास होतो, म्हणूनच आपण तिच्यावर रागावलों नाहीं. हो, हेंच खरें !

मालेपेक्षां स्वतःचाच अधिक राग आला अभयला !

आपण इतक्या उशीरां घरीं परत आलों. पण आक्का त्याविषयीं अवाक्षरही बोलली नाहीं हें अभयच्या लक्षांत आल्यावांचून राहिलें नाहीं.

जखमेपेक्षां मुका मारच अधिक असह्य असतो. अभयला वाटलें--या असल्या अबोल्यापेक्षां आपण उशीरां घरीं आलों म्हणून आक्का आपल्यावर रागावली असती तर फार बरें झालें असतें.

संध्याकाळच्या शाळेंतल्या प्रकाराची आठवण होऊन त्यानें विचारलें ' कुणी आलं होतं कां माझ्याकड ? '

' सासुबाई आल्या होत्या ! ' आक्का हंसत उत्तरली.

अभय गोंधळलेला पाहून ती म्हणाली

' मालेची आई मला जेवायला बोलवायला आली होती ! '

' येणार ना तूं ? '

' आज उपास आहे माझा ! '

चारु अभयच्या पाठीवर उतरून त्याच्या गळ्याला विळखा घालीत म्हणाला ' अभय दादा, आणखी एक मानूस आलं होतं ! '

' मानूस ? '

' हं ! मोटिलाम काका ! '

' मोतिराम आला होता ? ' अभयनें आक्काला विचारलें.

' हो ! खूप वाट पाहिली तुझी त्यांनीं ! मुलांचा मोठा लळा दिसतोय् स्वारीला ! चारूकरतां चॉकोलेटचा पुडा आणला होता त्यानं ! '

चारूला खालीं उतरवून अभय म्हणाला ' अरे लबाडा, सारा पुडा तूंच खाल्लास वाटतं ? '

' आईनं ठेवलाय् तो ! तुम्हांला आणून देतों हं एक–दोन–आठ–पांच तीन–'

चारु वाऱ्यासारखा धांवत गेला. झोंपाळ्यावर आक्काजवळ एक पुस्तक पडलें होतें.

आक्का काय वाचीत होती हें पाहण्याकरितां अभयनें तें उचलून पाहिलें– श्री तुकारामाची गाथा ! सहा महिन्यांपूर्वी आक्कानें शिवलीलामृत आणायला सांगितलें तेव्हां हें पुस्तक अभयनें मुद्दाम विकत घेतलें होतें.

ल्हानशा काडीची खूण असलेलें पान त्यानें सहज उघडलें.

पेन्सिलीनें खूण केलेल्या एका अभंगाकडे त्याचें लक्ष गेलें.

बळें बाह्यात्कारें संपादिलें सोंग ।
नाहीं झाला त्याग अंतरींचा ॥
ऐसें येतें नित्य माझ्या अनुभवा ।
मनासी हा ठावा समाचार ॥
प्रपंचा बाहेरी नाहीं आलें चित्त ।
केले करी नित्य व्यवसाय ॥
तुका म्हणे मज भोरप्याचे परी ।
झालें सोंग वरी आंत तैसें ॥

× × × ×

अभय दाराबाहेर आला तों चारूची आई व आजोबा मोठ्यामोठ्यानें भांडत आहेत असें त्याला वाटलें.

तो क्षणभर थांबला. त्याला कुठलेच शब्द नीट ऐकूं आले नाहींत. पण स्वरावरून आजोबा खूप संतापले असावेत असें वाटत होतें.

अभय बाहेर पडला. आजोबा व त्यांची सून यांना भांडायला कांहीं मोठें कारण लागत नाहीं हें त्याला अनुभवानें ठाऊक झालें होतें.

कोल्हापुर–प्रकरणांत आपण टिळक आगरकरांबरोबर होतो या गोष्टीचा आजोबांना मोठा अभिमान होता. त्या प्रकरणानंतर त्यांनीं सरकारी नोकरी केली

खरी ! पण १९०८ मधें टिळकांना शिक्षा होतांच आपलें पेनशन्, म्हातारपण वगैरे कांहीं लक्षांत न घेतां हा करारी म्हातारा नोकरीवर लाथ मारून बाहेर पडला होता. जमिनीचें उत्पन्न व कथाकीर्तनें यांच्यावर त्यांचा योगक्षेम चांगला चाले. त्यांना एकच मुलगा झाला होता. तोही फार उशीरा. मुलगा फार शिकला तर नाहींच. उलट लोकांना तो अर्धवटच वाटे ! त्याचें पहिलें लग्न कसेंबसें कष्टानें झालें. पण एकही मूल न होतां आजोबांची ती सून वारली.

पुढें कोंकणांत जाऊन कुळिताची पिठी नि नाचण्याची भाकरी खाणाऱ्या एका ब्राह्मणाची आईबाप नसलेली पुतणी त्यांनीं पैदा केली. आजोबांना म्हातारपणीं नातू पहायला मिळाला. त्यांचा आनंद गगनांत मावेना. पण दैवाला हें त्यांचें सुख पाहवलें नाहीं. नवज्वरानें आजोबांचा मुलगा वारला. म्हातारे आजोबा, लहानगा चारु आणि विशीच्या आंत विधवा झालेली कावेरी हीं तिघे संसारांत उरलीं. दुबळेपणाची नि दैन्याची सावली त्यांच्या आयुष्यावर पसरली.

कावेरीला शहरांत रहायची मोठी आवड होती. तिनें पुण्यांत रहायचा हट्टच धरला. आजोबांचा नाइलाज झाला. वयोमानामुळें कथाकीर्तन करणें कांहीं त्यांना आतां शक्य नव्हतें ! जमिनीच्या तुटपुंज्या उत्पन्नावर ते कसाबसा संसार चालवीत. पण आपण अगदीं पिकलें पान झालों आहों, आपल्या मागें सुनेचें व नातवाचें कसें होईल, ही काळजी त्यांच्या मनाला अगदीं सतावून सोडीत असावी ! ते ही गोष्ट बोलून दाखवीत नसत हें निराळें. पण चारूला डोळे भरून पाहतां पाहतां त्यांचे डोळे पाण्यानें कसे भरून जातात हें अभयनें अनेकदां पाहिलें होतें.

अशा परिस्थितींत कावेरीच्या स्वभावांतला कडवटपणा वाढला नसता तरच नवल ! आपल्या गरिबीचा फायदा घेऊन या थेरड्यानें आपणाला एका अर्धवटाच्या गळ्यांत बांधलें, आपल्या वयाच्या मुली नाचत बागडत असतांना आपल्यावर कोंपऱ्यांत बसण्याची पाळी आणली, रूपांत आपल्या पासंगाला सुद्धां न लागणाऱ्या पोरी नटून थटून फिरत असतांना आपल्याला मात्र घराबाहेर पडायची चोरी झाली आहे, याच गोष्टी ती मनांतल्या मनांत उगाळीत

बसे. सासऱ्याच्या मनाविरुद्ध वर्तन करण्यांत तिला जणुं कांहीं सूड घेतल्याचें समाधान लाभत असावें ! समोरच्या बंगल्यांत ' प्रीतिविण वेडापिसा ' हें गाणें सुरू झालें कीं कावेरी दाराबाहेर येऊन तें ऐकत राही. तें पाहिलें कीं म्हाताऱ्याची तळव्याची आग मस्तकाला जाई. एकदां तिनें आपल्या केंसांत फुलें खोंवलीं. तीं पाहून आजोबा आपल्या काठीनें तिचा कपाळमोक्षच करायला उठले !

आक्काशीं तिचें कधींच रहस्य झालें नाहीं. तिच्या डोळ्यांत भरण्याइतकी आक्का कुठें श्रीमंत होती ? कावेरी समोरच्या बंगल्यांत जाऊन बसे. श्रीमंती उपभोगायला नाहीं तर नाहीं, निदान डोळ्यांनीं पहायला तरी मिळावी म्हणूनच ती आयुष्य कंठीत होती कीं काय कुणाला ठाऊक !

हें सारें ठाऊक असल्यामुळें अभयला आजोबांच्या प्रमाणें कावेरीचीही कींव येई. आजोबांना बाहेरचें जग पहायला मिळत असूनही ते मनानें टिळकांच्याच काळांत वावरत होते ! मग कावेरीला दोष देण्यांत काय अर्थ होता ? तिला फारसें लिहितां वाचतां सुद्धां येत नव्हतें ! बिचारी कुठल्या तरी खेड्यांत दरिद्री नातेवाईक हिडिस फिडिस करीत असतांना भुकेल्या डोळ्यांनीं, भुकेल्या शरीरानें, भुकेल्या मनानें लहानाची मोठी झाली होती. त्या मनाला उपभोगापेक्षां, श्रीमंतीपेक्षां, अधिक उच्च असें जगांत कांहीं असूं शकतें याची कल्पना तरी कशी यावी ?

आजोबा आणि कावेरी यांच्या विषयीं विचार करतां करतां एकदम अभय दचकला. कधींही आजपर्यंत त्याच्या मनांत न आलेली कल्पना एकदम त्याच्या डोळ्यांपुढें उभी राहिली.

आजोबा आणि कावेरी !

आक्का आणि आपण !

चित्रपटांतल्या एकाद्या चमत्कृतिपूर्ण दृश्याप्रमाणें ही कल्पना त्याला वाटली.

मालेच्या घराच्या दारांतच तिची धाकटी बहीण प्रमिला उभी होती. ती हंसत हंसत म्हणाली ' साऱ्या गोष्टींत तुमचा पहिला नंबर असतो हं, अभय ! '

‘ म्हणजे ? कुणीच आलं नाहीं अजून ? ’

‘ अं हं ! कुणाचंसं बोलावणं आलं म्हणून बाबा तिनिसांजा गेले ते अजून परत आले नाहींत. मग पाहुण्यांचा कुठून पत्ता असणार ? ’

‘ माला कुठं आहे ? ’

‘ तीही पाहुणीच झाली आहे हल्लीं ! ’

तिच्या या बोलण्याचें अभयला मुळींच आश्चर्य वाटलें नाहीं. मालेविषयीं तिला मधून मधून वाटणारा सूक्ष्म मत्सर त्याच्या कधींच लक्षांत येऊन चुकला होता. मात्र या मत्सराबद्दल तिला दोष द्यायला त्याचें मन तयार होत नसे. मालेच्या मानानें तिचें रूप सामान्य होतें. पण एवढ्या एका कारणामुळें कळत न कळत तिचा किती पाणउतारा होई ! परक्या माणसासमोर सुद्धां तिची आई नेहमीं म्हणे ‘ मालेची नाहीं मला काळजी वाटत ! खरा रुपया काय कुठंही चालतो ! मला भीति वाटतेय् ती हिची ! असला बद्द रुपया कोण घेणार ? ’ आईच्या या उद्गारांत थट्टेचाहि थोडासा भाग असेच ! पण सोळा सतराव्या वर्षी मुलामुलींचा अहंकार इतका नाजुक असतो कीं गुलाबाच्या कांट्याच्या ओरखड्यांनींही त्याला तीव्र वेदना होतात !

अभय कांहींतरी बोलेल अशी प्रमिलेची कल्पना होती. पण तो स्तब्ध राहिलेला पाहून ती म्हणाली ‘ या ना ! मालेच्या खोलींत बसूं या आपण ! ’

प्रमिलेनें मालेच्या खोलीचा दरवाजा उघडला तेव्हां आंत अंधार होता. पण त्या अंधारांतच अभयला आपल्या अनेक आवडत्या गोष्टी क्षणार्धांत दिसल्या.

त्याला भास झाला—आपण गेल्या दिवाळीला मालेला भेट म्हणून दिलेलें तें चित्र समोरच्या भिंतीवर दिसत आहे. एका इंग्लिश कुटुंबांतली मंडळी जेवायला बसलीं आहेत, एक उमदा घोडा खिडकींतून आंत डोकावून पाहत आहे, सारीं मुलें त्याच्या तोंडांत घांस देण्याकरितां आपआपल्या खुर्च्यांवरून उठत आहेत, आणि आई मोठ्या कौतुकानें हें दृश्य पाहत आहे, असें तें चित्र आहे. त्या चित्राचें नांव ‘ आमचा दोस्त ! ’

त्या चित्राच्या उजव्या बाजूला दोन्ही हात एकमेकांत गुंफून तेजस्वी मुद्रेनें पाहणाऱ्या विवेकानंदांचा फोटो आहे. डाव्या बाजूला दांडी–यात्रेला निघालेल्या महात्माजींचा फोटो आहे. गांधींचा हा एकच फोटो अभयला फार आवडत असे.

इकडे टेबलावर—

प्रमिलेनें लावलेल्या विद्युद्दीपाच्या प्रकाशांत समोरली भिंत नाहून निघाली.

अभय चकित झाला. भिंतीवर नेहमींप्रमाणें तीन फोटो होते. पण त्यांतले दोन नटींचे होते. ग्रेटा गार्बो नि देविकाराणी असाव्यात त्या बहुधा. त्या दोघींच्या फोटोमध्यें एक निसर्गदृश्य दिसत होतें. कड्यावरून खालीं उडी घेणाऱ्या एका निर्झराचें चित्र होतें तें ! काळ्या कभिन्न खडकांच्या पार्श्वभूमीवर निर्झराचें पांढरें शुभ्र पाणी मोठें मनोहर दिसत होतें. जणुं कांहीं मूर्तिमंत निर्भयताच हंसत होती तिथें !

अभयनें पुढें होऊन त्या चित्राखालचें नांव वाचलें.

स्नानमग्ना !

आतां कुठें त्याच्या लक्षांत आलें कीं चित्रांत बाजूच्या एका खडकावर एक अर्धनग्न स्त्री पाण्यांत पाय सोडून स्नान करीत बसली आहे ! त्या स्त्रीची आकृति मोठी रेखीव होती. पण त्या चित्रांत कांहींतरी वैगुण्य आहे असें अभयला वाटूं लागलें.

त्यानें उजव्या बाजूच्या भिंतीकडे पाहिलें. गांधी, विवेकानंद आणि तो घोडा यांची मालेनें कांहीं अजीबाद उचलबांगडी केली नव्हती ! फक्त त्यांची जागा बदलली होती. आपल्या खाटेच्या बाजूला तिनें हे फोटो मुद्दाम लावले असावेत ? सकाळीं उठता बरोबर त्यांचें दर्शन व्हावें म्हणून ?

छेः !

अभय खुर्चीवर बसण्याकरितां टेबलाजवळ आला. तिथेंही अशीच क्रांति झाली आहे असें त्याला दिसून आलें. सुट्टींत तो खेडेगांवीं जायला निघाला होता तेव्हां त्यानें मालेला वाचण्याकरितां दोन पुस्तकें दिलीं होतीं. एक अप्टन् सिंक्लेअरची 'No Pasaram' ही कादंबरी आणि दुसरें 'Some Confe-

ssions of an Average man ' हा त्याला फार आवडलेला निबंध-संग्रह ! पण तीं दोन्ही पुस्तकें टेबलावर नव्हतीं.

त्यानें तिथलीं दुसरीं दोन पुस्तकें उचलून पाहिलीं. एकावरला Crime व दुसऱ्यावरला Mystery हे दोन शब्द तेवढे त्यानें कसेबसे वाचले. पहिल्या-तला गुन्हा कुणाचा नि दुसऱ्यांतलें रहस्य कशाचें हें जाणून घेण्याची त्याला इच्छा झाली नाहीं !

तीं पुस्तकें खालीं ठेवून त्यानें समोर पाहिलें. टेबलावरच्या श्रीकृष्णाच्या फोटोची जागा मालेच्या स्वतःच्या फोटोनें घेतली होती.

मालेला फोटो काढून घेण्याची मोठी हौस होती. अभयला ती वारंवार म्हणे 'आपला दोघांचा एक फोटो काढून घेऊं या ! बाबा कांहीं रागावणार नाहींत !'

मालेची ही सूचना अभय नेहमीं थट्टेवारी नेत असे.

आपल्या गैरहजेरींत मालेनें स्वतःची हौस भागवून घेतली हें पाहून अभयला आनंद झाला. मात्र तो आनंद निर्भेळ नव्हता !

फोटोंतली माला अतिशय सुंदर दिसत होती यांत शंका नाहीं. पण अभयला वाटलें—तिनें मुद्दाम खांद्यावरला पदर दूर सरकविला आहे ! तिचा गौर मांसल दंड आणि उघड्या गळ्यावरून खालच्या पदरावर पडलेली मोहनमाळ यांच्यांत आकर्षकपणा होता यांत संशय नाहीं. पण——

पण या आकर्षणांत स्वाभाविकता नव्हती. नटींचीं विशिष्ट बैठकीचीं मोहक स्थिरचित्रें जशीं मुद्दाम घेतात, तसा दिसत होता तो फोटो ! नटींना आपल्या सौंदर्यावर जगायचें असतें. त्यांनीं आपले असले फोटो दिले तर नवल नाहीं. पण मालेनें——

अभयचें दुसरें मन एकदम उसळून म्हणालें 'ती लता उद्यां नटी होईल. तिचे असलेच फोटो ठिकठिकाणीं प्रसिद्ध होतील. तिनं सिनेमांत जाणं जर गैर नाहीं तर मालेनं असला फोटो काढून घेतला म्हणून—'

पहिलें मन तावातावानें म्हणालें ' लता अभयची कुणी नाहीं ! पण माला ? माला त्याची होणार आहे ! '

' त्याची ? म्हणजे समाजवादाचा हा पुरस्कर्ता उद्यां आपल्या बायकोवर मालकी हक्क गाजविणार आहे म्हणायचा ? ' पहिल्या मनाकडून टोमणा आला.

प्रमिला हातांत एक सरबताचा पेला घेऊन आंत आली. तिच्या मधुर हास्यानें अभयच्या मनांतला हा विचित्र कोलाहल शांत झाला.

सरबत घेतां घेतां अभय हंसूं लागला. लता आणि प्रमिला यांच्या मनोवृत्तींत कांहींतरी साम्य असलें पाहिजे असा विचार त्याच्या मनांत येऊन गेला होता. यावेळीं जर माला असती तर तिनें आपल्याला चहाच आणून दिला असता, असेंही त्याच्या मनांत आल्यावांचून राहिलें नाहीं.

त्याचें हास्य पाहून प्रमिलेनें विचारलें ' एवढं हंसायला काय झालं ? '

' सरबत फार गोड झालंय् ! '

' अगदीं थोडी साखर घातली होती मी ! '

' अस्सं ? मग लग्नाच्या बाजारांत तूं लवकर खपणार नाहींस असं आई म्हणतात तें अगदीं खोटं आहे म्हणायचं ! '

अभयच्या कोटीचा रोख कांहीं केल्या प्रमिलेच्या लक्षांत येईना.

अभय हंसत म्हणाला ' हल्लीं तरुण मंडळींना चहा फार लागतो; पण पगार मात्र कमी मिळतो. तेव्हां थोडी साखर घालून चहा खूप गोड करणारी मुलगी त्यांना आवडल्या शिवाय राहणार नाहीं ! '

' पण दिवसांतन सतरा वेळां नवऱ्याचा चहा करण्याकरितां कांहीं आपला जन्म नाहीं असं त्या मुलीला वाटत असलं तर ? '

मालेच्या तोंडून अशा प्रकारचा प्रश्न अभयनें कधींच ऐकला नव्हता. किंबहुना बी. ए. च्या वर्गांत असूनही तिचा ऐच्छिक विषय लग्न हाच होता !

त्यामुळें यंदाच कॉलेजांत गेलेल्या प्रमिलेच्या तोंडचे हे शब्द ऐकतांच अभयला थोडेसें आश्चर्य वाटलें. त्याच्याकडे रोखून पाहत प्रमिला म्हणाली

लग्नाच्या बाजारांत मुलीनं उभं राहणं म्हणजे गुलाम म्हणून आपली विक्री करून घेणं आहे ! बाजारांत असा लिलांव करून घेण्यापेक्षां—'

आपण एकदम अधिक तापलों असें तिचें तिलाच वाटलें असावें ! ताणतां ताणतां रबर एकदम तुटावें, त्याप्रमाणें तिचें बोलणें मधेंच थांबलें.

ती हंसून म्हणाली ' मी व्याख्यानं फार चांगलीं देईन नाहीं ? '

' यांत कांहीं शंका नाहीं. अवघा एक श्रोता असला नि तोही माझ्या-सारखा अरसिक असला—तरी—'

' कांहींतरीच काय बोलतां ? ' अशा अर्थाचा अभिनय डोळ्यांनीं करीत प्रमिला उद्गारली ' अय्या ! तुमचीं दोन पुस्तकं माझ्याकडं आहेत हं ! मालेच्या टेबलावर होतीं तीं ! तिनं तीं पुरीं वाचलीं सुद्धां नाहींत ! मला मात्र फार आवडलीं हं तीं ! असलीं खूप खूप पुस्तकं मला आणून द्यायला हवींत आतां ! अगदीं हक्कानं मागतेंय् मी ! '

' हक्कानं ? '

' हो हक्कानं ! धाकट्या मेव्हणीचा हक्क आहे हा ! '

बोलतां बोलतां रिकामा पेला हातांत घेऊन प्रमिला निघून गेली. लगेच हातांत दोन पुस्तकें घेऊन ती परत आलीही ! अभयला लवलवत राहणाऱ्या विजेची आठवण झाली.

तो तिला म्हणाला, ' बैस ना ! तूं पुस्तकं वाचलीं आहेस कीं उगीच थापा मारते आहेस हें तरी पाहूं या. मोतिराम मणेरीकर ठाऊक आहेना ? स्वारीच्या हातांत दररोज नवीन पुस्तक बघून घ्यावं ! पण डोक्यांत—'

' डोक्यांत पोरींचे पत्ते, चित्रपटांचीं नांवं, नटींचे फोटो—'

' तुझ्या ओळखीचा आहे वाटतं ? '

' अं हं ! मी त्याच्या ओळखीची आहे ! '

' म्हणजे ? '

‘ दोन महिन्यापूर्वी स्वारी पत्रं पाठवीत होती मला ! त्याचं पत्र आलं कीं मी तें आरशासमोर उभी राहून वाचीत असे ! ’

‘ कां ? ’

‘ लिहिणारा किती मूर्ख आहे याची खात्री व्हावी म्हणून. तो पत्रांत माझं असं वर्णन करी कीं जणूं काय मी अप्सराच आहे एकादी ! ’

आतांही प्रमिला बोलतां बोलतां एकदम थांबली. लगेच ती हंसून म्हणाली ‘ तुमच्याशीं बोलतांना वेळ कसा जातो तें कळतच नाहीं. पण घरांत आई एकटी आहे ! दहा माणसांचा स्वयंपाक करतेय् बिचारी ! नि तोही कांहीं साधा नाहीं ! तेव्हां—’

हां हां म्हणतां प्रमिला अदृश्य झाली.

तिनें आणून दिलेल्या पुस्तकांपैकीं अभयनें निबंधांचें पुस्तक सहज चाळायला सुरवात केली.

मधेंच एक सुंदर नोटपेपर त्याला दिसला.

कुणाचें तरी पत्र असावें तें ! त्याला वाटलें—मोतिरामाचें असलें तर तें वाचून आपली करमणूक होईल ! पण दुसऱ्या कुणाचें असलें तर ?

छेः ! खाजगी पत्र पुस्तकांत विसरण्याइतकी प्रमिला कांहीं भोळी नाहीं !

वेळ जायला कांहीं तरी चाळा हवा होता म्हणूनच कीं काय अभयनें तो कागद उघडला.

पत्र असलें तर तें पुन्हां तसेंच मिटून ठेवावें म्हणून त्यानें खालची सही पाहिली.

खालीं सहीच नव्हती ! त्यानें वर पाहिलें. वर कांहीं इंग्रजी वाक्यें होतीं आणि खालीं त्यांचें मराठी भाषांतर होतें.

प्रमिलेला पुस्तकांतली कुठलीं वाक्यें आवडलीं असावींत हें पाहण्याची जिज्ञासा अभयच्या मनांत उद्भवली.

तो वाचूं लागला—

A thousand and one almost unsurmountable barriers separate people, few of which are necessary and most of which are stupid.

प्रमिलेनें याचा अनुवाद असा केला होता—' मनुष्यामनुष्यामधें हजारों दुर्लंघ्य भिंती उभारल्या गेल्या आहेत. त्यांपैकीं आवश्यक अशा फारच थोड्या आहेत. बाकीच्या बहुतेक आमच्या मूर्खपणाच्या आधारावर उभ्या आहेत ! '

दुसरें वाक्य !

The honest hard-working intelligent young mechanic is socially as nothing beside the young man of independent means, who spends his time mostly in night-clubs, in knocking a ball hither and thither with wooden clubs of varying shapes or in killing animals infinitely more beautiful than he is himself.

आपल्यालाही हेंच वाक्य आवडलें होतें याची अभयला आठवण झाली. हें वाक्य वाचतांना त्याच्या मनापुढें दोन चित्रें उभीं राहिलीं होतीं. पहिलें—निढळाच्या घामानें सारें जग फुलविणाऱ्या श्रमिकाचें ! आणि दुसरें—कष्टावांचून मिळणारा पैसा पाण्यासारखा खर्च करून स्वतःचें विलासी जीवन फुलविणाऱ्या प्रेमिकाचें !

अभय प्रमिलेचा अनुवाद वाचूं लागला—' हें चित्र पहा आणि हें चित्र पहा ! '

त्याला आश्चर्य वाटलें !

मालेहून वयानें लहान असलेल्या आणि आपल्या सहवासांत फारशा न आलेल्या प्रमिलेनें या उताऱ्याशीं आपल्या इतकेंच समरस व्हावें आणि मालेला मात्र हें पुस्तक नीरस वाटावें ?

माला—प्रमिला !

माला—लता !

लता आणि प्रमिला या मालेइतक्या सुंदर नाहींत. पण—

त्याचें मन म्हणत होतें—

अजून कशी माला परत आली नाहीं ? मघाशीं कांचनच्या मोटारींत तीच होती यांत शंका नाहीं ! इतक्या अपरात्रीं—आपण जेवायला येणार हें ठाऊक असून–अगदीं लवकर लवकर या म्हणून आपल्याला आग्रह करून—ही माला—

मालेचा तो समोरचा फाजील शृंगारिक फोटो अभयला पाहवेना.

त्यानें मान वळविली.

भिंतीवर दोन नटींच्या मधें कड्यावरून निर्झर निधड्या छातीनें उडी टाकीत होता, तळाशीं एका खडकावर एक अर्धनग्न सुंदर स्त्री—

आपल्याला प्रिय असलेल्या मनुष्याचें प्रेत पाहण्याचा प्रसंग आला कीं मनुष्य जसे डोळे मिटून घेतो, तशी अभयची मनःस्थिति झाली.

तो नटवा फोटो—तें मिथुनभावनेला चाळविणारें चित्र—

छेः ! एकदम उठून अभयनें दिवा मालविला.

तो परत खुर्चीवर बसला न बसला तोंच कुणीतरी खोलींत धांवत आलें.

आंत आलेली व्यक्ति तडक खाटेकडे गेली असावी !

कांकणांचा आवाज ! लगेच खाटेवर धाडकन् अंग टाकल्याचा आवाज !

त्या आवाजाच्या पाठोपाठ हुंदके ऐकूं येऊं लागले.

मघाशीं हंसत खेळत असलेली प्रमिला खोलींत एकदम धांवत येते काय आणि खाटेवर अंग टाकून रडूं लागते काय !

तिला काय झालें असावें याचा अभयला तर्कच करितां येईना.

दिवा लावण्याकरितां खुर्चीवरून उठतां उठतां त्यानें प्रेमळ स्वरानें हांक मारिली ‘ प्रमिला ? ’

खाटेवरले हुंदके अधिक जोरानें ऐकूं येऊं लागले.

# ७

# जीवनाची सफलता कशांत आहे ?

दिवा लावतांच खोलींत लख्ख प्रकाश पडला ! पण एका क्षणांत नाहींसा झालेला अंधार अभयच्या मनांत कोंदटला.

खाटेवर हुंदके देत पडलेली व्यक्ति प्रमिला नव्हती ! ती माला होती !

दुपारीं फुलपांखराप्रमाणें बागडणारी माला, मघाशीं कांचनच्या मोटारींत त्याच्या पलीकडे ऐटीनें बसलेली माला—असें ओक्साबोक्शीं रडायला झालें तरी काय तिला ?

या विचाराबरोबरच अभयच्या मनांत दुसराही विचार आला. मालेचे हुंदके ऐकून प्रमिला येईल, घरांतली इतर मंडळी गोळा होतील नि मग——

त्यानें हळूच खोलीचें दार लावलें.

मालेजवळ येऊन त्यानें मृदु स्वरानें हांक मारली ‘ माला——’

त्याच्याकडे न पाहतांच माला डोळे पुसूं लागली. आतां तिचे हुंदके थांबले होते.

तिच्या खांद्यावर मोठ्या मायेनें हात ठेवीत अभयनें विचारलें ‘ काय झालं माला ? ’

माला चटकन् वळली. एखाद्या लहान मुलाप्रमाणें अभयच्या कंबरेला विळखा घालून तिनें विचारलें ‘ अभय, मी तुझी ना रे ? ’

तुझी !

किती गोड शद्ब ! मृगाचा पाऊस अंगावर घेतांना जी शीतल माधुरी अनुभवायला मिळते ती त्या एका शद्बानें आपल्या मनाला लाभली असा क्षणभर अभयला भास झाला.

मालेचा विळखा सोडवीत तो म्हणाला ‘ मघाशीं अंधारांत मी प्रमिलेला हांक मारली, म्हणून ही शंका आली वाटतं तुला ? ’

आतां कुठें मालेनें वर पाहिलें. पावसाची सर संपतां संपतां चंद्राची कोर उगवावी, तशी तिची प्रेमनिर्भर दृष्टि अभयला वाटली.

तो थट्टेनें म्हणाला ‘ वळवाचा पाऊस होता होय हा ? मला वाटलं— आषाढांतली झड सुरू झाली आहे ! ’

‘ तुम्हांला किनई सदा न् कदा थट्टाच सुचते ! ’

‘ तुम्हांला कीं तुला ? ’

‘ इश्श ! ’

‘ हें पहा माला, माणसानं आपला शद्ब कधीं मागं घेऊं नये. ज्याला एकदां तूं म्हटलं त्याला जन्मभर तूंच म्हणायला हवं ! ’

‘ लग्न झाल्यावरही ? ’

‘ लग्न झाल्यावर तर अरे तुरे वर येण्याचे प्रसंग आयुष्यांत अधिकच येतात ! ’

पांच मिनिटांपूर्वीं माला रडत होती, हें कुणाला खरें सुद्धां वाटलें नसतें, इतकी तिची मुद्रा खेळकर झाली.

अभय म्हणाला ‘ असं पोरासारखं रडायला झालं काय तुला ? ’

माला भिंतीवरल्या नटींच्या फोटोंकडे पाहत म्हणाली ‘ भीति वाटली मला ! ’

‘ भीति ? कुणाची ? ’

‘ झोंपाळ्याची ! ’

‘ झोंपाळ्यावर बसायला कुठं गेली होतीस ? ’

‘ कांचनांच्या बंगल्यांत ! त्यांच्या मामांना स्टेशनावरनं घेऊन आलों आम्हीं ! मामा नि कांचनांची आई आंत गेलीं. मी नि कांचन बागेंतल्या झोंपाळ्यावर बसलों. पण पहिलाच झोंका त्यांनीं इतका मोठा काढला कीं—’

मालेचें अंग शहारल्यासारखें झालें.

तिचा भित्रेपणा अभयनें अनेक वेळां पाहिला होता. एकदां तिच्या वहींतून झुरळ निघालें. त्याबरोबर वही खालीं टाकून ती जी दूर जाऊन उभी राहिली—दुरून पाहणाराला वाटलें असतें कीं हिच्या वहींतून काळा विंचूच निघाला आहे !

फिरायला गेल्यावर चांदणी रात्र असली तरी ती एकटी घरीं येत नसे. पावसाळ्यांत विजा कडकडूं लागल्या म्हणजे खोलीच्या खिडक्या बंद करून आणि कानांत बोटें घालून ती भ्यालेल्या सशाप्रमाणें बसे.

हें सारें ठाऊक असल्यामुळें अभय म्हणाला ‘ कांहीं कांहीं माणसांना झोंपाळ्यावर बसलं कीं भोंवळ येते ! ’

‘ आतां गाडींतून उतरलें तेव्हां चक्कर येऊन पडतें असं वाटायला लागलं मला ! म्हणून एकटीच धांवत आलें मी ! ’

‘ दुसऱ्याला लवकर यायला सांगायचं नि आपण मात्र बाहेर भटकत बसायचं ! ’

माला लाडकेपणानें म्हणाली ‘ पुन्हां नाहीं अशी चूक होणार ! कुणी लवकर येणार असलं तर दाराआड लपून बसत जाईल नि—’

‘ आज कांचनचे मामा आले. काल कुणाचे काका आले होते ? ’

‘ काल ? ’ पदराचें टोंक दांतांत धरीत मालेनें विचारलें.

अभय कांहींच बोलत नाहीं असें पाहून ती म्हणाली ‘ कांचनांनीं फसविलं मला काल ! आक्कांना निकाल लवकर कळावा म्हणून त्यांच्या गाडींतन जायला

निघालें मी! पण त्यांनीं जी गाडी सोडली ती थेट बंड गार्डनकडच नेली. तिथनं आम्ही खडकीला गेलों. तिथं एका हॉटेलांत–'

माला स्वर खालावून म्हणाली 'काल पहिल्यांदा आम्लेट खाल्लं मी!

'काल खडकीला गेली होतीस तूं?'

'हो! कांचनांची मोठी फजिती झाली तिथं. दुसऱ्या मजल्यावर दोघे मजेनं चहा घेऊं म्हणून मला सांगून त्यांनीं गाडी एका हॉटेलाच्या दारांत उभी केली. पण–'

'पण काय?'

'दुसरा मजला रिकामाच नव्हता!'

'तुमच्या आधीं दुसऱ्या रसिक मंडळींनीं तो पटकावला असेल!'

'रसिक? मुलखाचे अरसिक होते ते! कुठले टोळभैरव जमले होते कुणाला ठाऊक! मधून मधून हंसत काय होते, ओरडत काय होते—दारू बिरू सुद्धां प्यायले असतील मेले!'

अभयला कालच्या योगायोगाचें मोठें आश्चर्य वाटलें.

ज्या दोन तरुण माणसांचे जिवन-प्रवाह अगदीं जवळून वाहूं लागले आहेत, लवकरच ज्यांचा संगम होण्याचा संभव आहे, त्यांच्यापैकीं तरुण हॉटेलाच्या वरच्या मजल्यावर परदेशीं जाऊन आलेल्या, स्पेनमधल्या लढ्यांत प्रत्यक्ष भाग घेतलेल्या एका तरुणाशीं क्रांतीची चर्चा करण्यांत समरस होतो आणि तरुणी? ती इंग्लंडहून आलेल्या एका श्रीमंत मनुष्याबरोबर रमत गमत त्या हॉटेलांत येते, वरचा गलबला ऐकते नि नकळत आपल्या प्रियकराला दारूबाज ठरविते!

माला आणि आपण जवळ आलों आहों हें खरें! पण हा जवळपणा मनांचा आहे कां?

छेः! माला सुंदर आहे, तीन वर्षें आपण तिला शिकवीत आहों, तारुण्य-सुलभ भावनेला सहवासाची जोड मिळाल्यामुळें आपल्याला तिच्याविषयीं प्रेम वाटूं लागलें आहे!

आणि तिला आपल्याविषयीं वाटणारें प्रेम ? तेंही असेंच परिस्थितीनें निर्माण झालें आहे ! भावाच्या मदतीनें दत्तोपंत प्रपंच चालवीत आहेत. भारंभार हुंडा देऊन श्रीमंत स्थळीं मुलगी देण्याचें त्यांना सामर्थ्य नाहीं. लग्न होईपर्यंत मुलींना शिकविल्या शिवाय गत्यंतर नाहीं म्हणून त्यांनीं मालेला कॉलेजांत घातली. शिकवणीच्या निमित्तानें आपला नि त्यांचा परिचय झाला. आज ना उद्यां वकील होणारा होतकरू तरुण या दृष्टीनें त्यांना अभय जांवई म्हणून पसंत पडला. मालेच्या आणि आपल्या परस्परांविषयींच्या भावनांना त्यांनीं मूक संमति दर्शविली.

अभयच्या मनांत आलें—पण आपलें नि मालेचें एकमेकांविषयींचें हें प्रेम खरोखर जन्मभर फुलत राहील कां ?

एकवेळ विहीर फार रुंद नसली तरी चालते. पण ती खोल मात्र हवी ! नाहींतर तिच्यातलें पाणी उन्हाळ्यांत आटून जातें. प्रीति सुद्धां जलाशयासारखीच नाहीं कां ? आयुष्यांतल्या उन्हाळ्यांत—

अभय इतका कसला विचार करीत आहे हें मालेला कळेना. ती आर्जवी स्वरानें म्हणाली ‘ क्षमा केलीत ना मला ? हो ! केलीच ! ’

अभय नुसता हंसला.

त्याचे दोन्हीं हात हातांत घेऊन माला म्हणाली ‘ क्षमा केली असं हात धरून लिहून घेणार आहे मी ! ’

तिच्या हाताचा मधुर कंप अभयच्या हातांना जाणवला. त्या मूक कंपांत जगांतलें सारें दुःख विसरायला लावणारें मधुसंगीत भरलें आहे, त्या क्षणिक स्पर्शांत मधुर मोहनिद्रा आणण्याचें सामर्थ्य आहे, असा त्याला भास झाला.

त्यानें मालेकडे पाहिलें. तिच्या डोळ्यांत अप्सरा नाचत होत्या, गंधर्व गात होते.

कुणी तरी आपल्याला पुढें ओढीत आहे असें अभयला वाटलें.

दुसऱ्याच क्षणीं त्यानें मालेच्या हातांतून आपले हात काढून घेतलें ! ‘ प्रमिला बोलावतेय् वाटतं ! ’ तो उद्गारला.

मालेची दृष्टि त्याला म्हणत होती–किती भित्रे आहांत.

त्याचे डोळे उत्तर देत होते–हा भित्रेपणा नव्हे ! हें शौर्य आहे !

× × × ×

अभयच्या पानासमोरच लतेचें पान होतें. त्याच्याकडे पाहून ती म्हणाली ‘ मी सनातनी होणार असं वाटायला लागलंय् मला !—’

‘ कशावरनं ? ’

‘ जुन्या गोष्टींवरला माझा विश्वास वाढायला लागलाय् ! इजा, बिजा नि तिजा हें किती वेळां ऐकलं होतं मी ! पण आज तें अनुभवाला आलं अगदीं ! ’

तिच्या जवळच बसलेल्या मालेला ती काय म्हणत आहे हें नीट कळेना. ती तिच्याकडे आश्चर्यानें पाहूं लागली.

आजच्या दिवसांत लतेची नि आपली तिसऱ्यांदा भेट होत आहे ही गोष्ट अभयच्या लक्षांत आली नव्हती असें नाहीं. पण लतेनें ती मार्मिकपणानें सुचविल्यामुळें त्याला या योगायोगाची अधिक गंमत वाटली.

मालेपलीकडे बसलेली बाई लतेची बहीण कीं आई हें कोडें कांहीं केल्या त्याला उलगडेना. आई म्हणावी तर तिचें वय तिसाहून अधिक नसावें असें दिसत होतें. विधवा असूनही तिनें आपल्या केंसांची रचना अत्यंत आकर्षक रीतीनें केली होती. तिनें ओंठांना रंग लावला असावा असाही अभयला भास झाला. डोक्यावरून मागें सरकणारा पदर ती पुनः पुन्हां वर घेत होती. आपण मोठ्या घराण्यांतल्या आहोंत हें दाखविण्याचा त्या बाईचा अट्टाहास पाहून अभयला हंसूंच आलें. ती सुंदर होती यांत संशय नाहीं. पण तिच्या साऱ्या हालचालींत कमालीची कृत्रिमता होती !

ती लतेची बहीण असावी हें मात्र उघड उघड दिसत होतें. तिच्या नि लतेच्या तोंडवळ्यांत विलक्षण साम्य आहे हें दोघींना ओझरतें पाहणारासुद्धां सांगूं शकला असता ! तिच्या चांफेकळीसारख्या नाकाशीं तुलना केली कीं लतेचें नाक अगदींच नकटें वाटे हें खरें ! पण दोघींचेही डोळे मात्र सारखेच सुंदर होते.

वांगीभात वाढायला आलेल्या प्रमिलेनें पानांत खूप भात वाढून 'हा सारा संपवायला हवा हं!' असें म्हटलें तेव्हां कुठें अभयच्या लक्षांत आलें कीं आपलें जेवणाकडे लक्ष नाहीं! ती बाई कोण असावी याविषयीं तर्क करण्यांतच आपण गुंग झालों आहों.

अभयच्या पलीकडे बसलेल्या कांचनाच्या पानांतला पहिला भात सुद्धां संपला नव्हता अजून!

प्रमिला त्याला हंसत म्हणाली 'हें हो काय?'

कांचननें उत्तर दिलें 'हिंदुधर्म की जय!'

सारीं माणसें त्याच्याकडे टकमका पाहूं लागलीं.

तो दत्तोपंतांकडे वळून म्हणाला 'हें कांव्याचमच्यांचें जेवण असतं तर कांचनचं मुसोलिनी होऊन स्वयंपाकघराचा केव्हांच अबिसिनिया केला असता! पण—'

इतरांप्रमाणें अभयलाही त्याच्या या बोलण्याचें हंसूं आलें. त्यानें लतेकडे पाहिलें. ती अगदीं गंभीर होती. माला मात्र पोट धरधरून हंसत होती.

कांचन दत्तोपंतांना म्हणाला 'रायफल-क्लब काढण्याआधीं मटन-क्लब काढण्याची फार जरूरी आहे आपल्याकड. इंग्लंडला जाण्यापूर्वीं मीं कसा होतों तें आईला विचारा! वाऱ्यानं उडून गेलों असतों अगदीं! पण तिथं चार वर्षांत ऐसा झालों कीं मोठी वावटळ आली तरी माझा नेकटाय् सुद्धां हलत नाहीं आतां!'

कांचन काय म्हणाला इकडे अभयचें लक्ष नव्हतें. तो मालेपलीकडच्या बाईकडे पाहत मनांत म्हणत होता 'एकूण ही लतेची आई म्हणायची!'

मालेनें मधेंच प्रश्न केला 'लठ्ठ होण्याचं औषध तरी काय घेतलंत तिथं?'

'औषध? डुकराचं मांस!'

मालेनें वेडेवांकडें तोंड करतांच कांचन म्हणाला, 'तुला नाहीं पटायचं तें! तुम्ही सगळे शेळीच्या दुधाचे भक्त! बीरनं प्रकृति किती चांगली राहते हें कधींच कळायचं नाहीं तुम्हांला!'

दत्तोपंत आणि कांचन यांचीं दोन चार मामुलीं उत्तरें प्रत्युत्तरें होऊन संभाषणाचा ओघ अहिंसेकडे वळला. दत्तोपंत जोराजोरानें गांधींचें तत्वज्ञान पुढें मांडूं लागले.

आतांपर्यंत कांचनच्या मामांनीं संभाषणांत मुळींच भाग घेतला नव्हता. जणुं कांहीं आपण जेवायला आलों आहों, तेव्हां जेवणाखेरीज दुसऱ्या गोष्टीकडे लक्ष देणें चुकीचें होईल असा त्यांचा समज होता !

दत्तोपंतांनीं 'तुमचं काय मत आहे, देवदत्त ?' असा प्रश्न केला तेव्हां त्यांच्या पलीकडे बसलेल्या मामांनीं वळून पाहिलें. अभयला त्यांचा चेहरा आतां कुठें पुरा दिसला.

देवदत्तांना पुढें थोडेसें टक्कल पडलें होतें. पण त्यामुळेंच त्यांचें कपाळ अधिक रुंद भासे, त्यांच्या चेहऱ्याला भव्यता आणण्याच्या कामीं या टक्कलानें थोडी फार मदत केली होती यांत संशय नाहीं. केंसांच्या रंगावरून ते उतार वयाचे आहेत असें कुणालाही वाटलें असतें. पण त्यांच्या डोळ्यांकडे पाहिलें कीं तिशींतल्या तरुणाची तरतरी त्यांच्यांत सळसळत आहे असा भास होई. त्यांच्या डोळ्यांतली स्वप्नाळुपणाची झांक तर अभयला मोठी गंमतीची वाटली.

पण त्यांच्या मूर्तीपेक्षांही त्यांची बुद्धि अधिक प्रभावी आहे ही खात्री अभयला पांच दहा पळांत पटली. देवदत्तांचा नि दत्तोपंतांचा संवाद सुरू झाला होता.

देवदत्त म्हणाले ' गांधींचं तत्वज्ञान वाचलं कीं मला एका ऐतिहासिक महात्म्याची आठवण होते ! '

दत्तोपंतांनीं उत्सुकतेनें विचारलें ' बुद्धाची कीं ख्रिस्ताची ? '

' शेखमहंमदाची ! एका हाऱ्यांतलीं चार कांचेचीं भांडीं हें त्या मनुष्याचं भांडवल होतं ! पण वजिराची मुलगी आपली बायको होऊन पायां पडायला आली म्हणजे तिला लाथ कशी मारायची या विचारांत त्यानं तें भांडवलही गमावलं ! गांधींची स्थितिही अशीच झाली आहे ! '

दत्तोपंतांनीं कपाळाला एक बारीक आठी घालून देवदत्तांकडे पाहिलें. अभयला देवदत्तांनीं गांधींची शेखमहंमदाशीं केलेली तुलना अगदींच अन्यायाची वाटली नाहीं. पण त्यांच्या स्वरांतला गांधीविषयींचा अनादर मात्र त्याला आवडला नाहीं.

देवदत्त शांतपणानें म्हणाले ‘आम्ही आपलीं गिरणींतलीं माणसं. तुमचं तें राजकारण नि फेडरेशेन आम्हांला कळत नाहीं! पण मृगजळामागं लागून हरिणाची तहान भागत नाहीं हें सांगायला कांहीं साधुसंत लागत नाहींत! कुणीही सामान्य मनुष्य तें सांगूं शकेल!’

‘गांधीजींचं तत्वज्ञान हें मृगजळ आहे?’ दत्तोपंतांनीं उपहासाच्या स्वरानें प्रश्न केला. तें अमृत आहे असेंच त्यांनीं आपल्या स्वरानें जणुं कांहीं ध्वनित केलें.

पण देवदत्तांवर त्यांच्या स्वराचा कांहींच परिणाम झाला नाहीं. पूर्वीं इतक्याच शांतपणानें ते म्हणाले ‘हें पहा दत्तोपंत, आहिंसेचाच प्रश्न घेऊं. हिंदुस्थानांतली शेंकडा पांच माणसं तरी पूर्णपणें शाकाहारी आहेत कां? इकडं गांधी दररोज आहिंसेचा काथ्याकूट करताहेत नि तिकडं कोट्यवधि लोक नित्यहिंसा करताहेत!’

देवदत्त बोलण्यांत सांपडले अशा आविर्भावानें दत्तोपंत उद्गारले ‘आमचंही तेंच म्हणणं आहे. जिभेचे चोचले पुरविण्यासाठीं निरुपद्रवी जिवांची हत्त्या करणं माणुसकीला शोभत नाहीं!’

क्षणभर हंसून देवदत्त म्हणाले ‘पोटांतली आग म्हणजे जिभेचे चोचले असा गांधींच्या कोशांत अर्थ असला तर वादच मिटला! कोंकणांतल्या एकाद्या खेड्यांत चार दिवस जाऊन रहा तुम्हीं दत्तोपंत! मासळी नसेल तर खेडेगांवांतल्या गरिबांना तोंडीं लावायला सांबारंसुद्धां मिळत नाहीं तिथं! माशाला जीव आहे, पाण्यांतून बाहेर काढल्यावर तो तडफडतो, वगैरे गोष्टी त्या लोकांना सुद्धां समजतात! पण त्यांना जगायचं असतं! नुसता उपदेश करायचा नसतो! जीवनाचं तत्वज्ञान सामाजिक मनांतून निर्माण व्हायला हवं याचा तुमच्या

गांधींना पत्ता तरी आहे कां ? वस्तुस्थितीपेक्षां चमत्कृतीवरच त्यांचा अधिक भर आहे ! आपल्या आंतल्या आवाजापुढं बाहेरच्या कोलाहलाला ते काडीचीही किंमत देत नाहींत !

'गांधींना बरी वाईट कसली तरी नीति आहे. पण त्यांच्यावर टीका करणारांना तीही नाहीं !' दत्तोपंत चिडून उद्गारले.

देवदत्त स्वस्थ राहिले. स्नेह्याच्या घरीं जेवायला येऊन तिथें वादविवादांत वर्दळीवर येणें त्यांना अप्रशस्त वाटलें असावें.

पण अभयला आतां गप्प बसवेना. तो दत्तोपंतांकडे वळून म्हणाला 'गांधींना ज्या नीतीचं महत्व वाटतं, ती वैयक्तिक नीति आहे ! पण व्यक्तीची नीति म्हणजे कांहीं सामाजिक नीति नव्हे ! कुणी काय खावं या गोष्टीपेक्षां समाजांतल्या प्रत्येक व्यक्तीला पोटभर खायला कसं मिळेल हा अधिक महत्वाचा प्रश्न नाहीं कां ? पण सामुदायिक पद्धतीनं शेती करावी, कारखाने काढावेत, नवीन यांत्रिक शोधांचा उपयोग करावा इत्यादि गोष्टी मात्र गांधी कधीं प्रतिपादन करणार नाहींत. सामुदायिक शेती म्हटली कीं जमीनदारांच्या हक्कांचा प्रश्न येणार ! गांधींच्या दृष्टीनं जमीनदार हे पालक आणि शेतकरी हीं त्यांचीं अज्ञान मुलं ! कुठं एकादा जमीनदार दुष्ट असला तर उपास करून त्याचा हृदय-पालट घडवून आणा असा सल्ला गांधी देणार ! गांधींचीं एकेका गुंतागुंतीच्या प्रश्नावरलीं मतं ऐकलीं कीं आपल्या जुन्या बटव्यांतून ठरविक औषधं काढणाऱ्या आजी-बाईची आठवण होते मला ! त्या बटव्यांतलीं कांहीं औषधं पिढ्यान् पिढ्या उपयुक्त ठरलेलीं असतात हें खरं ! पण तेवढ्यामुळं वैद्यशास्त्रांतले नवे शोध मूर्खपणाचे आहेत असं कांहीं सिद्ध होत नाहीं !'

'तुम्ही जेवायला आलाय् अभय, व्याख्यान द्यायला नाहीं !' या प्रमिलेच्या शद्बांनीं अभय भानावर आला ! नाहींतर तो किती वेळ बोलत राहिला असता कुणाला ठाऊक !

प्रमिला त्याला श्रीखंडाचा आग्रह करीत होती. 'नको नको' म्हणून त्यानें पानावर दोन्ही हात धरले तेव्हां ती ह्मणाली 'इतरांच्या तिप्पट वाढणार आहे मी तुम्हाला !'

‘ इतका कां खादाड आहे मी ? ’

‘ अं हं ! आज तीन मेजवान्या आहेत तुम्हाला ! ’

‘ तीन ? अरे बापरे ! इथं डॉक्टरसुद्धां नाहीं कुणी ! ’

त्याच्या विनोदाला हंसत हंसत प्रमिला उत्तरली ‘ पहिली मेजवानी सर्वांच्या बरोबरची. दुसरी परीक्षा पास झाल्याची. नि तिसरी– ’

तिनें हळूच मालेकडे पाहिलें. दत्तोपंत, देवदत्त, लतेची आई व कांचन यांचें कांहीं निराळेंच बोलणें चाललें होतें ! त्यामुळें त्यांचें लक्ष प्रमिलेच्या मूक अभिनयाकडे गेलें नाहीं. पण तो लतेच्या मात्र लक्षांत आला.

× × ×

अभयला गाडींतून घरीं पोंचविण्याची तत्परता लतेनें दर्शविली. पण दत्तोपंतांनीं ‘ अभय बसूं देत जरा ! मला कांहीं लवकर झोंप येत नाहीं ! कुणी तरी गप्पा मारायला असलं म्हणजे तितकंच बरं ! ’ अशी प्रस्तावना केल्यामुळें अभयला रहावें लागलें.

दत्तोपंतांनीं आपल्याला मुद्दाम मागें ठेवून घेतलें आहे हें त्याला उघड दिसत होतें.

मधुर संवेदनांच्या तरंगावर त्याचें मन झुलूं लागलें. त्याला वाटलें—ते बहुधा मालेच्या लग्नाचा विषय काढणार असतील. आपण काल परीक्षा पास झालों, उद्यां वकील होऊं. यावेळीं मालेला पुढें केली नाहीं तर दुसरा कुणीतरी मुलीचा बाप आपल्यावर झडप घालून आपल्याला घेऊन जाईल अशी त्यांना भीति वाटत असावी ! मालेचें नि आपलें रहस्य—छेः ! त्याची त्यांना कशी कल्पना येणार ?

त्यांनीं मालेचा विषय काढला तर त्याला काय उत्तर द्यायचें ?

आपण कांहीं ब्रम्हचारी राहण्याची प्रतिज्ञा केलेली नाहीं ! वृक्षाला फळां-प्रमाणें फुलंही पूर्णता आणतात. जीवनाचंही तसंच आहे. त्याच्या विकासाला पराक्रमाइतकीच प्रीतिही आवश्यक आहे. मालेशिवाय दुसऱ्या कुठल्याच मुलीचें आतांपर्यंत आपल्याला आकर्षण वाटलें नाहीं. तेव्हां—

पण पराक्रम आणि प्रीति यांचा संगम आजच्या घटकेला सुलभ आहे कां ?

उद्यां वकील होऊन आपण खूप पैसा मिळविला, डेक्कन जिमखान्यावर सुंदर बंगला बांधला, आपल्या दारांत मोटार दिसूं लागली म्हणजे आपण पराक्रमाचें शिखर गांठलें, असें म्हणता येईल कां ?

छेः ! या पराक्रमांत अलौकिक असें काय आहे ? आपल्या कुटुंबाचें पोट भरणारा हमाल एकाद्या भिकार दोन खणी खोलींत राहत असला तरी त्याचा पराक्रम सुद्धां या वकिलाइतकाच मोठा नाहीं कां ? सध्यांच्या समाजांत कांहीं बुद्धिमान लोकांना शिक्षणाची संधि मिळते, कांहींना मिळत नाहीं. ही संधि मिळाल्यामुळें जे लोक श्रीमंत होतात, त्यांचें कर्तृत्व सोडतींत बक्षिस मिळविणाऱ्या माणसापेक्षां कांहीं निराळ्या प्रकारचें असत नाहीं.

नाहीं, असल्या संकुचित पराक्रमानें आपल्या मनाचें समाधान होणार नाहीं ! कांहींतरी अलौकिक—

स्पेनच्या रणभूमीवर लढून आलेला नरेंद्र–तो कालचा संयुक्त प्रांतांतलि तरुण–त्याच्या तोंडून तें वर्णन ऐकतांना आपल्या अंगावर कसे रोमांच उभे राहिले होते ! क्षणभर त्याचा हेवा वाटला आपल्याला. आणि तो म्हणाला तें कांहीं खोटें नव्हतें ! त्या लढाईपेक्षांही मोठ्या लढाया आपल्या देशांत सुरू होत आहेत, अद्यापि झाल्या नसल्या तर लवकरच होतील, शस्त्रांची जागा त्यागानें भरून काढून तरुणांना त्या जिंकाव्या लागतील !

स्वतःच्या प्रांतांतल्या किसानांची त्यानें जी स्थिति वर्णन करून सांगितली ती ऐकून—

छेः !

तिथल्या शेतकऱ्याच्या घरांत कितीही बायका असल्या तरी वड असें एकादेंच लुगडें असतें ! एक बाई तें नेसून बाहेर जाते, ती परत आली म्हणजे तेंच लुगडें नेसून दुसरी बाई बाहेर जाते—

घरांत कसल्यातरी फाटक्या चिंध्यांनीं बिचाऱ्या लज्जारक्षण करीत असतात !

जी स्थिति वस्त्राची तीच अन्नाची !

शेतकऱ्याच्या घरीं म्हैस असली तरी त्याच्या पोराला कधीं दुधाचा थेंब मिळायचा नाहीं. सारें दूध विकावें तेव्हां कुठें कुटुंबाच्या दुपारच्या तुकड्याची सोय व्हायची.

त्या तरुणानें आपणां सर्वांना मारलेला टोमणा किती बरोबर होता! तो म्हणाला होता 'अभय, तुमची तळमळ मला कळतें. पण एक लक्षांत ठेवा– आजारी मुलाकडं पाहून आईचं मन कितीही तळमळलं तरी त्या मुलाला बरं करण्याचं सामर्थ्य डॉक्टराच्या बुद्धींतच असतं! आजच्या तरुणांच्या तळमळीला कर्तृत्वाची जोड मिळाली तरच—'

त्याचें तें वाक्य तर आपण कधींच विसरणार नाहीं– 'पुस्तकांतल्या जगापेक्षा, कॉलेजांतल्या जगापेक्षां, कुटुंबांतल्या जगापेक्षां, खरें जग अगदीं निराळें आहे! हीं सारीं जगं स्वप्नांनीं भरलेलीं आहेत! पण खरं जग–'

दत्तोपंत समोर येऊन बसल्यामुळें कालच्या वादविवादांतल्या अभयच्या या आठवणी हळुहळु अस्पष्ट झाल्या.

थोडा वेळ थांबून दत्तोपंत म्हणाले 'मी बोलणार आहे ती गोष्ट जरा नाजुक आहे! तुम्ही शांतपणानं तिचा विचार कराल तर–'

अभय म्हणाला 'काय बोलायचं तें मोकळेपणानं बोला. मी कांहीं परका नाहीं कुणी!'

'तुमच्या हेडमास्तरांनीं बोलावून नेलं होतं मला संध्याकाळीं. आज शाळेंत तुमचा नि त्यांचा जो खटका झाला–'

'त्याचा दोष माझ्यापेक्षां त्यांच्याकडच आहे!'

'असेल! पण तुम्ही त्यांची क्षमा मागितली तर सारं प्रकरण मिटेल! नाहींतर–'

'नाहींतर मला शाळेंतून काढून टाकतील! एवढंच ना?'

'हें पहा अभय, तरुणपणीं अन्यायाची अशीच चीड येते माणसाला! तो त्या अन्यायाविरुद्ध लढायला उभा राहतो. पण पुढं––मी वकिली सोडली तेव्हां तुमच्यासारख्याच कल्पना होत्या माझ्या! आज मात्र घरांतल्या पांच

पोरांकडं पाहिलं म्हणजे मन कसं भांबावून जातं! त्यांचें शिक्षण, त्यांचीं लग्नं-- एकाद्या रोगानं उद्यां माझं बरंवाईट झालं तर--'

दत्तोपंतांच्या डोळ्यांत पाणी उभें राहिलेलें पाहून अभयला आश्चर्य वाटलें. यावेळीं आपण कांहींच बोलूं नये असा विचारही त्याच्या मनांत येऊन गेला. पण त्याचा अर्थ निराळा होईल हें लगेच त्याच्या लक्षांत आलें.

तो हंसत दत्तोपंतांना म्हणाला 'हेडमास्तरांना सांगा—अभय उद्यां शाळेंत येणार नाहीं. आयुष्यांतली पहिली चकमक आज झाली. उद्यां दुसरी होईल! त्यांत काय आहे एवढं? लढत राहण्यांतच मानवी जीवनाची सफलता आहे. नाहीं कां?'

तो उठला आणि जाण्याकरितां दाराकडे वळला. तिथें माला उभी होती.

८

# वर कळस, खालीं सुरुंग !

मालेचा निरोप घेऊन अभय बाहेर पडला.

रस्त्यावरली रहदारी आतां पुरी ओसरली होती. बुधवारांत आल्यावर तर अभयला उन्हाळ्यांतल्या नदीच्या पात्राचीच आठवण झाली.

कॉपऱ्यावरल्या एका हॉटेलांत कपबशा खळखळत होत्या. पलीकडून एक रिकामा टांगा हळुहळु येत होता. त्या टांग्याच्या मागून एक भिकारीण मुंगीच्या पावलांनीं चालली होती.

अभयच्या मनांत मात्र विचारांची विलक्षण गर्दी उसळत होती. शर्यतीं-तल्या घोड्याप्रमाणें ते धांवत होते.

त्याला मघाच्या दृश्याची पुनः पुन्हा आठवण होऊं लागली. 'आयुष्याची सफलता लढण्यांत आहे ' असें आपण म्हणायला नि मालेनें घरांत येऊन उभें रहायला एकच गांठ पडावी हा किती विचित्र योगायोग !

आयुष्य हें एक न सुटणारें कोडें आहे कीं मनुष्याला ते सोडविण्याइतकी बुद्धिच नाहीं ? जीवनाची सफलता प्रीतीनें होते असें कवि म्हणतात !

छेः ! काव्य हें नेहमीच अर्धसत्य असतें !

अभयला विनायकाची जोहारही कविता आठवली. त्या काव्यांत मात्र जीवनाचें पूर्ण प्रतिबिंब पडलें आहे असें त्याला वाटलें. त्या कवितेंतलें रजपूत वीराचें तें वर्णन—

एकच घेईन मुका
केला निर्धार निका
दहाशत घेऊन मुका
तो भुकाच राहिला !

जिचीं अशीं शेंकडों चुंबनें घेऊनही तो वल्लभ अतृप्त राहिला, त्या रमणीला तो निद्रेंतून जागें करतो, आपल्या हातानें तिचा वध करतो आणि शत्रूशीं लढण्याकरितां निघून जातो.

जोहार !

रजपुतांची जोहाराची पद्धत अभयला लहानपणीं इतिहास वाचतांना क्रूरपणाची वाटली होती. आतां त्याला वाटलें—जोहार हें जीवनाचें प्रतीक आहे ! ध्येयासाठीं अत्यंत प्रिय गोष्टींचा त्याग करावा लागतो, ही त्यांतली शिकवण आजच्या काळीं सुद्धां पूर्वींइतकीच खरी आहे ! ती नेहमींच खरी राहील.

घरांत शिरतां शिरतां अभयनें सहज आकाशाकडे पाहिलें.

एक तारा तुटून पडत होता !

चार वर्षांपूर्वीं लिहिलेल्या स्वतःच्या कवितेंतील एक कल्पना त्याला आठवली. लपून बसलेल्या चंद्राला रजनी लगबगीनें शोधीत आहे. तुटून पडलेला तारा हें त्या घाईनें धांवणाऱ्या रजनीच्या केशकलापांतून गळून पडलेलें फूल आहे अशी ती कल्पना होती.

आतां तो तुटून पडलेला तारा पाहून त्याला वाटलें—कांहीं केल्या काळोख कमी होत नाहीं हें पाहून तो क्षणभर तरी उजळण्याकरितां या ताऱ्यानें स्वतःचें बलिदान केलें !

आक्का तुकारामाची गाथा अजून वाचत बसली आहे हें पाहून अभय तिला म्हणाला ‘ उगीच जागत कशाला बसलीस ? ’

‘ उगीच नाहीं ! ’

आक्कानें पलीकडे पडलेलीं पुस्तकें दाखविलीं. इसापनीति आणि दोन तीन चित्रांचीं पुस्तकें होतीं तीं ! चारूची स्वारी बराच वेळ इथें असावी हें अभयनें ओळखलें.

‘ काय केलं होतं जेवायला ? ’ आक्कानें प्रश्न केला.

‘ श्रीखंड ! ’

‘ कोण कोण मंडळी होती ? ’

‘ त्या लतेच्या घरचीं सारीं माणसं होतीं.’

‘ तिचे ते मामा आले होते कां ? ’

‘ हो ! ’

‘ मालेची आई म्हणत होती--कुठं गिरणींत मोठ्या पगारावर आहेत ते ! त्या कांचनला सुद्धां कुठं तरी गिरणींतच चांगली नोकरी देणार आहेत म्हणे ते ! ’

‘ अस्सं ! ’

‘ तुझी त्यांची ओळख झाली कां ? ’

‘ तोंड-ओळख झाली. अधिक ओळख करून घेऊन करायचंय् काय आपल्याला ? ’

‘ मनुष्य चांगला नाहीं वाटतं ? ’

अभय हंसून म्हणाला ‘ तसं नाहीं ग ! हुषार आहे मोठा ! काय नांव पहा त्याचं ? देवदत्त--’

‘ देवदत्त ? ’

‘ हो, देवदत्त कामत. ’

‘ देवदत्त कामत ? ’

आक्काच्या स्वरांत एकदम विलक्षण कंप कां उत्पन्न झाला हें अभयला कळलें नाहीं.

तो म्हणाला ' त्यांच्या चेहऱ्यावर दोन तीन लहान डाग आहेत. कोड आहे कीं काय कुणाला ठाऊक ! पण चेहरा असा उमदा आहे नि डोळे इतके तरतरीत आहेत कीं त्या डागांचा विद्रूपपणा लक्षांतच येत नाहीं ! '

आक्कानें खालीं पाहत तुकारामाचा गाथा उघडला; अभय टेबलाकडे गेला.

तिथें संध्याकाळीं कल्पलतेनें त्याला दिलेली गोष्टींची वही पडली होती.

त्यानें ती सहज उचलली. संध्याकाळीं आपण वहींतली पहिली गोष्ट वाचली होती, आतां शेवटची वाचावी म्हणून तो पुढचीं पानें चाळूं लागला.

गोष्ट लहानच होती—

## झोंपाळा आणि विमान

झोंपाळयानें खूप मोठा झोंका घेतला.

त्याला वाटलें—आतां आपण सहज विमानाइतकें वर जाऊं ! पण थोडें वर जातांच त्याला पुन्हां मागें यावें लागलें. आपली फजिती लपविण्याकरितां झोंपाळा म्हणाला 'आभाळांत अधिक उंच न गेलेलंच बरं ! हें विमान केव्हां खालीं कोसळून पडेल याचा नेम आहे कां ? '

विमान हळुहळु खालीं उतरूं लागलें.

झोंपाळा आनंदानें ओरडला ' आतां बघा कशी गंमत होते ती ! '

त्याच क्षणीं झोंपाळयाचा एक दोर तुटला आणि तो वेडावांकडा होऊन झाडाच्या फांदीला लोंबूं लागला.

जमिनीवर उतरलेलें विमान त्याला हंसलें नाहीं. तें म्हणालें ' पुष्कळदां माझ्यावर सुद्धां अशीच मोडून पडायची पाळी येते ! आहे

काय त्यांत ? चल, उठ ! तूं नि मी पांखरांप्रमाणं जोडीनं वर उडत उडत जाऊं या ! '

लतेच्या आतांपर्यंतच्या तिन्ही गोष्टींपेक्षांही ही गोष्ट अभयला अधिक अर्थशून्य वाटली.

तिच्या कल्पकतेचें त्याला कौतुक वाटत होतें. पण कल्पकता म्हणजे कागदी फुलें करण्याचें कौशल्य !

त्याच्या मनांत आलें—मालेंत ही कल्पकताही नाहीं !

अंथरुणावर जाऊन पडतांच अभयचा डोळा लागला. काल रात्रींच्या जागरणामुळें केव्हांपासून त्याचें अंग जड झालें होतें.

किती तरी वेळ तो स्वस्थ झोंपला होता. मग मात्र त्याला एक भयंकर स्वप्न पडलें.

त्याला दिसत होतें–

आपण रजपूत सरदारासारखा पोषाख केला आहे. पलीकडेच माला आहे. तिचा सर्व शृंगार एकाद्या रजपूत रमणीसारखा आहे.

आपल्या कानांत कुणीतरी मधुर स्वरानें गुणगुणूं लागलें. आपण आनंदानें डोळे मिटून घेतले.

एकच घेईन मुका
केला निर्धार निका
दहाशत घेऊन भुका
तो भुकाच राहिला !

गाणें थांबतांच आपण डोळे उघडले.

आपल्या हातांत नग्न खड्ग आहे !

कुणी आणून दिली ही तरवार ?

त्या गाणाऱ्या व्यक्तीनें ?

माला आपले दोन्ही पाय धरून स्फुंदत आहे—नका, अभय, आपल्या मालेचा असा शिरच्छेद करूं नका.

इथेंच अभय जागा झाला होता.

त्यानें डोळे उघडून पाहिलें. कालच्या प्रमाणें चांदणें आजही खिडकींतून आंत येत होतें.

तो कुशीवर वळला. त्याला आश्चर्य वाटलें—आक्काच्या खोलींत अजून दिवा जळत होता. वाचतां वाचतां तिला झोंप तर लागली नसेल ?

हळूच उठून तो मधल्या दारांत जाऊन उभा राहिला.

त्याला जें दिसलें तें पाहून तो अधिकच चकित झाला ! आक्काच्या पुढ्यांत पांडुरंगाची तसबीर होती.

त्या तसबिरीपुढें हात जोडून ती बसली होती. तिच्या डोळ्यांतून अश्रु वाहत होते.

अभयला रात्रीं दत्तोपंतांच्या डोळ्यांत उभें राहिलेलें पाणी आठवलें. ते अश्रु—आक्काचे हे अश्रु ! यांच्यांत कांहीं संबंध असेल कां ?

आक्काला त्यानें कधींच रडतांना पाहिलें नव्हतें.

तो आला तसा परत गेला.

थोड्या वेळानें आक्कानें दिवा मालवला. पण अभयला कांहीं केल्या झोंप येईना. त्याच्या मनांत राहून एकच प्रश्न थैमान घालीत होता—आक्काच्या डोळ्यांत अश्रु उभे रहावेत आणि ते आपल्याला पुसतां येऊं नयेत ?

आपण पुढें होऊन ते पुसले असते तर—

× × ×

सकाळीं अभयचा चहा होतो न होतो तों प्रमिला दारांत दत्त म्हणून उभी असलेली त्याला दिसली !

‘ पर्वतीला गेली होतीस वाटतं ? ’

‘ अं हं ! तुमच्याकडच आलें आहे ! ’

‘ माझ्याकड ? रात्रींचं पानांत टाकलेलं श्रीखंड घेऊन आली असशील ! ’

प्रमिला एक जाड पत्र पुढें करीत म्हणाली ‘ हें काव्य वाचा जरा. याचं नांव प्रमिलादूत ! ’

तें पत्र दत्तोपंतांचें असावें असें अभयला प्रथम वाटलें.

पाकीटावरला अक्षराकडे लक्ष जातांच तो चमकला.

तें अक्षर मालेचें होतें.

प्रमिलेला आक्काशीं गप्पागोष्टी करायला बसवून अभय आपल्या खोलींत आला आणि तें पत्र वाचूं लागला.

‘ प्रिय अभय,

रात्रीं तुम्ही गेल्यापासून तुमचं तें एक वाक्य माझ्या कानांत सारखं घुमतंय्—

‘–आयुष्याची सफलता लढण्यांत आहे.–’

आजपासून मालेनं धीट व्हायचं, लढायचं ठरविलं आहे.

म्हणूनच काल लपवून ठेवलेली एक गोष्ट आज मी तुम्हांला लिहून कळवीत आहे.

रात्रीं खोलींत खाटेवर अंग टाकून मी जी रडूं लागलें, त्याचं खरं कारण झोंपाळ्यावर बसल्यामुळं आलेली भोंवळ हें नव्हतं.

झोंपाळयावर आम्ही दोघें बसलों होतों–

अभय, कसं सांगूं तुम्हांला ? काय वाटेल तुम्हांला ?

तुमची माला भित्री आहे. तिला मोहाशीं झगडतां आलं नाहीं !

आम्ही झोंपाळ्यावर बसलों होतों. कांचननीं झटकन् मला जवळ घेऊन—

मी घरीं आलें तेव्हां माझ्या गालावर कुणी भाजून चांगला डाग दिला आहे असं मला वाटत होतं!

झाल्या गोष्टींत सारा दोष कांचनांचाच होता असं नाहीं. जवळ जवळ एक महिना झाला आमच्या परिचयाला! ते देवदत्तांचं पत्र घेऊन बाबांच्याकडे आले. त्यांची आई इथं पूर्वींच रहायला आली होती.

कांचनांची नि माझी ओळख झाली. त्यांच्या बरोबर मोटारींत बसून फिरण्यांत मला मौज वाटूं लागली, त्यांनीं भेट म्हणून दिलेल्या वस्तु घेतांना मला आनंद झाला, त्यांच्या मनासारखी खोलीची सजावट मी हौसेनं केली, बाबांना आवडणार नाहीं हें ठाऊक असूनही त्यांनीं आग्रह करतांच परवा आम्लेट खाल्लं.

अभय, खरं सांगतें! रागावूं नका. कांचनांच्या श्रीमंतीचा मोह मला पडला नसता, तर मी तुम्हांला आवडणारीं खोलींतलीं तीं चित्रं बाजूला नेऊन लावलीं नसतीं!

बाबांनीं माझ्या जन्मानंतर लवकरच वकिली सोडली. लहानपणापासून हें हवं तें हवं असं मला फार वाटे. पण बाबा माझ्या साऱ्या हौशी कुठून पुरवणार? ते काकांच्यावर अवलंबून! काका त्यांना दरमहा पैसे पाठवीत म्हणून आजपर्यंत आमचा संसार कसाबसा चालला! आतां तोही—

काल रात्रीं तुमचं तें वाक्य सारखं मनांत घोळूं लागलं. कांहीं केल्या झोंप येईना. आई नि बाबा मोठ्या मोठ्यानं कांहीं बोलताहेत असं वाटलं. मी हळूच जाऊन दाराआड उभी राहिलें.

बाबांच्या स्वरांत किती दुःख भरलं होतं म्हणून सांगूं?

काकांनीं त्यांना आजपर्यंत पैसे दिले ते उसने म्हणून! बाबांनीं त्यांना वेळोवेळीं प्रामिसरी नोटा सुद्धां लिहून दिल्या आहेत म्हणे—

हल्लीं काका कुठल्याशा खटल्याच्या भानगडींत सांपडले आहेत. कदाचित् बडतर्फही होतील ते! बाबांनीं मंत्रिमंडळाशीं असलेल्या ओळखीचा उपयोग करून आपल्याला या संकटांतून सोडवावं असं काकांना वाटतंय्! बाबांना तें

कांहीं शक्य दिसत नाहीं. 'तुम्ही यावेळीं माझ्या उपयोगीं पडला नाहीं तर तुम्हांला माझ्याकडून एक पै सुद्धां पुढं मिळणार नाहीं. माझे पैसे मात्र लगेच परत करावे लागतील!' असं काकांचं निर्वाणीचं पत्र कालच बाबांना आलंय्!

हें सारं ऐकून माझ्या अंगावर कसा कांटा उभा राहिला! उशींत डोकं खुपसून किती वेळ तरी मी रडत होतें. तुमच्या आठवणीनं मनाला धीर आला. तुमच्या जागीं दुसरं कुणी असतं तर—

पण माझे अभय तसे नाहींत! होय ना? मालेचे वडील गरीब आहेत म्हणून कांहीं त्यांचं मालेवरलं प्रेम कमी होणार नाहीं! खरं ना?

मी डोळे पुसून दिवा लावला, तुमच्या त्या आवडत्या तीन चित्रांपुढं जाऊन उभी राहिलें नि 'आयुष्याची सफलता लढण्यांत असते' हें वाक्य पुनः पुन्हां स्वतःशीं म्हटलं. परीक्षा जवळ आली म्हणजे खूप जागून आपण अवघड प्रश्नांचीं उत्तरं पाठ करीत बसतों ना? तसं वाटलं तें मला!

मन शांत झाल्यावर मी किती तरी नवेनवे निश्चय केले. हें ज्युनियरचं वर्ष असलं तरी आतां खूप खूप अभ्यास करणार आहे मी! चांगली सेकंड क्लासांत पास होऊन लगेच मास्तरीण होईन. म्हणजे धाकट्या बहिणींची बाबांना वाटणारी काळजी तरी दूर होईल.

मी बी. ए. होईपर्यंत तुमची वकिली चांगली चालायला लागेल. नाहीं कां? माझं शाळेतलं काम संभाळून मी तुम्हांला सुद्धां मदत करीन. म्हणजे आपल्याला लवकर बंगला बांधतां येईल, मोटार ठेवतां येईल—

तुम्ही म्हणाल—मालेला वेड लागलं आहे.

लागलंय् खरं! पण हा जादूटोणा आपणच केला आहे, बरं महाराज!

रात्रीं अंथरुणावर पडल्या पडल्या मी किती बेत केले म्हणून सांगूं! फडक्यांच्या 'समरभूमि' कादंबरीवर चित्र आहे ना? तुम्ही नी मी हातांत हात घालून आयुष्याचा तसा प्रवास करणार आहों, असं एकसारखं मी मनाला सांगत होतें. त्या चित्रांत प्रेतं बितं भोवतीं दाखविलीं आहेत नाहीं? तसलं मात्र कांहीं आपल्याला नको बाई!

घराच्या चार भिंतींत दोन माणसांचं प्रेम नंदनवन निर्माण करतं असं कुणीसं म्हटलं आहे ना ? अगदीं खरं आहे तें !

आज कांचन बोलवायला आले तरी मी त्यांच्या बरोबर जाणार नाहीं. तुमची वाट पाहत घरांत राहतें. बरोबर पांचाला या ! तुमच्या घड्याळांतले पाच नव्हेत हं ! माझ्या घड्याळांतले !

लवकरच तुमची होणारी

**माला**

ता. क. पत्र उघड्यावर टाकूं नका ! नाहींतर आका बिका बघतील नि मग—

अगबाई ! तुम्ही वकिली केव्हां सुरू करणार हें विचारायचं विसरतच होतें मी !

× × × ×

प्रमिला जायला निघाली. अभयनें बसण्याचा आग्रह करतांच ती म्हणाली ' कॉलेज आहे मला ! '

लगेच अभयच्या टेबलावरली पुस्तकें ती चाळूं लागली. झटकन् एक पुस्तक उचलून ती स्वतःशींच उद्गारली The Mind in Chains ! नांव तर छान दिसतंय् ! '

' तुझं नांव काय वाईट आहे ! '

' कोण म्हणतंय् तसं ? एका बंडखोर राणीचं नांव आहे तें ! '

हंसत हंसत अभय म्हणाला ' पुराणांतल्या प्रमिलेनं पुरुषजातीविरुद्ध बंड उभारलं–पण शेवटीं तिला अर्जुनाशीं लग्न करावं लागलंच कीं ! '

' पुराणं फार जुनीं झालीं आतां ! ' हातांतलें पुस्तक उघडीत तिनें उत्तर दिलें. लगेच तिच्यां चेहऱ्यावर एक विलक्षण चमक दिसली. ती उद्गारली ' चांगलं दिसतंय् हं पुस्तक ! ' लगेच तिनें आपल्याला आवडलेला भाग वाचायला सुरवात केली––

There is a new society to be built, a world in which we shall cure hunger by food and not by gymnastics. You must fight. Not against your fellow-workers but against ignorance, greed, disease, war, tyranny and reaction. Don't go to sleep. Wake up.

प्रमिला वाचीत असतांना अभय मोठ्या कौतुकानें तिच्याकडे पाहत होता.

पुस्तक मिटून ती म्हणाली 'मधांच्या पत्राचं उत्तर आहे कां कांहीं ?'

अभयनें नकारार्थी मान हलविली.

'नसायचंच !' ती हंसत उद्गारली.

'कशावरनं ?'

'मेघाबरोबर यक्षानं बायकोला संदेश पाठवला. पण तिनं कांहीं त्या संदेशाचं उत्तर त्याच्याकड दिलं नाहीं !'

हंसत हंसत प्रमिला अदृश्य झाली. अभयला वाटलें—तिनें स्वतःची मेघाशीं जी गंमतीनें तुलना केली ती फार फार खरी आहे. या काळ्या सांवळ्या रूप नसलेल्या मुलींत कांहींतरी चमक आहे, जीवन आहे !

माला आणि प्रमिला !

मालेचें हें पत्र नि प्रमिलेला आतां आवडलेला तो उतारा !

मालेची सारी महत्वाकांक्षा स्वतःसाठीं एक बंगला बांधण्याची ! उलट समाजाचें जीर्ण भंगलेलें मंदिर पाहून त्या ठिकाणीं नवें मंदिर उभारलें पाहिजे ही कल्पना प्रमिलेला आकर्षक वाटते.

आपल्या घराच्या चार भिंतींत सुखाचीं फुलें फुलावींत या पलीकडे मालेची कधीं उडीच जात नाहीं ! या भिंतींच्या बाहेर वादळ होवो अथवा वणवा पेटो, तिला त्याचें कांहीं सुखदुःख नाहीं.

पण प्रमिला ?

मनुष्याला पशूहूनही हीन करून टाकणाऱ्या अज्ञान, लोभ, राग, जुलूम इत्यादि शत्रूंच्याविरुद्ध बंडाचा झेंडा उभारा असा संदेश देणारा तो उतारा वाचतांना तिच्या मुद्रेवर किती विलक्षण आनंद चमकत होता !

× × ×

अभय मनांत म्हणत होता--

आज आपण शाळेला जाण्यांत अर्थ नाहीं. दत्तोपंतांनीं हेडमास्तरांना आपलें उत्तर कळविलें असेलच. अशा स्थितींत आपण जाणें म्हणजे अपमानाला आमंत्रण देण्यासारखेंच आहे !

पण झालेली हकीगत आक्काला सांगायची कशी ? एकदां लहानपणीं नदींत बांकून आपलें प्रतिबिंब पाहत असतांना अभयची टोपी पाण्यांत पडून वाहत गेली. घरीं आल्यावर ती हकीगत आईला व आक्काला कशी सांगावी या विचारांत तो पडला होता. आजचा प्रसंगही तसाच आहे असें त्याला वाटलें.

अभय नेहमींच्या वेळेलाच जेवायला बसला. पानांत वाढलेले पदार्थ पाहतांच तो म्हणाला ' आज इथंही मेजवानी आहे वाटतं ! '

आक्का नुसती हंसली. जेवण नेहमींचेंच, अगदीं साधें होतें. पण अभयला आवडणारे तीन पदार्थ आज तिनें एकदम केलें होते. आंबट ताक आठवणीनें ठेवून केलेली कढी, सोयाबीनची उसळ, टोमॅटोची कोशिंबीर आणि बटाट्याचा रस्सा !

' आज कांहीं आपण शाळेला जाणार नाहीं बुवा ! ' पाटावर बसत बसत अभय उद्गारला. ' आतां पोटभर जेवायचं नि खुशाल ताणून द्यायचं ! '

' ठाऊक आहे मला ! रात्रीं सुद्धां कधीं स्वस्थ झोंपत नाहींस, नि म्हणे शाळा चुकवून खुशाल ताणून देणार ! हातावर पाणी पडायची खोटी ! सायकलवर बसशील न्—'

दार वाजल्यामुळें आक्का बाहेर गेली.

ती आंत येतांच जेवूं लागलेल्या अभयनें विचारलें ' कोण आहे ग ? '

आक्कानें त्याच्या हातांत एक खूप जाड पत्र दिलें. तें अक्षर कांहीं अभयला ओळखीचें वाटलें नाहीं.

त्यानें तें पत्र डाव्या हातानेंच फोडून वाचायला सुरवात केली.

आपण जेवायला बसलों आहों हेंही तो विसरून गेला. पत्र एकदां वाचून झाल्यावर तो तें पुन्हां वाचूं लागला.

आक्का म्हणाली 'अगदीं पारायण करण्यासारखं पत्र आहे वाटतं!'

'हं!'

'पण भात गार होत चाललाय्!'

अभय पत्र वाचीतच होता.

'मघाशीं मालेचं पत्र प्रमिला घेऊन आली तें मला ठाऊक आहे म्हणून बरं! नाहींतर मला वाटलं असतं—पत्र मालेचंच आहे!'

'साऱ्या जगांत मालेशिवाय माझी कुणाशीं ओळखच नाहीं वाटतं?'

'अस्सं! मग त्या लतेचं पत्र असावं हें!'

'अं हं!'

'मग कुणाचं?'

'एका स्नेह्याचं!'

'त्याला नांव गांव कांहीं नाहीं?'

'तूं त्याला कधीं पाहिलंच नाहींस!'

'मी पाहिला नाहीं असा एक तरी मित्र आहे कां तुझा?'

एका दृष्टीनें आक्काचें म्हणणें खरें होतें. अभयच्या बालमित्रांपासून पुण्यांत आल्यावर झालेल्या त्याच्या मित्रांपर्यंतची सर्व मंडळी तिला माहीत होती.

'नांव तर ऐकूं या या तुझ्या मित्राचं!' अभयच्या ताटांत ऊन भात वाढीत आक्का म्हणाली.

'नरेंद्र!'

'नरेंद्र ?' आक्काच्या स्वरांत उघड उघड विस्मय दिसत होता. अभयला एखादा बंगाली मित्र आहे हें तिला ऐकूनही ठाऊक नव्हतें !

अभय हंसत म्हणाला 'परवां खडकीला आम्ही गेलों होतों ना ? संयुक्त प्रांतातला एक तरुण आमचा पाहुणा म्हणून आला होता त्या दिवशीं ! मी सारं सांगितलं होतं ! आठवतं कां तुला ?'

आक्काला तें तर आठवत होतेंच ! पण त्यापेक्षांही केव्हांतरी वर्तमानपत्रांत वाचलेल्या कांहीं विचित्र गोष्टी तिला आठवल्या.

मागें बंगाल्यामधले कांहीं क्रांतिकारक गोव्यांत येऊन राहिले होते.

कायदेभंगाच्या चळवळीच्या वेळीं कॉमरेड रॉय डॉ. महंमद हें नांव घेऊन वेषांतर करून मुंबईत वावरत होते.

तिचें मन म्हणत होतें—कुठें संयुक्त प्रांत, कुठें महाराष्ट्र ! या नरेंद्राचें अभयशीं एवढं काय गुप्त काम असावें ?

अभय पुनः पुन्हां त्या पत्रावरून दृष्टि फिरवीत होता !

आक्काचें अंग एकदम शिरशिरलें.

आपण लहानाचा मोठा केलेला अभय एखाद्या कटाबिटांत तर सामील नसेल ना ? ज्या पायावर आपण एवढें आशामंदिर उभारलें आहे तो पाया—हा नरेंद्र म्हणजे त्या पायाला दैवानें लावलेला सुरुंग तर नाहीं ना ? मंदिरावर लवकरच कळस चढेल या आनंदांत आपण आहों. पण—

अभय घाईघाईनें जेवून उठला. त्याच्या ताटाकडे पाहत आक्का कितीतरी वेळ बसली होती ! पानांत एक शित सुद्धां न टाकणाऱ्या अभयनें आज आपले आवडते पदार्थ सुद्धां पुरे खाल्ले नाहींत !

असें कां बरें व्हावें ? नरेंद्राच्या त्या पत्रांत काय असावें ?

९

# रक्तानें लिहिलेला ग्रंथ

भाई अभय,

हें पत्र मी रात्रीं एक वाजतां लिहीत आहे.

मनुष्याच्या आयुष्यांत किती विलक्षण बदल होतात . डॉक्टर व्हायच्या वेळेला परीक्षेंत पहिला नंबर यावा म्हणून म जागत असे. त्यावेळीं वाटे–एकदां परीक्षा पास झाली कीं पुन जाग्रणं करायची पाळी आपल्यावर येणार नाहीं. मध्यरात्र पत्नीच्या बाहुपाशांत बद्ध होऊन या नीरस जगापासून मुक्त सुवर्णवेला आहे हा अनुभव आपल्यालाही येईल.

सकाळचें कोंवळें ऊन पाहिलें कीं क्षणभर चांदण्याचाच भ ना ? जीवनाचा प्रातःकालही असाच काव्यरम्य असतो. प दुपारीं वरून रखरखीत ऊन जाळूं लागतें, खालीं जमीन पायाट द्यायला सुरवात करते आणि मधें पोटांत कावळे ओरडूं लागतात त्या चांदण्याची कुणाला तरी आठवण होते कां ?

मध्यरात्रींचा काळोख आतां माझा मित्र झाला आहे !

कुणीकडे वाहवलों मी ! तुला काय लिहूं आणि काय नको असं होऊन गेलंय् मला !

मॅट्रिकमध्यें पहिला नंबर आला होता माझा ! संस्कृत मला अतिशय आवडे ! पण कॉलेजची एक परीक्षा झाली नाहीं तोंच घरच्या गरिबीमुळं आई क्षयाला बळी पडत असलेली मला मुकाट्यानं पहावी लागली. स्मशानांत तिच्या पायांवर डोकं ठेवून मी मनांत शपथ घेतली— आईसारख्या अश्राप माणसांचा गरिबीमुळें होणारा खून मी उघड्या डोळ्यांनीं पाहणार नाहीं !

मी डॉक्टर व्हायचं ठरविलं. वडिलांची इच्छा मी बी. ए. होऊन मास्तर व्हावं नि प्रपंचाच्या त्रासांतून त्यांना सोडवावं अशी होती. एके दिवशीं मध्यरात्रीं मी कानपूर सोडून मुंबईला पळून आलों.

मुंबईंत मी मोठ्या कष्टानं डॉक्टर झालों असं त्यावेळीं मला वाटत असे–पण पुढं केवळ घांसभर अन्नासाठीं, साध्या वीतभर वस्त्रासाठीं, आपल्या देशांतल्या कोट्यवधि माणसांना किती हाल काढावे लागतात, याची कल्पना मला आली. मला वाटूं लागलं—मी मोठ्या सुखानं डॉक्टर झालों !

आकाशांतल्या चंद्राला हातांत धरण्याकरितां लहान मुलानं धापा टाकीत टेंकडीवर जावं नि चंद्र आपल्यापासून पूर्वींइतकाच दूर आहे असं त्याला आढळून यावं ! डॉक्टर झाल्यावर माझी स्थितिही तशीच झाली. एका व्यक्तीची भूतदया म्हणजे फाटलेल्या आभाळाला लावलेलें ठिगळ आहे हें मला लवकरच कळून चुकलं. बुद्धीनं माझ्यापेक्षां श्रेष्ठ असलेल्या अनेक डॉक्टरांचं अंतःकरण पाहून माझं मन विटलं. हातांत पुरे पैसे पडले नाहींत तर ऑपरेशन–टेबलावरून प्रेत सुद्धां हलवूं देत नाहींत कांहीं डॉक्टर !

शेंकडा नव्वद डॉक्टरांच्या पुढं एकच ध्येय असतं—खूप पैसा मिळविणं, मोठी इस्टेट करणं, मुलाला शिक्षणाकरितां परदेशीं पाठविणं नि

मुलीला आपल्यापेक्षांही श्रीमंत अशा स्थळीं देणं! त्रिशंकूची स्वर्गाला जाण्याची धडपड आपल्या पुराणांत वर्णन केली आहे. मध्यम वर्गाच्या मनोवृत्तीवरलं मोठं सुंदर रूपक आहे तें!

त्रिशंकूची इच्छा स्वर्गांत जायची होती. स्वर्ग म्हणजे काय हें त्याला ठाऊक नव्हतं असं नाहीं. पण जिथं कष्ट न करतां अमृत प्यायला मिळतं, पोराबाळांची जबाबदारी अंगावर न पडतां अप्सरांसह विलास करतां येतो, तो स्वर्ग त्रिशंकूला हवा होता. आपल्या समाजांतही पदोपदीं हेंच दृश्य दिसत नाहीं कां? स्वर्ग गांठण्याची प्रत्येकाची धडपड सुरू आहे. त्रिशंकूप्रमाणं अधांतरीं लोंबकळत रहावं लागलं तरी हरकत नाहीं. पण प्रत्येकाचे डोळे श्रीमंतीकड, चैनीकड, विलासाकड, श्रम-विरहित जीवनाकड लागलेले असतात!

तुला वाटेल, हें कांहीं नरेंद्राचं पत्र नाहीं. त्याचं आत्मचरित्र दिसतंय्! आपल्या आयुष्यांत आतां नवीन कांहीं होणार नाहीं अशी ज्यांची खात्री झालेली असते, तेच आत्मचरित्रं लिहितात. मला अजून पुष्कळ अनुभव घ्यायचे आहेत. तेव्हां आत्मवृत्ताच्या भीतीनं हें पत्र वाचणं मधेंच सोडून देऊं नकोस.

मी परवां पुण्याला आलों, तो मुख्यतः माझा सहाध्यायी डॉक्टर देशमुख याच्या ओळखीमुळं! आलों त्यावेळीं देशमुख मला जवळचा वाटत होता. पण खडकीच्या हॉटेलांत पांच सहा तास चर्चा करून आपण जेव्हां उठलों, तेव्हां देशमुख मला परका वाटूं लागला. तुझ्या विषयीं एक विलक्षण आपलेपणा माझ्या मनांत उत्पन्न झाला. अभय, रक्तापेक्षां सुद्धां ध्येयाचं नातं अधिक जवळचं असतं! नाहीं?

तुमच्या मंडळांतल्या लोकांनीं मला मुद्दाम बोलावलं याचं कारण मी नुक्ताच स्पेनच्या रणभूमीवरून परत आलों होतों हेंच होतें. युद्धाच्या कथा अजून आपल्या सुशिक्षित मंडळींना सुद्धां रम्यच वाटतात, सत्य वाटत नाहींत! खडकीला तुम्हां सर्वांशीं बोलतांना, परदेशांतली विविध माहिती सांगतांना, साम्यवादी रशियाच्या वर्णनांत रंगून जातांना, राहून

राहून माझं मलाच हंसूं येत होतं. ल्हानपणीं गांवांत सर्कस आली कीं तिच्यांतला वाघ पाहण्याकरितां मी सकाळ संध्याकाळ जात असें. त्याच्या अंगावरले ते पट्टे, त्याचें तें शेंपटी हलवणं, पिंजऱ्याच्या गजांशीं तोंड घांसणं, मधूनच डरकाळी फोडणं, साऱ्याच गोष्टींचं माझ्या बालमनाला कौतुक वाटे. तें कौतुकच माझ्याशीं बोलतांना तुमच्यापैकीं बहुतेकांच्या चेहऱ्यांवर प्रतिबिंबित झालेलं मला दिसत होतं. त्यांच्या दृष्टीनं मी एक वाघ होतों. डॉक्टर झाल्यावर चालता धंदा सोडून मी कम्युनिस्ट लोकांत मिसळलों, मजुरांचा पुढारी झालों, मीरत कटांत तुरुंगांत गेलों, तुरुंगातून सुटल्यावर खलाशी होऊन युरोप गांठलं, तिथल्या साऱ्या देशांत फिरून शेवटीं स्पेनच्या रणभूमीवर लोकपक्षाचा शिपाई म्हणून लढलों, या साऱ्याच गोष्टी त्यांना एखाद्या कादंबरी सारख्या रहस्यपूर्ण आणि मनोरंजक वाटत असाव्यात. माझे पुराणिक आजोबा आज असते तर त्यांना सुद्धां असंच कांहींतरी वाटलं असतं.

पण आयुष्य ही कादंबरी नाहीं, तो इतिहास आहे, ही श्रद्धा माझ्याभोंवतीं बसलेल्या आठदहा मंडळींत एकाच्याच मुद्रेवर मला दिसत होती. ती व्यक्ति म्हणजे अभय !

तूं मला अनेकदां विरोध केलास, नानाप्रकारचे प्रश्न विचारून सतावून सोडलेंस, नंदीबैलाप्रमाणं माझ्या म्हणण्याला मान तुकवली नाहींस किंवा बावळटाप्रमाणं माझ्याकडं बघत राहिला नाहींस, याचा फार आनंद झाला मला ! आपल्या अभागी मातृभूमीचा उद्धार लवकर व्हायला तुझ्या-सारखीं जिवंत माणसं हवींत ? नुसतीं कळसुत्रीं बाहुलीं नकोत !

मुंबईला आल्यापासून पदोपदीं मला तुझी आठवण होत होती. तुझे प्रश्न एकसारखे कानांत घुमत होते. त्यांतल्या कांहीं प्रश्नांना मी उडवाउडवीचीं उत्तरं दिलीं याचं मला वाईट वाटलं. खरीं खुरीं उत्तरं हृदय उघडं केल्याशिवाय देता आलीं नसतीं आणि हृदय फक्त हृदया-पाशींच उघडं होतं ! केवळ मौजेसाठीं जमलेल्या इतक्या मंडळींत तें उघडणं शक्य नसतं.

उद्यां मी कानपूरला निघून जात आहे. वडील फार आजारी आहेत. त्यांना बरं वाटतांच किसानांच्या चळवळींत मी उडी टाकणार आहें. तुला पत्र पाठवायला केव्हां सवड होईल कुणाला ठाऊक ! म्हणून इतक्या अपरात्रीं लिहायला बसलों आहे.

तुझ्या एकंदर विचारसरणींत एक मोठा दोष मला दिसला ! तूं पुस्तकांवर फार अवलंबून राहिला आहेस ! पण अभय, एक गोष्ट कधींही विसरूं नकोस ! चित्रपटांतला मोटारीचा अपघात पाहून अंगावर क्षणभर शहारे उभे राहिले, तरी अपघाताची खरी कल्पना यायला आपण त्या मोटारींतच असलं पाहिजे.

तत्वज्ञानाचीं सर्व पुस्तकं तोंडपाठ करूनही मनुष्य चुका करीत राहतो, ज्ञानकोश वाचूनही तो अज्ञान व्यक्त करतो, याचं कारण एकच आहे—एक पुस्तक वाचायचं तो आजिबाद विसरतो ! त्या ग्रंथाचं नांव जीवन ? ! व्यक्तीचं जीवन नव्हे, समाजाचं जीवन—मानवी जीवन !

हा ग्रंथ अगणित लोकांच्या हृदयाच्या रक्तानं लिहिलेला असतो ! त्याचीं कांहीं पानं फाटलेलीं असतात, कांहीं हरवलेलीं असतात, कांहीं उलटीं-सुलटीं लागलेलीं असतात ! कित्येक ठिकाणीं दोनदोन तीनतीन वेळां मूळचा मजकूर खोडलेला असतो. त्यामुळं सत्य कुठलं आणि असत्य कुठलं याबद्दल मनांत गोंधळ उत्पन्न होतो. या ग्रंथांत फुलांपेक्षां कांटेच अधिक असतात, तारकांपेक्षां कोळसेच अधिक दिसतात. पण, पुतळा आणि जिवंत मनुष्य यांच्यांत जें अंतर आहे तेंच इतर पुस्तकं आणि हा ग्रंथ यांच्यांत असतं !

म्हणून माझं तुला एकच सांगणं आहे. उघड्या डोळ्यांनीं हा जीवनग्रंथ वाचण्याचा प्रयत्न कर. मात्र तो वाचायला तुला आपल्या घराबाहेर पडलंच पाहिजे. घरीं आरामखुर्चीत पडून हा ग्रंथ वाचायला लागलं कीं त्यांतलीं बहुतेक पानं कोरीं करकरीत दिसूं लागतात.

भर दुपारीं दोन वाजतां तूं पुण्यांत तरी कितीसा फिरला आहेस ? गोरगरीबांच्या वस्तींतून, लहानसहान गल्ल्यांतून, जिथं जिथं म्हणून

मानवी जीव धडपडत आहे, तडफडत आहे, तिथं तिथं आपण जायला नको कां ?

शहरांत रात्रीं चित्रपट पाहून परत येणारीं माणसं त्यांतल्या शृंगारिक प्रसंगांची चर्चा करीत जात असतात. पण पलीकडे फुटपाथवर चिंध्या पांघरून निजलेले लोक त्यांना दिसतात कां ? मनुष्यांना असं पशूसारखं कां जगावं लागत आहे याचा विचार ही मंडळी कधींतरी करतात कां ?

कारखान्यांत, शेतांत, इमारतींचे मजल्यावर मजले चढत असतांना, खाणींत मुंग्यासारखीं माणसं उतरत असतांना, चहाच्या मळ्यांत, दारुच्या गुत्त्यांत, भर दुपारीं, ऐन मध्यरात्रीं, प्रत्येक ठिकाणीं, प्रत्येक क्षणाला समाजाच्या जीवनांत पाहण्यासारखं पुष्कळ असतं. हें जीवन प्रत्यक्ष पाहून तूं समाजवादाचा विरोधक झालास तरी हरकत नाहीं. पण कांहीं झालं तरी आरामखुर्चीत पडून नुसत्या पुस्तकी सुधारणेचा पुरस्कर्ता होऊं नकोस.

वकील होऊन, डॉक्टर होऊन किंवा प्रोफेसर होऊन समाजसेवा करण्याच्या कल्पना अनेक तरुणांच्या मनांत असतात. पण त्या कल्पना म्हणजे वृक्षाला वसंताच्या आरंभीं येणारा मोहर ! बहुधा झाडाचा बराचसा मोहर गळून जातो. तरुणांच्या मनांतून देशभक्तीच्या कल्पनाही हळुहळु अशाच गळून जातात. मधाचा एकच थेंब चाखण्याकरितां माशी गेली तरी ती मधालाच चिकटून बसते. मध्यम वर्गांतल्या बहुतेक दुबळ्या ध्येयवाद्यांची स्थिति अशीच होत आली आहे. पोटासाठीं म्हणून प्रथम ते पैशाच्या मागं लागतात. मग पैसा त्यांच्या मागं लागतो. आणि मग—औषधासाठीं दारू प्यायला लागलेले लोक दारुबाज होतात ना ? तारुण्याच्या उंबरठ्यावर मोठमोठीं ध्येयें बाळगणारे हे लोक तसेच पैशाचे गुलाम होतात.

प्रेम हें जीवन-संगीत आहे म्हणून संसार करूं पाहणारे लोक त्यांच्याच माळेंतले. या संगीतानं शीण नाहींसा होऊन त्यांना लढण्याचा अधिक हुरूप आला असं सहसा घडत नाहीं. उलट संसाराची संगीत-

शाळा करून तिथें प्रेमगीतें आणि अंगाईगीतें गाण्यांत ते गुंग होऊन जातात !

तूं काल विचारलेल्या प्रश्नाचं स्पष्ट उत्तर आतां ओघानंच येत आहे!

प्रेम करणं हा तरुण मनाचा धर्म आहे.

मी सुद्धां प्रेम केलं आहे.

दुपारच्या वेळीं कुणाला भूक लागत नाहीं ?

प्रेम ही अशीच तारुण्यांतली भूक आहे.

ती शरीराची भूक आहे, मनाची भूक आहे, जीवनाची भूक आहे.

माझी प्रेयसी ज्योति—

मधें कितीतरी वर्षांत आमची गांठ पडली नव्हती ! पण मी परत आल्यावर आम्ही पहिली रात्र प्रेमाच्या गोष्टी बोलण्यांत घालविली नाहीं. किसानांची चळवळ लवकर प्रभावी कशी करतां येईल याविषयीं बोलत होतों आम्ही ! अगदीं रात्रभर !

जगाच्या दृष्टीनं ज्योति–जाऊं दे तें !

उपाशी भिकारणीच्या झोळींत कुणी भाकरीचा तुकडा टाकला तर ती तो आपल्या मुलाला देईल कीं स्वतः खाईल ? आपल्याला दुसरा तुकडा मिळेल या आशेनं ती तो तुकडा मुलालाच देईल. खरं ना ? आजच्या तरुणांच्या पुढंही हाच प्रश्न उभा आहे. समाजाच्या जीवनासाठीं व्यक्तीच्या जीवनाची उपासमार करण्याचा काळ आहे हा !

आजच्या सामाजिक युद्धांत आघाडीला लढणारे शिपाई फार फार कमी आहेत.

अभय, सैनिक हो ! मातृभूमीसाठीं लढणारा सैनिक हो, मानव धर्मा-साठीं लढणारा सैनिक हो, आघाडीवरला सैनिक हो.

मनांतल्या गोष्टी संपल्या म्हणून कांहीं हें पत्र मी पुरं करीत नाहीं. तुझी माझी गांठ पुन्हां केव्हां पडेल कुणाला ठाऊक! कदाचित् एखाद्या तुरुंगांतही भेट व्हायची आपली!

माझा तिकडला पत्ता लवकरच तुला कळवीन.

**वंदे मातरम्.**

तुझा भाई

**नरेंद्र**

× × ×

नरेंद्राचें हें पत्र अभय चवथ्यांदा वाचीत होता. पत्र इंग्रजींत होतें. पण तें इतकें सजीव होतें कीं नरेंद्र मराठींत आपल्याशीं बोलत आहे असा अभयला एकसारखा भास होत होता.

त्यानें टेबलावरली घंटा वाजविली. एक पोऱ्या आंत आला.

'एक चहा!'

'पाव–केक्स–बिस्किटं–खारीं बिस्किटं अगदीं ताजीं आहेत साहेब!'

'कांहीं नको! नुसता चहा आण!'

नरेंद्राचें पत्र वाचल्यानंतर आपणाला जेवण सुद्धां गेलें नाहीं. हातावर पाणी पडतांच आपण सायकलवर बसलों नि तडक आपल्या आवडत्या चहागृहाची वाट धरली. दुपारची वेळ असल्यामुळें आपल्याला एका खोलींत निवांत बसायला मिळालें. आपण नरेंद्राचें पत्र चार वेळां वाचलें.

या साऱ्या गोष्टी आठवून अभय स्वतःशींच हंसला. त्याच्या मनांत आलें—प्रेमपत्राचीं सुद्धां कुणी इतकीं पारायणें करीत नसेल!

प्रेमपत्र!

सकाळीं मालेनें पाठविलेलें तें पत्र आपल्या खिशांतच आहे कीं! पण आपण तें दोनदांच वाचलें. नि हें नरेंद्राचें पत्र—

खिशांतून मालेचें पत्र काढून अभयनें तें नरेंद्राच्या पत्राशेजारीं ठेविलें.

दोन पत्रें ? छेः ! दोन चित्रेंच होतीं तीं ! एक धबधब्याचें, दुसरें कारंज्याचें !

चहाचे घोट घेतां घेतां तो त्या दोन पत्रांकडे पुनः पुन्हां निरखून पाहूं लागला. त्याचें मन म्हणत होतें—लहान मूल धांवूं लागलें कीं तें पडेल म्हणून आईचें हृदय व्याकुळ होतें.

पण मुलगा मोठा झाल्यावर त्यानें कांहींतरी पराक्रम करावा असें त्याच मातृहृदयाला वाटतें ! माला आणि नरेंद्र—दोघांच्या मनांत हेंच अंतर आहे.

चहाचा पेला खालीं ठेवून त्यानें नरेंद्राचें पत्र पुन्हां हातांत घेतलें.

त्याची दृष्टि मधल्याच एका वाक्यावर स्थिर झाली—'जीवनग्रंथ वाचण्याचा प्रयत्न कर. मात्र तो वाचायला तुला आपल्या घराबाहेर पडलंच पाहिजे !'

दिवाळीच्या सुट्टींत याच हेतूनें तो जवळपासच्या खेड्यापाड्यांतून फिरून आला होता. बोलण्याच्या ओघांत नरेंद्राला त्यानें तें सांगितलेंही होतें.

पण आतां त्याला आपल्या या वैगुण्याची तीव्र जाणीव झाली. आपलें कोंकणांतलें मूळगांव नेवरें ! जन्मांत सुद्धां आपण पाहिलें नाहीं तें ! सांगली, पुणें आणि मुंबई हें काय तें आपण पाहिलेलें जग !

पण या चिमुकल्या जगाचा तरी सारा भाग आपण कुठें पाहिला आहे ? कॉलेज, शाळा, लायब्ररी, टेंकडी, सिनेमागृह यांच्यापलीकडे आपल्या जगाची मर्यादा कुठें गेली आहे ?

त्यानें चटकन् टेबलावर पडलेलीं दोन्हीं पत्रें खिशांत घातलीं, उठतां उठतां कांचेचें अर्धें दार हातानें लोटलें, बाहेर येऊन खिशांतले पैसे मॅनेजरच्या टेबलावर टाकले आणि तो सायकलवर बसून चालूं लागला.

मात्र कुठें जायचें हें त्याचें त्यालाच ठाऊक नव्हतें.

रस्त्याच्या बाजूला एक नवा तिमजली बंगला तयार होत होता. अभय एकदम थांबला. उंचावर काम करणाऱ्या, अरुंद फळीवरून तोल सावरीत

इकडून तिकडे जाणाऱ्या मजुरांकडे तो पाहूं लागला. त्याच्या मनांत आलें,—एकाद्याचा पाय चुकून घसरला तर—

मृत्यूच्या मुखांत ते मजूर काम करीत होते. अभयचें मन म्हणत होतें—एवढ्या उंचावरून विहिरींत पोहण्यासाठीं उडी घ्यायला सुद्धां आपण कचरूं! पण हीं माणसें—

त्यांच्या शांत मुद्रांवरून तीं खालच्या रस्त्यावरून चाललीं आहेत असेंच कुणालाही वाटलें असतें.

अभयला वाटलें—उद्यां या बंगल्यांत आरामानें राहणाऱ्या श्रीमंताला यांच्या या कष्टांची कल्पना तरी येईल कां? भर उन्हांत इतक्या उंचावर काम करणाऱ्या या मजुरांना सुखानें जगण्याइतका मोबदला तरी मिळतो कां?

सायकलबरोबर त्याच्या मनाचें भ्रमण सुरू झालें. रस्त्याच्या कडेला एका झोंपडीवजा घराच्या बाहेर एका घाणेरड्या कुत्र्याच्या पिलांभोंवतीं दोनतीन नागडीं उघडीं पोरें नाचत होतीं. तीं त्यानें पाहिलीं. एका झाडाच्या सावलीखालीं भाडें कमी करून आपलें गिऱ्हाईक उपटलें म्हणून एक टांगेवाला दुसऱ्याला शिव्या देत होता. त्या त्यानें ऐकल्या. डोक्यावर कसला तरी बोजा घेऊन जाणारी एक अनवाणी बाई कांटा लागल्यासारखी मधेंच थांबली आणि वांकली. पायांत शिरलेला कांचेचा तुकडा तिनें हातानें काढून दूर भिरकावून दिला आणि पायांतून रक्त येत असतांनाच ती धुळींतून चालूं लागली. अभयनें तेंही पाहिलें.

आपण स्टेशनाकडे कां आलों हें त्याचें त्यालाही कळलें नाहीं. पण चार पांच बोजांच्या भाराखालीं वांकून गेलेल्या एका म्हाताऱ्या हमालाच्या घामानें थबथबलेल्या चेहऱ्याकडे त्याची नजर गेली. त्याला वाटलें—हा जीव जन्मभर सकाळपासून संध्याकाळपर्यंत राबत आला आहे. पण उरीं फुटून काम केल्याशिवाय ओला कोरडा भाकरीचा तुकडा त्याला म्हातारपणीं सुद्धां मिळणार नाहीं! ही गोष्ट—

गाडी स्टेशनांतून बाहेर जाईपर्यंत तो उगीच रेंगाळत राहिला होता. स्टोव्हवर ठेवलेल्या भांड्यांतल्या पाण्याला उकळी फुटली तरी स्टोव्ह बंद केला

नाहीं म्हणजे पाण्यांतला थेंब न् थेंब जसा उकळूं लागतो तसा त्याच्या मनाचा कण न् कण बेचैन होऊन तडफडत होता.

घटकाभर स्वस्थ बसावें म्हणून तो बंडगार्डनकडे आला. त्यानें नदीकडे पाहिलें. पावसाळ्यांतला पाण्याचा प्रवाह आतां बराच रोडावला होता.

एका झाडाखालीं येऊन तो स्वस्थ बसला. क्षणभरानें तो आडवा झाला. अतिविचारानें असेल किंवा उन्हांत तापल्यामुळें असेल, हां हां म्हणतां त्याचा डोळा लागला.

पावसाळ्या रात्रीं दिव्याकडे जसे पतंग धांव घेतात, तशीं चित्रविचित्र स्वप्नें त्याच्या अस्वस्थ मनांत नाचूं लागलीं.

एका स्वप्नांत आक्का पांडुरंगाच्या तसबिरीला नमस्कार करीत होती. हां हां म्हणतां ती पांडुरंगाची मूर्ति नाहींशी झाली. अभयला त्या ठिकाणीं नरेंद्र दिसूं लागला. तो आक्काला म्हणाला ' ओळखलंस कां याला ? छेः ! तूं कुठून ओळखणार ? हा नरेंद्र–माझा मित्र–त्या दिवशीं खडकीला आला होता तो ! '

आक्का उद्गारली ' याचं नांव नरेंद्र ? छेः ! देवदत्त ! '

दुसऱ्या स्वप्नांत तो एका मोठ्या बागेमधें फिरत होता. विविध लतावृक्ष त्याला दिसत होते. पण त्यांपैकीं एकाचेंही नांव त्याला आठवेना. कुणीतरी त्याच्या कानांत म्हणालें ' तुला यांचीं नांवं आठवायचींच नाहींत ! '

' कां ? '

' हे वृक्ष नाहींत; पुरुष आहेत; या वेली नव्हेत; स्त्रिया आहेत ! '

' म्हणजे ? '

' शापानं यांना हें स्वरूप प्राप्त झालं आहे ! '

' काय केलं होतं यांनीं ? '

' प्रेम ! प्रेमाशिवाय दुसरं कांहींच केलं नाहीं यांनीं आयुष्यांत ! उर्वशीची गोष्ट ठाऊक आहे ना तुला ? '

शेवटच्या स्वप्नांत त्याला दिसलें–एका विशाल नदीचें पात्र दुथडी भरून वाहत आहे. दोन्ही कांठांवर हिरवींगार शेतें डुलत आहेत. तहानेनें व्याकुळ

झालेले वाटसरू आणि गुरें नदीचें पाणी पिऊन प्रसन्न मुद्रांनीं तिच्याकडे पाहत आहेत !

हा सारा देखावा एकदम बदलतो !

नदीला एक मोठा बांध घातलेला दिसतो. त्या प्रदेशाच्या राजाला विशाल जलाशयांत राणीबरोबर नौकाविहार करण्याची लहर आलेली असते !

बांध घातल्यामुळें नदीचे खालचें पात्र सुकून जातें, शेतें वाळून जातात. राणीच्या एकांताचा भंग होऊं नये म्हणून वरच्या भागाकडे चिटपांखरूं सुद्धां फिरकूं दिलें जात नाहीं. उन्हानें तापलेलीं गुरें, वासरें, चालून चालून दमलेले वाटसरू, सारे व्याकुळ होतात, आक्रोश करतात. त्या आक्रोशाला नौकेंतून शेवटीं उत्तर येतें–पण तें गाण्याच्या रूपानें ! राणीसाहेब एक शृंगारिक गीत गात असतात.

× × ×

अभय चार वाजतां घरीं आला.

' लवकरसा आलास आज ? ' आक्कानें विचारलें.

अभय स्वस्थ राहिलेला पाहून ती म्हणाली, ' मोतिराम आले आहेत ! '

' कुठं आहे ? '

' पलीकड ! '

' आजोबांची नि त्याची चांगलीच दोस्ती झालेली दिसते ! आश्चर्य आहेमोठं ! '

अभयनें दारांत जाऊन हांक मारली, ' मोतिराम ! '

मोतिराम थोड्या वेळानें पलीकडच्या बिन्हाडांतून आला. अभयकडे न पाहतां तो म्हणाला ' अरे वा ! तुझीच वाट पाहत होतों मी ! '

× × × ×

चहा झाल्यावर मालेकडे जाण्याकरितां अभय घराबाहेर पडला. आतां मालेची थट्टा कशी करावी या विचारांत त्याचें मन मग्न झालें.

पण मोतिराम कांहीं केल्या त्याचा पिच्छा सोडीना! अभयला सायकल हातांत धरून त्याच्या बरोबर चालावें लागलें.

अभयला वाटलें—या स्वारीला बरोबर घेऊन जाणें म्हणजे मालेला शिक्षा करण्यासारखेंच आहे. त्यापेक्षां तिच्याकडे थोडें उशीरां गेलेलें काय वाईट?

अर्ध्या वाटेवर एकदम कसली तरी आठवण झाल्याचा अभिनय अभयनें केला.

'अरेच्या! विसरलोंच होतों मी! जिमखान्याकड काम आहे माझं थोडं!'

'मी सांगूं कुठलं तें?'

'हं!'

'त्या लतेला भेटायचं! होय ना? माला मागं पडलेली दिसते! बाकी हें चालायचंच म्हणा! एक पुढारी मागं पडून दुसरा नाहीं कां पुढं येत? प्रेम हें एक प्रकारचं राजकारणच आहे! नाहीं कां?'

मोतीरामाच्या खो खो हंसण्याकडे तिरस्कारानें पाहत अभय सायकलवर बसला.

मात्र जेव्हां तो कालव्याजवळच्या कालच्या जागीं आला, तेव्हां मोतिरामाच्या अचुक भविष्यकथनाचें त्याला आश्चर्य वाटलें.

तिथें लता पाण्यांत खडे टाकून निर्माण होणारीं वलयें पाहत बसली होती.

काल तिनें केलेली थट्टा अभयला आठवली. तशीच तिची थट्टा करण्याचा मोह त्याला अनावर झाला! त्यानें मागून खडा टाकला. पण लता दचकली नाहीं किंवा तिनें मागें वळून पाहिलें नाहीं. ती फक्त हंसली.

पलीकडे बसत अभयनें विचारलें 'कुणावर रागावलां आहांत?'

'रागावलें नाहीं. अभिनंदन करायला आलें आहे. पण काय बोलावं हेंच सुचत नाहीं!'

'कुणाचं अभिनंदन करणार आहांत?'

'तुमचं!'

'माझं?'

‘ हो ! तुम्हांला कांहीं ठाऊकच नसेल अगदीं ! आमच्या शेजारच्या मुलानं दुपारीं तें सांगितल्यापासन तुमची भेट केव्हां होते असं झालं मला ! ’

‘ काय सांगितलं त्यानं ? ’

‘ बरेच आंतल्या गाठीचे आहांत हं ! तुमचं नि तुमच्या हेडमास्तरांचं काल वर्गांत भांडण झालं म्हणे ! हेडमास्तरांनीं तुम्हांला शाळेंतून काढून टाकलं ! पण त्या वर्गांतल्या मुलांनीं आज संप केला, तुम्हांला शाळेंत परत घेतल्याशिवाय कुणी वर्गांत जायचं नाहीं असं ठरविलं—’

अभय आश्चर्यानें पाहत होता. क्षणभर थांबून तो एकदम उठला !

‘ बसा ना ! ’ लता म्हणाली.

‘ काम आहे जरा. ’

‘ मालेकड ? ’

‘ हं ! ’

‘तें व्हायचं नाहीं आतां ! ’

‘ कां ? ’

‘ कांचन मघांशीच मोटार घेऊन गेलाय् तिच्या घरीं ! ’

अभयला वाटलें—आपल्या खिशांतलें मालेचें पत्र दाखवून लतेच्या या टोमण्याला चांगलें उत्तर द्यावें ! दुसऱ्याच क्षणीं त्या गोष्टीचा हास्यास्पदपणा त्याला जाणवला.

लता म्हणाली ‘ आमच्या शेजारचा तो मुलगा सांगत होता कीं तुमची स्मरणशक्ति फार चांगली आहे. कुठल्याही मुलाची ओळख तुम्ही कधीं विसरत नाहीं म्हणे ! मला मात्र अगदीं अगदीं उलट अनुभव आला ! ’

‘ मी तुमची ओळख विसरलों म्हणून कुणीं सांगितलं तुम्हांला ! ’

‘ कुणी कां सांगेना ? तुमच्या स्मरण-शक्तीची परीक्षाच पाहणार आहे मी आतां ! ’

तिच्या खेळकरपणाची गंमत वाटून अभय म्हणाला,

‘ परीक्षक महाराज, विद्यार्थी समोर उभा आहे ! ’

‘ उद्यां काय काय होणार आहे ? ’

‘ मी ज्योतिषी नाहीं, मास्तर आहे ! ’

‘ कुठं कुठं जाणार आहां तुम्ही उद्यां ? ’

‘ कुठं ? फार तर शाळेंत–मालेकड–आणखी—’

‘ आणखी कुठं ? ’

‘ आणखी कुठं नाहीं ! ’

‘ कुठ्ठं कुठ्ठं नाहीं ? ’

‘ अं हं ! तुम्ही जेवायला बोलावणार असलां तर तुमच्याकडही येईन !

‘ इश्श ! ’ म्हणून अभयच्या थट्टेचें कौतुक करणाऱ्या लतेच्या गालावर खळी क्षणभर चमकली, लगेच नाहींशी झाली. अभयला वाटलें–ही ख कालपासून आपल्या डोळ्यांशीं लपंडावच खेळत आहे.

गंभीर मुद्रेनें लता उद्गारली ‘ विद्यार्थी नापास झाला आहे ! ’

‘ परीक्षकाला तरी आपल्या प्रश्नाचं उत्तर ठाऊक आहे कां ? ’

लता खुदकन् हंसून म्हणाली ‘ उद्यां रात्रीं आमच्या शाळेचं नाटक अ बरं महाराज. मी आत्तां आठवण केली नसती, तर तुमचे तीन रुपये फु गेले असते ! ’

‘ अस्सं ? मग उद्यां रात्रीं आमची परीक्षक व्हायची पाळी आहे म्हणायची

‘ खूप खूप माणसं येणार आहेत उद्यांच्या नाटकाला ! त्या सिने कंपनीचे डायरेक्टर सुद्धां येणार आहेत माझं काम पहायला ! ’

‘ आनंदाची गोष्ट आहे ! लवकरच आम्हांला सिनेमाचे पास मिळाय लागणार म्हणायचे ! ’

‘ नुसते पासच नाहींत, मोटार सुद्धां ! ’

‘ पण मोटारींत बसून जायचं कुठं ? ’

‘ कोर्टांत ! परवांच वकील झालांत ना तुम्ही ? ’

‘ कोर्टांत जाऊन काय करायचं ? ’

‘ खुनाचा खटला चालवून आरोपीला वांचवायचं ! ’

‘ नव्या वकिलाकड कुणी असली केस देत नाहीं कधीं ! ’

‘ मग काय करायचं बाई ? ’

‘ तुमचं काम चालवीन मी ! ’

‘ माझं ? ’

‘ हो ! नटी झाल्यावर तुम्ही मोटार बेफाम चालवायला लागालच ! दररोज ारदोन तरी अपघात होतील ! तेव्हां मला भरपूर काम मिळायला कांहीं रकत नाहीं ! ’

हंसणाऱ्या लतेचा निरोप घेऊन अभय रस्त्याला लागला तोंच त्याच्या मोरून एक मोटार वायुवेगानें निघून गेली.

कांचन मोटार चालवीत होता. त्याच्या पलीकडे बसलेली माला हंसत ंसत त्याला कांहींतरी सांगत होती !

अभयच्या डोळ्यांपुढें दुपारचीं दृश्यें उभीं राहिलीं. ते मजुर, तो टांगेवाला, ो हमाल—

त्याला वाटलें—मोटारींत बसून मजेनें फिरायला जाणारीं माणसें हीं ीवनग्रंथाच्या सोनेरी वेलबुट्टीसारखीं आहेत ! पण या ग्रंथांतला मजकूर ? यांतलें अक्षर न् अक्षर रक्ताच्या शाईनें लिहिलेलें आहे !

## १०

# न विझणारी आग

आपल्या दाराबाहेर कुणाचे तरी जोडे आहेत हें पाहून अभयला आश्चर्य वाटलें. तो आंत गेला तेव्हां तर हें आश्चर्य द्विगुणित झालें. झोंपाळ्यावर बसून दत्तोपंत दूध घेत होते.

दुधानें भरलेली वशी तोंडाला न लावतां हातांत तशीच धरून ते म्हणाले, ' खूप वेळ वाट पाहिली तुमची. आक्का म्हणाल्या—तुम्ही केव्हां याल याचा नेम नाहीं कांहीं ! तेव्हां म्हटलं दूध पिऊन ताजंतवानं व्हावं नि तुमची वाट पहात बसावं ! '

दत्तोपंत हंसले. त्यामुळें अभयलाही आपल्या मुद्रेवर स्मिताचें प्रदर्शन करावें लागलें. मात्र दत्तोपंत आपल्याकडे कां आले असावेत याचा कांहीं त्याला बरोबर तर्क करतां येईना !

हातांतली वशी झोंपाळ्यावर ठेवीत दत्तोपंत म्हणाले ' सहज आलों होतों मी ! तुमचे हेडमास्तर भेटले मघांशीं—त्यांनीं तुम्हांला उद्यां शाळेंत यायला सांगितलं आहे ! तो निरोप तर सांगायचा होताच ! शिवाय—'

दत्तोपंतांनीं आक्काकडे पाहून सहेतुक हास्य केलें—आक्का अभयकडे पाहून हंसली. अभयनें त्या हास्याचा अर्थ ओळखला. आक्काचें तें हास्य जणुं कांहीं गात होतें—माला माझी वहिनी होणार, माला लवकरच माझी वहिनी होणार.

दत्तोपंत अभयचा निरोप घेऊन जायला निघाले. तेव्हां त्याला एका गोष्टीचें विलक्षण आश्चर्य वाटलें. आज आपण शाळेंत गेलों नाहीं, काल दत्तोपंतांनीं सांगितल्याप्रमाणें हेडमास्तरांची माफी मागितली नाहीं, कांहीं नाहीं. असें असून हेडमास्तरांनीं आपल्याला उद्यां परत शाळेंत बोलावलें!

आपल्याला हा विजय कुणी मिळवून दिला हें काय दत्तोपंतांना ठाऊक नसेल ? एका शिक्षकावर अन्याय होत आहे म्हणून मुलांनीं संप करणें ही गोष्ट दत्तोपंतांसारख्या गांधीवाद्यांना तरी महत्त्वाची वाटली पाहिजे. इन्स्पेक्शन जवळ आली म्हणून हेडमास्तर इतके नरम झाले असावेत ! एरवीं त्यांनीं या संपाला भीक घातली नसती. तें कांहीं असलें तरी दत्तोपंतांना मुलांच्या या धैर्याचा अभिमान वाटायला हवा होता. पण ते त्याविषयीं चकार शद्बसुद्धां बोलले नाहींत ! आपल्या भावी जांवयाची नोकरी कुणीकडून सुरक्षित राहिली म्हणजे झालें असें त्यांच्यासारख्या त्यागी मनुष्याला सुद्धां वाटावें ? छेः ! किती संकुचित दृष्टि आहे ही !

मनुष्य जसजसा मोठा होत जातो तसतसा त्याच्या दृष्टीचा विकास व्हायला हवा ! नदीचें पात्र उगमापाशीं किती लहान असतें—पण तेंच मुखाजवळ किती विशाल दिसतें !

छेः ! मानवी जीवन ही नदी नाहीं ! दत्तोपंतांकडे पाहिलें, आपल्या आक्काकडे पाहिलें कीं वाटतें—मानवी जीवन कमलासारखें आहे. आयुष्यांतली संध्याकाळ सुरू झाली कीं तें संकोच पावूं लागतें. त्याचा मध्यान्हींचा विकास कुणाला खरासुद्धां वाटायचा नाहीं इतकें तें संकुचित होतें !

जेवतांना असे कितीतरी विचार अभयच्या मनांत पिंगा घालीत होते. दत्तोपंत काय काय म्हणत होते हें वाढतां वाढतां आक्का त्याला सांगत होती. मधेंच ती म्हणाली ‘ काल शाळेंत तुझं एवढं भांडण झालं. पण—’

आक्का पुढें कांहीं बोलली नाहीं. तिची दृष्टि म्हणत होती—लहानपणीं गुडघ्याला कुठें एवढेसें खरचटलें तर तें सुद्धां तूं मला येऊन सांगत होतास. आणि आतां मात्र मनाच्या मोठ्या जखमासुद्धां तूं लपवून ठेवायला लागला आहेस.

अभयनें आक्काला उत्तर दिलें, ' सांगण्यासारखं काय होतं त्यांत एवढं ? '

मात्र हें बोलत असतांना त्याची दृष्टि म्हणत होती—शरीराच्या जखमा-इतक्या मनाच्या जखमा सहज दाखवितां येत नाहींत ! मनानें एक झालेलीं दोन माणसेंच एकमेकांच्या असल्या जखमा पाहूं शकतात. आपलें एकमेकांवर प्रेम आहे. पण आपण मनानें कुठें एक आहों ?

मालेचें लग्न लवकरच करून टाकण्याचा दत्तोपंतांचा विचार आहे असें आक्का म्हणाली, तेव्हां अभय मुद्दामच म्हणाला ' आम्हांला अहेराचा खर्च आहे म्हणायचा ! '

आक्का हंसत उत्तरली ' अहेरावर नाहीं सुटका व्हायची ! दागिन्यांचा खर्च आहे, घरभाडंही वाढणार आहे, नि दोन वर्षांनीं पाळणासुद्धां विकत घ्यावा लागेल !'

आक्काच्या या सुखस्वप्नाचें अभयला क्षणभर हंसूं आलें. इतक्यांत पलीकडून चारूचें रडणें मोठमोठ्यानें ऐकूं येऊं लागलें.

अभय जाऊन पाहतो तों कावेरी चारूचे दोन्ही खांदे हलवीत ओरडत होती ' करशील कां पुन्हां हट्ट ? अवलक्षणी कारटं कुठलं ! '

चारूला तिच्या हातांतून ओढून घेत अभयनें विचारलें ' काय मागतोय् चारू ? '

' चॉकोलेट ! याच्या आजोबानं जसे कांहीं डबेच्या डबे भरूनच ठेवले आहेत घरांत ! '

मोतिरामानें काल चारूला चॉकोलेटचा पुडा आणून दिला असतांना त्याच्या आईनें त्याचा हा हट्ट कां पुरवूं नये याचें अभयला नवल वाटलें.

तो चारूला घेऊन आपल्या बिऱ्हाडाकडे वळला.

पलीकडच्या आजोबांच्या खोलींत दिवा आहे, इतकेंच नव्हे तर आंत आजोबा असून ते चारूची समजूत करण्याकरितां आपल्या खोलींतून बाहेरसुद्धां

आले नाहींत, ही गोष्ट अभयला कावेरीच्या आतांच्या वर्तनाइतकीच आश्चर्य-कारक वाटली.

खोलीचें दार थोडेसें लोटलेलें होतें. अभयनें आंत डोकावून पाहिलें. आजोबांच्या पुढें चार पांच लिहिलेले चवरके पडले होते. आतांही एका चवरक्या-वर ते कांहीं तरी लिहीत होते.

'काय चाललंय् आजोबा?' न बोलतां जाणें बरें नाहीं असें वाटून अभयनें प्रश्न केला.

'लिहिणं!'

'हिशेब?'

'हिशेबच म्हणायचा! मात्र दररोजचा जमाखर्च नाहीं हा! साऱ्या आयुष्याचा आहे!' आपलें वाक्य संपवून आजोबांनीं जें हास्य केलें तें निर्माल्य म्हणून तुळशीवृंदावनांत टाकलेल्या फुलांसारखें होतें.

आजोबांशीं अधिक बोलण्याचा अभयचा बेत असावा! पण चारूनें आपल्या हातांत घट्ट धरलेलें त्याचें बोट हळूच ओढलें. ती उघड उघड चॉकोलेटची खूण होती.

अभय चॉकोलेट आणण्याकरितां चारूला घेऊन घराबाहेर पडला तेव्हां चारूनें कडेवर बसण्याचा हट्ट धरला. अभयला तो पुरविणें प्राप्तच होतें.

निम्या वाटेवर अभय चारूला म्हणाला—'चाल आतां जरा!'

'कां?'

'तूं मोठा झाला आहेस ना?'

'अंहं! मी लहानच आहे!'

'चॉकोलेट मिळाल्यावर मग चालत येशील?'

'हं!'

दुकानाच्या पायऱ्या चढतां चढतां समोरून येणाऱ्या एका भिकारणीकडे अभयचें लक्ष गेलें. तिच्या कडेवर एक मोठें मूल बसलें होतें आणि दुसरें गळ्यांत बांधलेल्या झोळींत चुळबुळ करीत होतें.

× × ×

दुसरे दिवशीं अभयनें आपल्या वर्गांत प्रवेश केला, तेव्हां मुलांनीं टाळ्या वाजवून त्याचें स्वागत केलें. शाळेच्या चिमण्या जगांतहि लढाया असतात आणि त्या लढणाराचें कौतुकहि होत असतें असें वाटून अभय हंसला.

मोठ्या उत्साहानें तो आपला गणिताचा तास घेऊं लागला. कांहीं हुषार मुलें प्रश्नांचीं उत्तरें बरोबर देत होतीं, कांहीं मुलें ठराविक रस्त्यानें जाणाऱ्या आंधळ्यांप्रमाणें हळुहळु पुढें जात होतीं आणि कांहीं अपरिचित जागीं अंधारांत वस्तु शोधणाऱ्या माणसांप्रमाणें उगीच धडपडत होतीं.

हा अनुभव नेहमींचाच होता. पण अभयची वर्गाकडे पाहण्याची आजची दृष्टि मात्र निराळी होती. काल याचवेळीं तो अगदीं भिन्न जगांत होता. काल त्यानें पाहिलेले ते मजूर, तो भांडखोर टांगेवाला, स्टेशनावरला तो म्हातारा हमाल, या सर्वांची आठवण होऊन तो स्वतःशीच उद्गारला 'तें जग निराळं नि हें जग निराळं!'

प्रत्येक तासाला त्याचें मन पुनःपुन्हां कालच्या दृश्यांचा विचार करी. त्याच्या मनांत आलें, काल आपणासाठीं संप करण्यापर्यंत मजल मारणाऱ्या या भावनाप्रधान जीवांना शाळेबाहेरच्या अन्यायांची आपण कल्पना सुद्धां येऊं देत नाहीं. जीवनाची सफलता बुद्धीच्या विलासापेक्षां भावनांच्या विकासांत आहे, व्यक्ति म्हणून चैनीनें जगण्यापेक्षां समाजांतला एक घटक म्हणून शौर्यानें मरण्यांत आहे, हे विचार निर्जीव पुस्तकांत कोंडलेल्या अंतःकरणांत उत्पन्न तरी कसे व्हावेत?

शाळा हा एक प्रकारचा तुरुंगच आहे. नाहीं कां?

शाळेचीच गोष्ट कशाला हवी? कुटुंब हाही एक तुरुंगच नाहीं कां? तुरुंगातल्या कैद्यांप्रमाणें ज्यांना संवयीनें कुटुंबांत एकत्रित रहावें लागतें अशीं किती तरी माणसें दाखवितां येतील! सुखी कुटुंबांकडे पाहिलें तरी सुद्धां कुटुंब हा तुरुंगच ठरतो! कुटुंब जास्तींत जास्ती सुखी व्हावें म्हणून प्रत्येकजण धडपडत असला तरी कुटुंबापलीकडे जग आहे, तें कुटुंबापेक्षां अनंतपटीनीं विशाल आहे, आपलें कुटुंब हें समाजवृक्षावरल्या कोट्यावधि घरट्यांपैकीं एक घरटें आहे, याची जाणीव सुखवस्तु कुटुंबांतल्या कितीशा लोकांना असते?

कुटुंब, जाती, पुस्तकी ज्ञानाच्या शाळा या सार्‍या संस्था रानटी स्थितींतून प्रगति करण्याच्या दृष्टीनें मानवजातीला अत्यंत उपयुक्त होत्या. पण आतां— आज—

अस्वस्थ मनःस्थितींत अभयनें खिडकीबाहेर पाहिलें. आकाशांतून पांढर्‍या ढगांची माळच्या माळ मंद गतीनें पण मोठ्या डौलानें चालली होती !

× × ×

घरीं जातांना भेटून जाण्याविषयीं हेडमास्तरांचा निरोप आला, तेव्हां कालच्या प्रकरणाचें शेंपूट अजून शिल्लक आहे हें अभयनें ओळखलें. हेडमास्तर कोणकोणते प्रश्न विचारतील व त्यांचीं रोखठोक उत्तरें कशीं द्यायचीं याचा तो विचार करूं लागला.

पण सापाच्या संशयानें काठी घेऊन आलेल्या मनुष्याला दोरी दिसावी तशी अभयची स्थिति झाली. हेडमास्तरांनीं सौम्य शब्दांत ‘ इनस्पेक्शन जवळ आली, अजून तुमचं फेअरवर्क तयार नाहीं ! ’ एवढेंच त्याला सुनावलें. त्याला निरोप देतांना ते म्हणाले ‘ दिवाळीची सुट्टी अगदीं मजेंत घालविलेली दिसते तुम्हीं ! चालायचंच ! आम्हीही एकदां तुमच्याएवढे तरुण होतोंच ! तेव्हां—’

अभय शाळेंतून थेट घरीं यायला निघाला. वाटेंत त्याला मालेएवढी एक उंच मुलगी दिसली. आपण मालेकडे काल गेलों नाहीं, तेव्हां आज तरी जायला हवें, असें त्याला क्षणभर वाटलें. पण लगेच टेबलावरले एक्झरसाईझ् बुकांचे ते ढीग त्याच्या डोळ्यांपुढें उभे राहिले.

घरीं येऊन त्यानें नेटानें दीडदोन तास काम केलें. इतक्यांत चारुचंद्र एक छोटी तुतारी फुंकीत त्याच्यापाशीं आला.

अभयनें कौतुकानें विचारलें ‘ काय छोटे शिपाई, कुठं जाणार ही तुतारी घेऊन ?

‘ नातकाला ! ’

‘ नाटकाला ? ’

' हो ! तें मोतिलाम मामा आहेत ना, त्यांनीं दिली ही तुताली मला ! मला नातकालाही तेच घेऊन जानाल आहेत ! तुम्हांला नाहीं नेनाल ! टुक—टुक—टुक—!'

तुतारी वाजवीत चारु आक्काला आपला पराक्रम दाखविण्याकरितां स्वयंपाक घरांत गेला !

आतां मात्र अभयचें लक्ष हातांतल्या कामाकडे लागेना.

राहून राहून त्याच्या मनांत विचार येत होता—अवघ्या तीन दिवसांत हा मोतिराम आजोबांच्या घराण्याचा नि आपला तीन पिढ्यांचा ऋणानुबंध आहे असें दाखवायला लागला, याचा अर्थ काय ?

× × ×

दोन रुपयांच्या खुर्च्यांच्या रांकेंत मोतिराम, कावेरी आणि चारुचंद्र यांना जेव्हां अभयनें रात्रीं पाहिलें तेव्हांही हाच प्रश्न त्याच्यापुढें उभा राहिला. मोतिरामाचा पूर्व इतिहास त्याला आठवला. कॉलेजांत काव्यांतल्या प्रेमांतच तो गुंग असे. त्यामुळें त्याच्या या वेडाचा त्याच्या अभ्यासावर फारसा परिणाम झाला नाहीं. पण नटव्या मुलींवर पैसा खर्च करून त्यांच्याशीं स्नेह करण्याची संधि मिळत नाहीं म्हणून तो मनांतल्या मनांत फार हळहळत असे. त्याचें रूपही कांहीं विशेष अनुकूल नव्हतें. बी. ए. झाल्याबरोबर काव्यांतलें प्रेम तो व्यवहारांत आणूं लागला, शिकवण्यांच्या पैशांतली एक पैही घरीं न पाठवितां त्यानें निरनिराळ्या मुलींशीं मैत्री करायला सुरवात केली आणि—

आक्कानें अभयचा खांदा हळूच हलवून त्याला माला दाखविली. त्याची स्मृतिशृंखला मधेंच तुटली.

माला अगदीं पुढच्या रांकेंत बसली होती. तिच्या पलीकडे लतेची आई आणि देवदत्त होते.

देवदत्तांकडे बोट दाखवीत अभय म्हणाला ' ते पहा लतेचे मामा—देवदत्त !'

आपण देवदत्तांकडे मुद्दाम बोट दाखवीत असतांनाही आक्का दुसरीकडे काय पाहत आहे हें अभयला कळेना !

नाटक सुरू होतांच त्याला रंग भरला. लता बिजलीचें काम मोठ्या ठसक्यानें करीत होती. कांचनही आपल्या कामांत रंगून गेला होता. मात्र रंगभूमीवर बाबा शिगवण बोलत असतांना त्याच्याजवळ उभ्या असलेल्या विठू कृष्णानें जेव्हां मधेंच मालेकडे पाहून स्मित केलें, तेव्हां अभयच्या पुढच्या रांगेंत त्याच्यापुढें बसलेला एक तरुण उद्गारला 'त्या मालेलाच हंसा करायला हवं होतं म्हणजे अगदीं स्टेजवर—'

पहिला अंक झाला तेव्हां त्या तरुणाचें आपल्या दोस्ताशीं संभाषण सुरू झालें. स्वारीचा आवाज अगदीं खडा होता. त्यामुळें त्यांचें बहुतेक संभाषण अभयला ऐकूं आलें. विठू कृष्णाचें काम करणारा कांचन मालेला घेऊन हल्लीं मोटारींतून फिरतो, स्वारी कॉलेजांत असतांना नाटकांत कामें तेवढीं चांगलीं करी, पण इंग्लंडला जाऊन कसली तरी परीक्षा देऊन आल्यामुळें आतां त्याला गिरणींत बड्या पगाराची नोकरी मिळणार आहे, तेव्हां दत्तोपंत देशपांड्यांची घर-सासरा म्हणून त्याच्याकडे राहण्याची आयती सोय होईल, इत्यादि त्याचीं मुक्ताफळें ऐकून अभयला वाटलें—हें आक्कानें ऐकलें तर ?

त्यानें आक्काकडे पाहिलें. ती डोळे मिटून कसला तरी विचार करीत होती ! तिचें लक्ष या संभाषणाकडे नव्हतें, हें अभयला एकापरीनें बरेंच वाटलें.

बिजली आणि विठू यांचा भाकरीचा प्रवेश चांगलाच रंगला. लतेची तडफ आणि कांचनाचा खेळकरपणा यांचें मोठें मनोहर मिश्रण झाल्यामुळें या प्रवेशांतल्या कितीतरी खटक्यांना टाळ्या पडल्या.

अंक संपल्यावर पुढल्या रांगेंतल्या त्या मित्रांचें संभाषण पुन्हां सुरू झालें. त्या माहितगार तरुणाला त्याचा स्नेही सहज म्हणाला 'हीं बहीणभावंडं किती मोकळेपणानं काम करताहेत नाहीं ?' 'बहीणभावंडं ?' एवढेंच उत्तर देऊन दुसरा मिस्किलपणानें हंसला. लगेच आपल्या मित्राच्या कानाशीं तो कुजबुजूं लागला. आतां अभयला त्यांचें संभाषण नीट ऐकूं येईना. मात्र 'दिल्ली,' 'गिरणी,' 'कोड होतं तिला,' 'कामापुरता मामा,' इत्यादि मधूनच ऐकूं येणाऱ्या उद्गारांनीं त्याच्या मनांत मोठा गोंधळ उडवून दिला.

शेवटचा अंक होण्यापूर्वी रंगभूमीवर बक्षीस-समारंभ झाला. लता, कांचन, इत्यादिकांना देवदत्तांच्या हस्तें पदकें देण्यांत आलीं. देवदत्तांनीं मुंबईहून मुद्दाम

येऊन समारंभाला शोभा आणल्याबद्दल आणि शाळेला उदार देणगी दिल्याबद्दल त्यांचे आभार मानण्यांत आले. समारंभ संपला असें वाटलें तोंच एक केंस पिंजारलेला सूटबूटवाला रंगभूमीवर आला आणि त्यानें लतेचें अभिनंदन करून अशा तरुणींनीं चित्रपटसृष्टींत पाऊल टाकल्याशिवाय हिंदी चित्रें चांगलीं निघणार नाहींत असें ठांसून सांगितलें. हा गृहस्थ मुंबईला नवीन निघालेल्या एका सिनेमा-कंपनीचा डायरेक्टर असून त्याचें नांव एफ्. सूर्यराव आहे हें अभयला पुढल्या रांकेंतल्या त्या दोस्तांच्या बोलण्यावरून लगेच कळलें. एफ् म्हणजे फॅट, फॅडिस्ट कीं फादर याविषयींही त्यांच्यांत हळूच हास्ययुक्त चर्चा झाली.

हाच डायरेक्टर लतेला आपल्या कंपनींत बोलावीत असावा, हें आक्काला सांगण्याकरितां अभयनें मान वळवली.

त्याला आश्चर्य वाटलें—आक्काच्या डोळ्यांत पाणी तरळत होतें. नाटक सुरू असतांना असें होणें स्वाभाविक होतें. पण समोरचा साधा समारंभ पाहून—

अभयनें विचारलें ‘ काय झालं ग आक्का ? ’

‘ कांहीं नाहीं ! हें नाटक पूर्वी दोनदां पाहिलंय् आपण ! नाहीं ? त्यामुळं बिजली आणि विठू यांचा तो शेवटचा प्रसंग आहे ना ? तो डोळ्यांपुढं उभा राहिला ! नि—’

बिजली-विठू-बिजलीचें कधींही सफल न होणारें विठूवरलें प्रेम—

अभयच्या मनांत आलें—पराक्रम आणि प्रीति यांचा कल्पनेच्या जगांत सुद्धां संगम होऊं नये असाच विधिसंकेत आहे काय ?

× × ×

दुसरे दिवशींपासून अभय जोरानें आपल्या कामाला लागला. अक्षतांना कुंकू लावतात त्याप्रमाणें वह्यांतल्या लिखाणाला तांबडी शाई लावून आपलें काम होईल हें त्याला ठाऊक होतें. पण प्रत्येक वहींतलें अक्षर नि अक्षर तपासायचा त्यानें निश्चय केला. दुसऱ्याला फसविणारा मनुष्य नकळत आत्मवंचना करीत असतो, असें त्याला नेहमींच वाटे.

या कारणामुळें त्याचे तीन चार दिवस मोठ्या गडबडींत गेले. मात्र लता, माला, मोतिराम आणि हेडमास्तर यांच्याविषयीं त्याच्या मनांत विचार आले नाहींत असा एकही दिवस या दिवसांत नव्हता.

दररोज सकाळीं वर्तमानपत्रें उघडलीं कीं त्यांच्यांत लतेविषयीं कांहीं ना कांहीं बातमी असेच ! एक् , सूर्यरावांच्या ' मातृभूमि ' या क्रांतिकारक राष्ट्रीय चित्रांत ती नायिका होण्याचा संभव आहे असें एकानें आपलें छापलें, तर कल्पलता या नांवाखालीं येणाऱ्या गोष्टी तिच्याच असल्यामुळें ती सिनेमांत नुसती नटी म्हणून जाणार नाहीं असें दुसऱ्यानें प्रसिद्ध केलें. तिसऱ्यानें तिच्या आईची या बाबतींतली मुलाखत लवकरच छापण्याचें आश्वासन दिलें होतें. चवथ्यानें पुण्यांत ६६६ नंबराच्या टेलिफोन यंत्राला सध्यां सर्वांत अधिक काम करावें लागत आहे असें लिहून त्याखालीं लतेचा फोटो छापला होता. हें सारें वाचून अभयला हंसूं येई. पण त्याचें मन म्हणे—लतेंत कांहीं तरी चमक आहे यांत संशय नाहीं. तिच्या गोष्टींत कल्पकता आहे, अभिनयांत सजीवता आहे, संगीतांत सहृदयता आहे. स्त्रीच्या रूपसौंदर्यापेक्षां तिचें बुद्धिसौंदर्य अधिक मोहक असतें असें म्हणतात, तें कांहीं खोटें नाहीं !

लतेविषयींचे असले विचार मनांत घोळत असल्यामुळें तो या तीन चार दिवसांत मालेकडे गेला नाहीं, असें मात्र नाहीं. शाळा सुटतांच त्याला मालेची आठवण होई. पण त्याला वाटे—मालेच्या घरीं आपण गेलों नि दत्तोपंतांनीं आक्काला विचारलेल्या प्रश्नाचें उत्तर तिनें आपल्यापाशीं मागितलें तर ? इन्स्पेक्शन तर होऊन जाऊं दे ! मग शांतपणानें त्या प्रश्नाचा विचार करूं !

मोतिराम आणि हेडमास्तर यांची दररोज त्याला विशेष आठवण होण्याचें खरोखर कांहीं कारण नव्हतें. पण चारु नाचत आला नाहीं आणि ' मोतिराम मामांनीं हें मला दिलं ' म्हणून त्यानें नवा खाऊ किंवा सुंदर खेळणें अभयला दाखविलें नाहीं, असा या चार दिवसांत एक दिवसही गेला नाहीं.

हेडमास्तरांच्या बाबतींत तसेंच घडे. मधल्या सुट्टींत अभयनें हेडमास्तरांवर मिळविलेल्या विजयाचें पुनःपुन्हां अभिनंदन होई, वर्षानुवर्षें काम करून ज्यांना वर्षांतून दहा महिन्यांचाच पगार मिळत होता असे अनेक शिक्षक

अभयची पाठ थोपाटीत ! प्रौढ मराठे मास्तरांनीं तर ‘ मी दुःख सहन करीन, पण अन्याय सहन करणार नाहीं’ असें म्हणणाऱ्या कुंकूंतील करारी नायिकेशीं अभयची तुलना केली आणि त्या नायिकेनें जशी म्हाताऱ्या नवऱ्यावर प्राण द्यायची पाळी आणली त्याप्रमाणें अभयही हेडमास्तराची दुर्दशा करणार असें भविष्य वर्तविलें. बोलतां बोलतां हेडमास्तरांची खोड मोडण्याची कांहींतरी युक्ति अभयनें काढली तर आपण तिला पूर्ण पाठिंबा देऊं, असेंही असल्या बहुतेक मास्तरांनीं बोलून दाखविलें.

× × ×

‘ कुंकू ’ बोलपट पाहिल्यावर त्याचा विषय फार जुना आहे, अशी अभयच्या सर्व मित्रांनीं त्याच्यावर टीका केली होती. डॉ. देशमुखांनीं तर ‘ प्रेमाला विवाहाची जरूरी आहे कीं नाहीं ? ’ असला आधुनिक विषय घ्यायचें सोडून चित्रपट मंडळ्या कसले तरी जुनेपुराणे विषय घेतात म्हणून ‘ कुंकू ’वर झोड उठविली होती.

अभयचें मत निराळें होतें. तो म्हणे—कुंकूमधल्या विषयाचें शरीर जुनें आहे, पण त्याचा आत्मा अजूनही नवीन आहे. ‘ कांहीं झालं तरी मी अन्याय सहन करणार नाहीं ! ’ हें कडवें उत्तर समाजांतल्या सामान्य माणसांच्या तोंडून सुद्धां ज्यावेळीं बाहेर पडूं लागेल, त्यावेळीं हा विषय जुना होईल. जोंपर्यंत स्त्रियांना आपल्या व्यक्तित्वाची जाणीव होत नाहीं, दलित वर्गातला रक्ताचा थेंब न् थेंब जुलमाला टक्कर देण्याकरितां वर उसळून येत नाहीं, पैशाचे आणि सत्तेचे गुलाम आपल्या मानेवरलें जुलमी जूं झुगारून देत नाहींत, तोंपर्यंत ‘ कुंकू ’ चित्रपटाचा विषय जुना होणार नाहीं.

हा सारा वादविवाद अभयच्या डोक्यांत या चार–पांच दिवसांत पुनः पुन्हां घोळूं लागला.

इन्स्पेक्शन सुरू झाली.

अभयनें एक अर्ज इन्स्पेक्टरांच्या हातांत ठेवला.

इन्स्पेक्टरांनीं हेडमास्तरांच्यापुढें तो अर्ज ठेवून खुलासा विचारला. त्या अर्जांत दहा बारा शिक्षकांचीं नांवें होतीं. त्यांना दहा महिन्यांचा पगार देऊन

शाळा त्यांच्या सद्या मात्र बारा महिन्यांच्या पगारावर घेते असें अर्जांत लिहिलें होतें.

इन्स्पेक्टरांनीं अर्जांत उल्लेखलेल्या सर्व मास्तरांच्या साक्षी घेतल्या. सर्वांनीं आपणाला बारा महिन्यांचा पगार मिळत असल्याचें कबूल केलें.

अभय सपशेल खोटा ठरला !

शाळेची व व्यक्तिशः हेडमास्तरांची अभयनें बदनामी केली असें ठरलें.

हेडमास्तरांनीं माफीची मागणी केली. अभयनें उत्तरादाखल त्यांच्या हातांत आपला राजीनामा ठेवला.

हेडमास्तरांनीं तो आनंदानें स्वीकारला. मागच्या आठवड्यांतल्या मुलांच्या संपाच्या वेळींच त्यांची खात्री होऊन चुकली होती कीं अभय ही कधींही न विझणारी आग आहे !

११

# मी दादांचा मुलगा आहे

हेडमास्तरांच्या हातांत अभयनें हांसत आपला राजिनामा दिला. ज्यांची बाजू आपण लढवायला गेलों त्यांनीं आपल्याला दगा दिला या कल्पनेनें तो मधें क्षणभर सुन्न झाला होता, नाहीं असें नाहीं. पण लगेच लढवय्या आपल्याला कुणाची मदत आहे किंवा नाहीं, अथवा आपल्याला विजय मिळेल किंवा नाहीं, हें कधींही पहात नाहीं, हा विचार त्याच्या मनांत इतका प्रभावी झाला कीं इन्स्पेक्टरांनासुद्धां त्याच्या निर्भयपणाचें कौतुक वाटलें. 'या एका गोष्टीनं शाळेंतलं तुमचं रेकॉर्ड वाईट होत आहे. त्यामुळं दुसरीकडं तुम्हांला नोकरी मिळणं कठीण पडेल!' इत्यादि व्यावहारिक गोष्टीही त्यांनीं पर्यायानें अभयला सुचविल्या पण त्यांच्या सर्व सूचनांना अभयनें हंसून एकच उत्तर दिलें,—

'लढाईंत जखमा या व्हायच्याच!'

शाळेंतून बाहेर पडेपर्यंत त्याच्या तापलेल्या मनाचा उत्साह नुसता उतूं जात होता. पण तापांत खूप बोलणाराला ताप उतरल्यावर, जसें गळून गेल्यासारखें वाटतें, तशी त्याची टेंकडीवरल्या निवांत जागीं स्थिति झाली. मन शांत

व्हावें म्हणून तो अगदीं एका बाजूला जाऊन बसला होता खरा! पण त्या एकांतांत त्याच्या मनांतलें वादळ पळापळाला वाढूं लागलें.

सत्य–न्याय–हक्क! हे सारेच पोकळ शब्द आहेत कां? जगाच्या व्यवहारांत त्यांना कुठेंच स्थान नाहीं? इन्स्पेक्टरांना आपली बाजू सत्य असावी असें निश्चित वाटत होतें. पण त्यांनीं फक्त पुरावा पाहिला! आणि ज्यांच्यावर अन्याय होत होता म्हणून आपण हें भांडण उकरून काढलें, त्यांनीं मुकाट्यानें माघार घेतली–आपल्याला तोंडघशीं पाडलें!

माणसें अशीं मेंढरासारखीं वागूं लागल्यावर—

भोंवतालचे वेडेवांकडे खडक, समोर दिसणारीं दोन तीन बाभळीचीं झाडें, पृथ्वीवर पडूं लागलेली रात्रीची काळसर छाया, प्रत्येक दृश्यांत अभयला आपल्या उदास मनाचें प्रतिबिंबच दिसलें. त्याच्या मनांत आलें—शिक्षणानें मनुष्याच्या मनाचा कणखरपणा कमी होत असावा! परवां मुंबईला कामगारांनीं आपल्या हक्कांसाठीं एवढा मोठा संप केला, परवां आपल्या शाळेंतल्या मुलांनीं त्याच पद्धतीनें अन्यायाचा प्रतिकार केला, आणि आज? आज आपल्या सुशिक्षित प्रौढ सहकाऱ्यांनीं मात्र दुबळेपणाचें लाजिरवाणें प्रदर्शन केलें.

रानटी काळांत मनुष्याला पदोपदीं पशूंविरुद्ध लढावें लागत होतें, पळापळाला निसर्गाविरुद्ध झगडावें लागत होतें. पण समाजव्यवस्था निर्माण झाली, जीवनावर सुधारणेचा मुलामा चढला आणि सामान्य मनुष्याची लढण्याची उपजत शक्ति मागें पडली. पण ही शक्ति हाच तर मानवी जीवनाचा आत्मा आहे! नाहीं कां?

काळोख पडल्यावर अभय टेंकडीवरून खालीं उतरूं लागला. मधेंच तो एका जागीं थांबला. दिवाळीच्या सुट्टीच्या आधल्या दिवशीं तो मालेबरोबर याच जागीं फिरायला आला होता—

दुसरीकडून टेंकडी उतरीत येणारी एक व्यक्ति अभयच्या अंगावरून घाईनें थोडी पुढें गेली. लगेच मागें वळून तिनें हांक मारली—

‘ अभय— ’

अभयनें आवाज ओळखला. मराठे मास्तर! आजच्या भित्र्या मेंढरांतला एक दुबळा प्राणी! तो स्तब्ध राहिला. मराठे जवळ येऊन म्हणाले—'मघाशीं मी घरीं गेलों होतों तुमच्या! पण तुमची बहीण म्हणाली कीं तुम्ही शाळेंतनं घरीं परत आलांच नाहीं. ते दत्तोपंत देशपांडेही तुमची वाट पहात बसले होते!'

अभय कांहींच बोलत नाहीं असें पाहून मराठे सद्गदित स्वरानें म्हणाले, 'अभय, तुमची क्षमा मागायला गेलों होतों मी घरीं!'

'माझी?'

'हो, तुमची!' त्याच्या खांद्यावर हात ठेवून मराठे उद्गारले. 'आज मी खरं बोलायला हवं होतं, तुम्ही अर्जांत लिहिलं होतं तें सारं खरं आहे म्हणून सांगायला हवं होतं! पण अभय, चाळिशी उलटलेला मॅट्रिक मनुष्य मी! घरीं थोरली मुलगी लग्नाची आहे! तिच्या पाठीवर चार कच्चींबच्चीं आहेत! मी खरं बोललों असतों तर—तर माझी ही नोकरी गेली असती! नि मग—अभय, क्षमा करा मला. घरांतल्या चिल्ल्यापिल्ल्यांची उपासमार होऊं नये म्हणून—'

मराठ्यांना पुढें बोलवेना. त्यांचा गळा दाटून आला. त्यांनीं तोंड फिरविलें. अंधारांतही ते अश्रू पुशीत आहेत हें अस्पष्टपणानें अभयला दिसलें!

अभयच्या डोळ्यांपुढें दत्तोपंतांचे अश्रु आणि आक्काचे अश्रु उभे राहिले. दत्तोपंत, आक्का, मराठे मास्तर—सारींच सज्जन माणसें! यांच्यावर प्रौढ वयांत अश्रु गाळण्याचा प्रसंग यावा?

मराठे मास्तरांचा हात हातांत घेऊन अभय चालूं लागला. मराठ्यांच्या घरापर्यंत तो त्यांना पोंचवायला गेला. त्याला नमस्कार करतां करतां मराठे म्हणाले, 'आतां वकिली सुरू करणार ना?'

'अं हं!'

'मग?'

'खेड्यापाड्यांतनं फिरणार आहें मी आधीं!'

‘कशाला ? ’ हा प्रश्न मराठे मास्तरांच्या जिभेवर आला होता. पण तो विचारण्याचा धीर त्यांना झाला नाहीं. मात्र रस्त्यानें जाणाऱ्या अभयची पाठमोरी आकृति अदृश्य होईपर्यंत ते तिच्याकडे आदरानें पाहत होते.

× × ×

मराठे मास्तरांच्या डोळ्यांतलें पाणी पाहून आक्काची आठवण झाल्यामुळेंच कीं काय मालेकडे जाऊन मग घरीं जावें असें अभयनें ठरविलें.

दारांतच मालेची आई उभी होती. ‘माला आहे का घरांत ? ’ या अभयच्या प्रश्नाला तिनें नेहमींप्रमाणें मानेनेंच होकारार्थी उत्तर दिलें. पण अशा मूक उत्तराच्या वेळीं तिच्या मुद्रेवर जें स्मित चमकून जात असे तें मात्र आज त्याला दिसलें नाहीं.

तो मालेच्या खोलींत गेला, तेव्हां ती झोपली आहे असें पाहून त्याला आश्चर्य वाटलें. पण खाटेजवळ गेल्यावर आश्चर्यापेक्षां थट्टाच अधिक प्रभावी झाली. तो म्हणाला, ‘आपण ज्यूनिअर बी. ए. त आहों हें दाखविण्यासाठीं एक माणूस वेळीं अवेळीं झोंपायला लागलंय् ! होय ना ? ’

माला झटकन् उठून बसली. तिच्या चेहऱ्यावरून ती खूप रडली असावी असें दिसत होतें. अभयकडे न पाहतां ती म्हणाली ‘आपण शूर आहों हें दाखवण्यासाठीं एक माणूस वेळीं अवेळीं भांडायला लागलंय् ! होय ना ? ’

हंसत खेळत अभय मालेशीं खूप वेळ बोलला तेव्हां कुठं त्याला मालेच्या या टोमण्यांतला अर्थ कळला. पांच वाजल्यानंतर हेडमास्तर दत्तोपंतांच्या घरीं आले होते. त्यांनीं अभयची निंदा केली, दुसऱ्या कुठल्याही शाळेंत त्याला आपण नोकरी मिळूं देणार नाहीं असें सांगितलें आणि असल्या डोक्यांत राख घालून घेणाऱ्या मूर्ख मनुष्याला तुम्ही आपली मुलगी देऊं नका असा दत्तोपंतांना मित्र या नात्यानें उपदेशही केला. हेडमास्तर निघून गेल्यावर दत्तोपंत आपल्या बायकोपाशीं अभयविषयीं जें बोलले तेंही सारें प्रतिकूलच होतें. ‘उद्यां वकील झाल्यावर कोर्टाशींही हा असाच भांडेल नि आपली सनद रद्द करून घेईल. असल्या माथेफिरू मनुष्याला मुलगी देऊन पस्ताव करीत बसण्यापेक्षां—’

पुढील हकीगत मालेनें अश्रूंनींच वर्णन केली.

अभयनें शाळेंत काय काय झालें तें मालेला गोड शब्दांनीं समजावून सांगितलें. पण कांहीं केल्या तिचें समाधान होईना. हेडमास्तरांची माफी मागून अभयनें पुन्हां शाळेंत जावें असें जेव्हां तिनें सुचविलें तेव्हां तर अभयला तिची कींवच आली. तो हंसत हंसत मालेला म्हणाला—' तूं तरुण आहेस असं वाटत होतं मला—'

मालेनें कृत्रिम कोपानें त्याच्याकडे पाहिलें. अभय म्हणाला ' मी मनाच्या तारुण्याविषयीं बोलत होतों. प्रत्येक तरुणीला आपला प्रियकर पराक्रमी असावा असं वाटतं ना ? '

मालेनें मान डोलावली. मात्र लगेच ती म्हणाली ' पण पराक्रमाला कांहीं काळवेळ आहे कीं नाहीं ? तुम्ही उद्यां एव्हरेस्टचं शिखर शोधायला निघाल —तसला पराक्रम नको बाई मला ! उगीच सुखाचा जीव दुःखांत घालायचा ! '

मालेच्या या युक्तिवादाला अभयनें कांहींच उत्तर दिलें नाहीं. पण त्याच्या मनांत आलें—उद्यां आपण बंगला बांधून त्याचे मजल्यावर मजले चढवूं लागलों, तर मालेला आपला अभिमान वाटेल. पण आपण एव्हरेस्टच्या मोहिमे-वर निघालों तर ? तर—

मालेचा निरोप घेऊन तो घराबाहेर पडला. समोरच धाकट्या भावंडांना घेऊन घरीं परत येत असलेली प्रमिला त्याला दिसली. तो दिसतांच ती लगब-गीनें पुढें येऊन म्हणाली ' तुम्हांला बक्षिस देणार आहे मी ! '

' मला ? कशाबद्दल ? '

' एक लढाई जिंकल्याबद्दल ! '

' कुठं ? '

' शाळेंत ! '

' बक्षिस तर दे आधीं, मग लढाई जिंकली कां हरली तें पाहूं ! '

' तर–तर–' म्हणत प्रमिलेनें त्याच्या हातावर लिमलेटची गोळी ठेवली. अभय थट्टेनें म्हणाला ' वाः ! काय उदार आहेस ग ! '

पांच वर्षांच्या आपल्या धाकट्या बहिणीकडे बोट दाखवीत प्रमिला म्हणाली. ' हिनं मला एकच गोळी दिलीन् ! ती न खातां मी तुम्हांला दिली ! माझ्यापाशीं आतां हजार रुपये असते तर तेही तुम्हांला दिले असते ! '

अभय कांहींतरी गमतीचें उत्तर देण्याच्या विचारांत होता. इतक्यांत प्रमिलेच्या धाकट्या बहिणीनें त्याच्या हातांत आपली गोळ्यांची पुडीच ठेवली.

× × × ×

शाळेच्या लहानशा जगांतल्या लहानशा चकमकीनें मालेनें घाबरून जावें आणि प्रमिलेनें त्याच प्रसंगाचें उत्साहानें स्वागत करावें, हा विरोध अभयला मोठा विलक्षण वाटला.

मधेंच त्याच्या मनांत आलें—लतेला हें कळल्यावर ती काय म्हणेल ? ती एखादी गोष्टसुद्धां लिहील या प्रसंगावर !

जेवण होईपर्यंत आक्का अभयशीं एक अक्षरही बोलली नाहीं. ही विचित्र शांतता वादळापूर्वीची आहे हें त्यानें ओळखलें. तो आंचवून बाहेर आला. टेबलावर कल्पलतेच्या गोष्टींची वही पडली होती. एखादी गोष्ट वाचावी म्हणून त्यानें ती उघडली. पण कुठल्याच पानावर त्याचें मन रमेना. मेघ, कालवा, कारंजे, झोंपाळा, फुलें, पक्षी—हें कुठलें तरी दूरचें सुंदर जग आहे असें त्याला वाटलें. तो स्वतःशींच म्हणाला ' आपल्या अनुभवाचं जग याच्याहून अगदींच निराळें आहे ! '

आक्का लवकर बाहेर आलेली पाहून अभयनें विचारलें ' इतक्यांत जेवण झालं तुझं ? '

' माझा उपास आहे आज ! '

' कसला ? '

' आहे एक ! गांधींच्यासारखा ! '

अभय स्तब्ध राहिला. आक्का बोलूं लागली. दुपारच्या प्रकरणाविषयीं दत्तोपंत तिच्यापाशीं खूप बोलून गेले असावेत ! अभय असाच वागत राहिला

तर मालेनें त्याच्याशीं लग्न करणें इष्ट होणार नाहीं असेंही त्यांनीं सूचित केलें असावें ! शेवटीं सद्गदित स्वरानें आक्का म्हणाली

‘ बाकीच्या मास्तरांचं वकीलपत्र कशाला घेतलंस तूं ? ’

‘ परवां वकिलीची परीक्षा पास झालों म्हणून ! ’

आक्काला थट्टेचा राग येत नाहीं असा अभयचा अनुभव होता. पण आज मात्र तो खोटा ठरला. ती स्तब्ध बसली. पण तिच्या कपाळावरल्या आंठ्या शब्दांपेक्षांहि अधिक बोलक्या होत्या.

अभयनें तिला दोन घांस खाण्याचा आग्रह केला. ‘ पुन्हां असल्या नसत्या भानगडींत पडणार नाहीं असं तूं वचन देशील तरच मी आतां तोंडांत पाणी घालीन ’ असें तिनें निक्षून सांगितलें.

क्षणभर थांबून अभय म्हणाला, ‘ आक्का, ही नसती भानगड नव्हती ! अन्यायाची चीड होती ती ! ’

‘ पण आपल्याला हव्यात कशाला या जगाच्या उठाठेवी ? ’

‘ आपण या जगांत आहोंत म्हणून ! ’

अभय अस्वस्थपणानें फेऱ्या घालूं लागला. मधेंच तो एकदम थांबला. टेबलावरल्या आपल्या वडिलांच्या फोटोकडे पाहत तो म्हणाला,

‘ आक्का, दादांचा फोटो मी गांधी, जवाहिरलाल, रॉय यांच्यासारख्यांच्या फोटोमधें ठेवला आहे तो उगीच नाहीं. मी त्यांचा मुलगा आहे याचा अभिमान वाटतो मला ! दादांचं नांव जगाला ठाऊक नाहीं ! पण--जगांतल्या जुलमाशीं, अन्यायाशीं, अधर्माशीं लढणारीं हीं जीं मोठीं माणसं आहेत त्यांची तळमळ आणि दादांच्या जीवाची तळमळ मला सारखीच वाटते. दादा कसे वारले हें मागं तूं मला सांगितलं होतंस ! आठवतं कां तुला ? दादा अर्धांगवायूनं वारले असं जग म्हणालं असेल. पण मी म्हणतों--त्यांना वीराचं मरण आलं. एक इन्स्पेक्टर शाळेच्या इमारतीचा उपयोग एका शिक्षकिणीचं शील भ्रष्ट करण्याच्या कामीं करणार आहे हें कळतांच ते बेभान झाले, त्याला बाहेर काढून इमारतीच्या किल्ल्या त्यांनीं आपल्या हातांत घेतल्या, त्या इन्स्पेक्टराला ती रात्र धर्मशाळेंत

काढावी लागली, आपला डाव फसला म्हणून त्यानं दादांच्यावर सूड उगवला. सत्यापेक्षां सत्तेची किंमत जगांत अजून अधिक आहे हें पाहून दादांना संतापाचा जो झटका आला तो अर्धांगवायु ठरला ! माझ्या डोळ्यांपुढं यांतलं प्रत्येक चित्र नेहमीं उभं राहतं नि म्हणतं—अन्यायाशीं लढणाऱ्या वीरपुरुषाचा तूं मुलगा आहेस—तूं—'

आपला आवाज चढला आहे हें आतां कुठें अभयच्या लक्षांत आलें. पुढें कांहीं न बोलतां तो टेबलाजवळ गेला आणि त्यानें दादांच्या फोटोला नमस्कार केला.

एक रबरी फुगा फुगवीत चारूनें अकस्मात प्रवेश केला नसता, तर अभय आणि आक्का यांना खोलींतली भीषण शांतता अगदीं असह्य झाली असती !

फुगा तोंडांतून काढून बोटांच्या चिमटींत धरीत चारु म्हणाला 'अभयदादा, फुगा कसा हो मोठा होतो ?'

'कुणी रे दिला तुला फुगा ?'

'एक नाहीं ! खूप खूप दिलेत ! हिरवा, पिवळा, जांभळा— '

'पण दिले कुणी तुला इतके फुगे ?'

'मोतिलाम मामांनीं.'

'मोतिलाम मामांनीं कीं, मोतिलाम काकांनीं ?'

चारु मोठ्यानें हंसला. आपण मोतिरामांना केव्हां तरी मामा आणि केव्हां-तरी काका म्हणतो. ही चूक अभयदादांनीं कशी बरोबर शोधून काढली असें त्याला वाटलें. हंसतां हंसतां त्यानें हातांतल्या फुग्यांतली हवा सोडून दिली.

फुगा अभयच्या हातांत देत तो म्हणाला—

'अभयदादा, खूप खूप मोठा करून द्या फुगा मला–अगदीं फुतबॉलएवढा !'

हातांतली ती सुरकुतलेली आणि मळकट रंगाची टीचभर रबरी पिशवी अभयनें तोंडाला लावली. हां हां म्हणतां तिला सुंदर आकार आला. मळकट रंगाचें गडद हिरव्या रंगांत रूपांतर झालें. फुगा बराच मोठा झाला होता. तो

चारूच्या हातांत देण्याकरितां अभय तोंडांतून बाहेर काढणार इतक्यांत चारु म्हणाला 'आनखी मोठा करा!'

अभयनें तो आणखी मोठा करण्याकरितां फुंकला मात्र! फट् असा मोठा आवाज होऊन तो फुटला! फुगा कुठें गेला हेंही चारूला कळलें नाहीं.

फुगा फुटतांच आक्का खिन्नपणानें हंसली. अभयला वाटलें—अभय हा सुद्धां आक्काच्या आयुष्यांतला असाच एक फुगा आहे असें तें हास्य आपल्याला उद्देशून म्हणत आहे.

चारूला दुसरा फुगा आणण्याकरितां अभयनें पाठविलें. पण तो परत आलाच नाहीं. दहा वाजायला आले होते. तेव्हां दुसरा फुगा घेऊन स्वारी आजोबांच्या अंथरुणांत पेंगळून पडली असावी असा अभयनें तर्क केला.

आक्का तुकारामाची गाथा घेऊन ती वाचूं लागली. तिला जेवायचा आग्रह करावा तर मघांचा वाद पुनः उकरून काढल्यासारखें होईल. ती जेवली नसतांना, आपल्यावरल्या प्रेमामुळें ती उपाशी राहिली असतांना, आपण तिला जेवायचा आग्रह न करणें हेंही अभयला कठीण वाटूं लागलें. एका विचित्र कात्रींत त्याचें मन सांपडलें. तो जागेवरून उठून म्हणाला, 'आक्का मी जरा फिरून येतों हं!'

मान वर न करतां आक्कानें हुंकार दिला.

दाराकडे जातां जातां अभयच्या मनांत आलें—परवां परीक्षेच्या निकालाच्या दिवशीं रात्रीं मला घरीं यायला उशीर झाला तेव्हां आक्काला पुण्यांत अलीकडे माणसांवर जे चोरटे हल्ले होत होते त्यांची आठवण झाली होती. पण आज? आज ती भीति कुठें आहे?

जिथें प्रीति असेल तिथेंच भीति असते! आपण आक्काच्या मनाविरुद्ध वागायला सुरवात केली म्हणून काय तिचें आपल्यावरलें प्रेम कमी व्हावें? तें प्रेम राखायचें म्हणजे—छेः! कुटुंबापेक्षां मानवता अधिक श्रेष्ठ आहे.

तो रस्त्यावर आला तेव्हां आपल्यापुढेंच एक पुरुष आणि एक स्त्री हंसत खिदळत चाललीं आहेत असें त्याला दिसलें. तीं कोण आहेत हें जाणण्याच्या

इच्छेनं नव्हे, पण भरभर चालायची संवय असल्यामुळें अभयनें लवकरच त्यांना गांठलें.

तो चकित झाला—कावेरी मोतिरामाबरोबर सिनेमाच्या गोष्टी बोलत चालली होती.

× × ×

लकडी पुलापाशीं आल्यावर अभय एकदम थांबला. खालच्या बाजूला तीन चिता पेटलेल्या दिसत होत्या! कठड्याला टेंकून तो त्यांच्या ज्वाळांकडे पाहूं लागला.

त्याला वाटलें—मेल्यावर प्रत्येक मनुष्याची मूठभर राख होते. पण मरणांतलें हें साम्य जीवनांत कुठें आहे? या तीन धडधडणाऱ्या चितांवर जीं तीन निष्प्राण शरीरें जळत आहेत, त्यांत वर्षानुवर्षें धडधडणाऱ्या हृदयांत काय काय भावना उचंबळून गेल्या असतील?

त्यानें पलीकडे पाहिलें. कर्वे रोडनें एक मोटार येत होती. तिच्या दिव्यांच्या प्रकाशानें त्याचें लक्ष वेधून घेतलें होतें.

त्याला वाटलें—कुणीतरी शोकीन श्रीमंत या मोटारींतून सिनेमाला चालला असेल! पण चाळीस वर्षांपूर्वी या वाटेनें हिंगण्याला चालत जाणारे कर्वे आणि हा मनुष्य यांच्या जीवनांत किती अंतर आहे!

मोटार निघून गेल्यावर अभय पुढें चालूं लागला. कोंपऱ्यावरून वळून तो कर्वे रोडनें पुढें गेला. अंधारांत दूरचें कांहींच त्याला दिसत नव्हतें. पण त्याला भास झाला—चाळीस वर्षांपूर्वी या रस्त्यानें जाणाऱ्या कर्व्यांचे पाय ज्यांना लागले होते असे धुळीचे कण अजून इथें आहेत. ते म्हणत आहेत—त्यावेळीं कर्व्यांचें कार्य मोठें आहे याची कितीशा लोकांना कल्पना होती? तत्कालीन कल्पनांशीं कलह करूनच त्यांना पुढें जावें लागलें. तुलाही तेंच केलें पाहिजें.

प्रगति म्हणजे सुखवाद आणि ध्येयवाद यांच्या युद्धांत रक्तबंबाळ झालेल्या ध्येयाला मिळणारा विजय!

अभय जवळजवळ अर्धा मैल चालला असेल! पुढून कुणीतरी धांवत येत आहे असा त्याला भास झाला. चोरट्या हल्ल्याविषयींची आक्काची भीति त्याला आठवली. तो सावध होऊन पाहूं लागला.

समोरून येणारें माणूस जवळ येतांच त्यानें मोठ्यानें विचारलें 'कोण आहे ?'

त्याच्या तोंडांतून हा प्रश्न बाहेर पडत असतांनाच आपल्यापुढें एक तरुणी उभी आहे हें त्याच्या लक्षांत आलें.

तिनें त्याच्या प्रश्नाचें कांहींच उत्तर दिलें नाहीं. मात्र असहायपणानें तिनें एकदम त्याच्या खांद्यावर मान टाकली. ती थरथर कांपत होती. तिची मुद्रा अभयला अस्पष्टच दिसली. पण तो एकदम आश्चर्यानें उद्गारला—

'कोण ? कल्पलता ?'

# १२

# अपुरें वाचलेलें पत्र

ती लताच होती. पण अभयच्या प्रश्नाचें उत्तर तिनें एका मोठ्या हुंदक्यानें दिलें. लगेच आपल्या थरथरणाऱ्या हातांनीं तिनें त्याला अधिकच घट्ट धरलें. ती फार भ्याली आहे हें अभयनें तत्काळ ओळखलें. त्याला वाटलें--कल्पनेच्या जगांत अष्टौप्रहर दंग होणारी ही श्रीमंत मुलगी अंधारांत फिरायला बाहेर पडली असावी. रजनीनें पृथ्वीला काळोखाची दुलई घालून निजविलें आहे, या पांघरुणावर तारकांचीं फुलें काढलेलीं आहेत, असल्या कल्पनांच्या तंद्रींत ही आपल्या बंगल्यापासून दूर आली असेल आणि कुणीतरी अनोळखी मनुष्य दिसल्याबरोबर भिऊन पळायला लागली असेल ! वर्तमानपत्रांत अपरात्रीं एकट्या दुकट्या माणसावर होणाऱ्या हल्ल्याच्या बातम्या हल्लीं प्रसिद्ध होत असतातच ! त्यामुळेंही हिच्या भीतींत भर पडली असेल !

झोंपेंत दचकून जाग्या होणाऱ्या मुलाच्या अंगावरून आई जसा मायेनें हात फिरविते, तसा अभयनें लतेच्या केंसांवरून आणि तिच्या पाठीवरून हात फिरवला. त्यानें मृदु स्वरानें विचारलें

‘ काय झालं लता ? ’

त्याच्यापासून दूर होत पण त्याचा हात हातांत घट्ट धरून ठेवीत लता म्हणाली

‘ भूत दिसलं मला ! ’

अभयला कांहीं केल्या हंसूं आवरेना. त्याला लतेनें लिहिलेल्या साऱ्या गोष्टी आठवल्या. एखादें तत्त्व प्रतिपादन करण्याकरितां, फार काय माणसाचें साधें दुःख सांगण्याकरतांसुद्धां निसर्गांतल्या चमत्कृतींचा आश्रय करणारी ही स्वप्नाळु मुलगी ! हिला अंधारांत भुतांचा भास व्हावा यांत अस्वाभाविक असें काय आहे ?

तिला वाईट वाटूं नये म्हणून आपलें हंसें आवरून तो म्हणाला ‘ चला, तुमच्या बंगल्यापर्यंत सोबत करतों मी तुम्हांला ! ’

लता कांहींच बोलली नाहीं. पण आपल्या हातांत असलेला तिचा हात पुन्हां कांपूं लागलेला आहे हें अभयला जाणवलें. तो तसाच पुढें चालूं लागला असता. पण लता एकदम म्हणाली

‘ तुमच्या घरीं चला ! ’

‘ माझ्या ? ’

‘ हो ! तुमच्याकडेच यायला मी निघालें होतें ! ’

‘ आतां ? ’

लता उत्तरली ‘ मुसळधार पाऊस कोसळत असता, विजा कडकडून पडत असल्या, तरी सुद्धां मी आत्तां एकटी तुमच्या घरीं येणार होतें ! ’

अभय मनांत म्हणत होता—या पोरीला वेडबिड तर लागलें नाहीं ना ? एवढ्या अपरात्रीं ही कुठें गेली म्हणून हिची आई काळजी करीत बसली असेल ! आणि ही मुलगी मात्र चारुदत्ताला भेटायला निघालेल्या वसंतसेनेप्रमाणें–

लतेची वसंतसेनेशीं तुलना करणाऱ्या आपल्या मनाला हंसत अभय म्हणाला—

‘ उद्यां सकाळीं मी बंगल्यावर येतों तुमच्या. मग हवं तितकं बोलत बसूं आपण ! ’

प्राण गेला तरी त्या घरांत पाऊल टाकणार नाहीं मी ! त्या नरकांत राहण्यापेक्षां— '

लता बोलूं लागली तेव्हां तिच्या आवाजांत चांगलाच कठोरपणा होता. पण दुसरें वाक्य पुरें व्हायच्या आधींच तिचा उसना धीर गळाला. ती स्फुंदूं लागली. तिच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले आहेत असेंही अभयला वाटलें. तो मनांत गोंधळून गेला होता. पण लतेला घरीं नेण्याखेरीज गत्यंतर नाहीं हेंही त्याला स्पष्ट दिसत होतें. घरीं गेल्यावर ती आक्कापाशीं मनमोकळें करून सर्व सांगेल असें त्यानें आपलें समाधान करून घेतलें.

तो चालूं लागला. त्यानें आपला हात लतेच्या हातांतून काढून घेण्याकरितां मागें घेतला. लताही त्याच्या बरोबरीनें चालूं लागली. मात्र त्याचा हात तिनें आपल्या हातांत अधिकच घट्ट धरून ठेवला.

लकडी पुलावर त्यांना टांगा मिळाला. टांगेवाला त्यांच्याकडे पाहून स्वतःशींच हंसला. चांदण्यांत फिरायला जाणारीं जोडपीं त्यानें पुष्कळ पाहिलीं होतीं. त्यामुळें अंधारांत फिरायला गेलेल्या या जोडीची त्याला मोठी मौज वाटली असावी ! चाबकानें घोड्याला चालण्याचा इषारा देतां देतां कुठल्यातरी बोलपटांतलें 'दुनिया एक तमाशा' हें गाणें स्वतःशींच गुणगुणायला त्यानें सुरुवात केली.

अभयनें टांगेवाल्याला नारायणपेठेंतून टांगा घ्यायला सांगितलें. लता याविषयीं कांहींतरी विचारील अशी त्याची कल्पना होती. पण ती कांहींच बोलली नाहीं. त्यानें तिच्या चेहऱ्याकडे पाहिलें. उन्हानें कोमेजून गेलेल्या नाजूक फुलासारखी तिची मुद्रा झाली होती. तापांत रोग्याला जशी ग्लानि येते, तशी गुंगी तिला आली होती. हिला इतका मनस्ताप होण्यासारखें काय घडलें असावें, याचा अभयला कांहींच तर्क करतां येईना.

केसरीकचेरीपाशीं त्यानें टांगा थांबविला. तो खालीं उतरला तेव्हां लतेनें आपल्याकडे पाहिलें असें त्याला वाटलें. पण तिच्याकडे लक्ष न देतां तो चटकन् पुढें झाला.

भय्याला आपल्या येण्याचें कारण सांगून दरवाजाच्या दिंडींतून आंत गेल्याबरोबर त्याच्या अंतःकरणांत कुतूहलाची एक प्रचंड लाट उचंबळली. लतेच्या घरीं टेलिफोनवर कोन येईल, लता आपल्या घरीं आली आहे असें सांगितल्याबरोबर तिच्या आईला काय वाटेल—

टेलिफोनच्या नंबराचा आंकडा जुळवितां जुळवितां त्याला वाटलें—वर्तमानपत्रांत लतेच्या घरचा टेलिफोन-नंबर आपण एकदोनदां वाचला होता खरा! पण स्मरणशक्तीवर इतका भरंवसा ठेवण्यापेक्षां आपण तिला तो आतां विचारला असता तर बरें झालें नसतें कां ?

फोनवर पहिल्यांदा कुणीच आलें नाहीं. नंतर जी व्यक्ति आली ती अशी खेंकसून बोलूं लागली कीं आपण नंबर चुकलों नाहीं ना अशी अभयला शंका आली! फोनवरून कांचन आपल्याशीं बोलत आहे अशी त्याची खात्री झाली तेव्हां कुठें त्याचा जीव खालीं पडला. पण लता आपल्याकडे आली आहे असें अभयनें सांगतांच विचित्र हास्य करून कांचननें त्याला जो प्रश्न केला तो ऐकून तो अधिकच गोंधळांत पडला. लता सुरक्षित आहे हें ऐकून कांचनला आनंद होईल अशी अभयची अपेक्षा होती. पण तो हंसून अभयला म्हणाला,—

'अरे गृहस्था, अशा किती पोरी पळविणार आहेस तूं? ती माला—ही वेडी लता—You are a lucky fellow'

× × ×

घरीं येऊन लतेला अंथरुणावर निजवून आणि आपल्याबरोबर या वेळीं ती कशी आली हें हळूच आक्काच्या कानांत सांगून अभय बाहेर टेबलापाशीं येऊन बसला. पण अजून कांचनचे ते विचित्र शब्द त्याच्या कानांत घोळत होते—'अरे गृहस्था, अशा किती पोरी पळविणार आहेस तूं?'

अभयच्या मनांत आलें—स्वतःच्या बहिणीविषयीं असले प्रलाप काढणाऱ्या या कांचनला कांहीं माणुसकी आहे कां? छेः! मनुष्य इंग्लंडला जाऊन येवो नाहींतर सुधारणेची दुसरी कांहीं सफेती फांसो, त्याचा रानटीपणा कांहीं कमी होत नाहीं!

पलीकडच्या खोलींत लतेच्या अंगावरून हात फिरवीत आक्का तिच्याशीं हळुहळुं कांहीं बोलत होती. अभयला ती काय बोलत आहे तें ऐकूं येत नव्हतें.

पण बसलेल्या जागेवरून त्याला लतेचें नुसतें तोंड दिसत होतें. तिच्या विशाल डोळ्यांत अजूनही भीतीची छाया होती. तिच्याकडे पाहतां पाहतां अभयला मघाशीं तिनें आपल्याला किती घट्ट धरलें होतें याची आठवण झाली. त्या स्पर्शाची स्मृति एखाद्या मधुर गाण्याच्या ध्रुपदासारखी त्याच्या मनांत घोळूं लागली. लगेच त्यानें टेबलावरलें एक पुस्तक हातांत घेतलें. पलीकडेच लतेच्या गोष्टींची वही पडली होती. तिच्याकडे लक्ष जातांच त्यानें पुस्तक खालीं ठेवलें आणि ती वही घेऊन हाताला येईल तें पान उघडलें. त्या पानावरल्या गोष्टींच्या नांवांत लता हा शब्द होता म्हणूनच कीं काय अभय ती उत्सुकतेनें वाचूं लागला—

## वृक्ष, लता आणि बांडगूळ

एका वृक्षावर कितीतरी दिवस एक बांडगूळ वाढलें होतें. त्या झाडाचें आपल्याला मिठी मारून बसलेल्या या बांडगुळावर फार प्रेम होतें. या प्रेमाच्या बळावर आपण आपला विकास करून घेऊं असें त्याला नेहमीं वाटे.

पण कांहीं केल्या त्या वृक्षाची वाढ होईना. सूर्याचे किरण त्याच्या हातांत हात घालून गात, पर्जन्याच्या धारा त्याच्या अंगावरून स्वारीप्रमाणें नाचत जात, वसंत ऋतु त्याला मुरली वाजून आनंदित करी; पण त्या झाडाला कधींही एक सुद्धां फळ लागलें नाहीं.

एके दिवशीं त्याला स्वप्न पडलें. स्वप्नांत एक साधु त्याला म्हणत होता—हें बांडगूळ तुझा जीवनरस शोषून घेत आहे. त्याच्या पाशांतून मुक्त झाल्यावांचून तुझा विकास होणार नाहीं !

बांडगुळाला दूर फेंकून देऊन वृक्ष एकटाच राहिला. तो उंच उंच होत गेला, वाढत्या पर्णभारामुळें तो मेघाच्छादित आकाशासारखा दिसूं

लागला, मेघखंडांतून सायंकालाच्या विविध रंगांच्या छटा दिसाव्यात त्याप्रमाणें त्याच्या पानांतून रंगीबेरंगी फळें डोकावूं लागलीं. त्याला वाटलें—आपल्या जीवनाचें सार्थक झालें !

पण फळांचा हंगाम लवकरच संपला. हिवाळ्यांत सारीं पानेंही झडून गेलीं. पुन्हा तो वृक्ष एकटाच राहिला. आपला अजून पूर्ण विकास झाला नाहीं अशी त्याची खात्री झाली. त्यानें दुःखानें डोळे मिटून घेतले.

कसल्या तरी मृदु स्पर्शानें अंग पुलकित होऊन त्यानें डोळे उघडले. बांडगुळानें पुन्हां आपल्याभोंवतीं पाश टाकले आहेत असा त्याला भास झाला. पण त्याचें शरीर म्हणत होतें—छेः ! बांडगुळाच्या स्पर्शांत ही मृदुता नव्हती, ही मोहकता नव्हती, स्वतःचा विसर पाडण्याची ही मोहिनी नव्हती.

काय व्हायचें असेल तें होवो म्हणून त्यानें पुन्हां डोळे मिटून घेतले.

पण लवकरच त्यानें ते हांसत उघडलें. कुठून तरी मोठा मधुर, मोहक सुगंध येत होता. त्या सुगंधामुळें होणारा विलक्षण आनंद त्या वृक्षानें पूर्वीं कधींच अनुभविला नव्हता.

त्यानें पाहिलें—आपल्याला बाहुपाशांत बद्ध करणाऱ्या रमणीच्या नाजुक हातांत फुलेंच फुलें फुललीं आहेत !

त्यानें त्या मोहिनीला विचारलें—‘ तुझं नांव काय ? ’

‘ लता. ’

तिच्या मृदु बाहुपाशांत ब्रम्हानंद भरला आहे याची आतां त्याला खात्री झाली. त्यानें फुलांकडे पाहत प्रश्न केला—तुझ्या या फुलांचं नांव काय ? '

गोष्टींतल्या लतेचें उत्तर अभय वाचणार इतक्यांत आक्का त्याच्याजवळ येऊन उभी राहिली. तिनें खुणेनेंच लतेचा डोळा लागला आहे असें त्याला सुचविलें. लतेकडून काढून घेतलेली सगळी हकीगतही तिनें मोजक्या शद्बांत व हलक्या आवाजांत सांगितली. लता, कांचन, लतेची आई व तिचे मामा हीं सारी मंडळी दुपारीं लांब कुठें वनभोजनाला गेलीं होतीं. तिथें संध्याकाळपर्यंत तीं राहिलीं. रात्र पडल्यावर तीं परत यायला निघालीं. मोटारींतच तिच्या आईचें डोकें फार दुखूं लागलें. घरीं आल्याबरोबर ती आपल्या खोलींत जाऊन निजली. लता कांहींतरी वाचीत दिवाणखान्यांत बसली. कांचन आणि तिचे मामा एका बाजूच्या खोलींत मोठ्या रंगांत येऊन गप्पागोष्टी करीत बसले होते—

आतां आपल्याला कांहींतरी विलक्षण ऐकायला मिळणार अशा कल्पनेनें अभय अधीरतेनें आक्काकडे पाहूं लागला. पण तिच्यापाशीं सांगण्यासारखें कांहींच नव्हतें. एवढी हकीगत सांगून होतांच लतेला एकदम रडें कसें कोसळलें याचेंच तिनें वर्णन केलें. लतेनें आक्काला सांगितलेल्या गोष्टींत असें रडण्यासारखें काय आहे हें अभयला कळेना.

मोटारीच्या हॉर्नचा आवाज ऐकूं आला. अभय बाहेर येऊन पहातो तों कांचन मोटारींतून खालीं उतरत होता. धाडकन् दार लावीत तो अभयला म्हणाला—' काढलं कीं नाहीं तुमचं घर शोधून ? मामांनीं मला कुठं गिरणींत नोकरी दिली नाहीं, तरी सरकारला मला सी. आय्. डींत घ्यावंच लागेल. नाहीं कां ? '

कांचन आपल्याशीं मोठ्या रागानें बोलायला सुरुवात करील अशी अभयची कल्पना होती. त्यामुळें त्याचें हें खेळीमेळीचें बोलणें ऐकून तो स्तिमित झाला. तो कांहींच बोलत नाहीं असें पाहून कांचन म्हणाला—' अगदीं मास्तर आहांत बुवा ! असे घाबरून काय गेलांत ? तुम्ही लतेला पळवलीत अशी पोलिसांत

फिर्याद गुदरून कांहीं इथं आलों नाहीं मी ! तुमची आमची गांठ दत्तोपंतांच्या घरीं पडली होती ना ? त्यांच्या घरीं गेलों, त्यांना तुमचा पत्ता विचारला, माला जागी झाली होती, तिला तुमच्या आजच्या या पराक्रमाची माहिती सांगितली, आणि सत्तर मैल स्पीडनं इकडं धांवत आलों. हो, आमची लता म्हणजे महाकवि आहे ! केव्हां कुठं भरारी मारील याचा नेम नाहीं. आहेना अजून तुमच्या घरांत ? कीं—'

कांचन मोठ्यानें हंसला. पण त्याच्या बोलण्यामुळें अभयच्या मनांत उत्पन्न झालेला उद्वेग या हंसण्यानें अधिकच वाढला. वेड्यावांकड्या खडकांनीं भरलेल्या, नांवालासुद्धां हिरवळ नसलेल्या एखाद्या रुक्ष डोंगरावर चढतांना मन जसें अप्रसन्न होतें, तशी कांचनचें हें बोलणें ऐकतांना त्याची स्थिति झाली.

तो मुकाट्यानें पुढें चालूं लागला. कांचनही त्याच्यामागून गेला. लतेच्या खोलींत जातांच ती झोपेंत हंसत आहे हें पाहून दोघांनाहीं आश्चर्य वाटलें. अभयनें तिच्या उशाजवळ जाऊन हांक मारली—'लता—'. पुढें बाई म्हणावें असें त्याच्या मनांत आलें. पण आपल्या तोंडांतून तो शब्द कां बाहेर पडला नाहीं हें त्याचें त्यालाही कळलें नाहीं.

लतेनें डोळे उघडले नाहींत. पण आपला उजवा हात हळूच उचलून ती कांहींतरी शोधूं लागली. तिला हवें होतें तें न मिळाल्यामुळेंच कीं काय तिच्या मुद्रेवरलें स्मित एकदम मावळलें. इतक्यांत कांचननें मोठ्यानें हांक मारली— 'लता—'

लता एकदम खडबडून जागी झाली. कांचन समोर दिसतांच ती गडबडून उठली. पण अभयकडे लक्ष जातांच तिला धीर आला. तिनें शांतपणानें कांचनला विचारलें 'केव्हां रे आलास दादा ?'

बहीणभावंडांचें संभाषण मनमोकळेपणानें व्हावें म्हणून अभय हळूच बाहेर आला. खोलीबाहेर आल्यावर त्यानें दारही ओढून घेतलें.

तो अस्वस्थपणानें फेऱ्या घालूं लागला. आक्का तुकारामाचा गाथा घेऊन ती वाचीत टेबलाजवळ उभी आहे हें आतां त्याच्या लक्षांत आलें. तिनें त्याच्याकडे एकदां पाहिलें आणि पुन्हां आपली दृष्टि पुस्तकावर लावली. पण

आक्काच्या त्या पाहण्याचा अर्थ अभयच्या लक्षांत आला. आयुष्यांत तूं किती भांडणें करणार आहेस कुणाला ठाऊक असेंच जणुं कांहीं ती डोळ्यांनीं बोलली होती.

कांचन आणि लता यांचें संभाषण पहिल्यांदा अगदीं हलक्या आवाजांत चाललें होतें. पण हळुहळु दोघांचेही आवाज मोठे होऊं लागले. मग 'आई,' ' मामा, ' ' वेडी आहेस तूं ! ! ' जग असंच आहे ' हे कांचनचे शब्द अभयला अगदीं स्पष्ट ऐकूं येऊं लागले. ' मी नाहीं त्या नरकांत येणार ! ' असें कांहीं तरी लता बोलली असेंही त्याला वाटलें. लगेच ' मामा मुंबईला निघूनसुद्धां गेले. आतां काय त्याचं ? ' हे कांचनचे शब्द त्याच्या कानांवर पडले. आतां लता काय उत्तर देते हें ऐकण्याकरितां तो उत्सुक झाला. तिच्या उत्तरांतून आजच्या या कोड्याचा थोडा तरी उलगडा होईल अशी त्याची कल्पना होती.

पण लतेच्या उत्तराऐवजीं ' अभय, अभय ' म्हणून कांपऱ्या स्वरानें पण मोठ्यानें मारलेल्या हांका त्याला ऐकूं आल्या. कावेरी आपल्याला हांका मारीत आहे हें तत्काळ त्यानें ओळखलें. हातांतला गाथा बाजूला ठेवून आक्काही कावऱ्या बावऱ्या नजरेनें दरवाजाकडे पाहूं लागली होती. कावेरीच्या बिऱ्हाडांत चोर शिरला असावा असें वाटून अभय धांवतच बाहेर गेला. आक्काही त्याच्या मागून गेली.

कावेरी थरथर कांपत आपल्या दारांत उभी होती. अभयनें 'काय झालं ?' असं विचारतांच ती रडूं लागली. अभय तसाच पुढें गेला. आजोबांच्या खोलीच्या दारांत घाबरून उठलेला चारु रडत उभा होता. पण आजोबा कांहीं तिथें दिसले नाहींत. अभय लगेच पुढें गेला. कावेरीच्या खोलीच्या दाराकडे त्याची दृष्टि गेली मात्र—

तिथें आजोबा बेशुद्ध होऊन पडले होते. त्यानें वांकून 'आजोबा, आजोबा' म्हणून त्यांच्या कानापाशीं मोठ्यानें हांका मारल्या. पण त्या हांकांचा कांहीं उपयोग झाला नाहीं.

त्याच्या मागून आलेल्या आक्काचें लक्ष आजोबांच्या डोक्याकडे गेलें. खोलीच्या उंबऱ्यावर डोकें आपटल्यामुळें त्यांना मोठी खोंक पडलेली दिसत होती.

आक्का लगेच खाली बसली. 'चांगलंसं फडकं घे रे' हे तिचे शब्द ऐकतांच अभयनें आपली नजर खोलींत सर्वत्र फिरविली. समोरच कावेरीचें अंथरुण पसरलेलें दिसत होतें. तिच्या उशीवर पांढरा हातरुमाल आहे असें वाटून अभय तो आणण्याकरितां पुढें गेला. तो हातरुमाल उचलतां उचलतां त्याचें लक्ष जवळच पडलेल्या दुसऱ्या एका रंगीबेरंगी हातरुमालाकडे गेलें. अभयला एकदम आठवण झाली—तो हातरुमाल मोतिरामाच्या हातांत त्यानें पाहिला होता. लतेला घेऊन मोतिराम त्याच्याकडे आला होता त्या दिवशीं तो हातरुमाल त्याच्यापाशीं होता.

आजोबांच्या खोंकेचें रक्त पुसतां पुसतां अभयला एका प्रश्नानें अगदीं सतावून सोडलें—'मोतिरामाचा हातरुमाल कावेरीच्या अंथरुणांत कसा आला?'

× × × ×

चारूनें मोतिरामापाशीं या हातरुमालाचा हट्ट धरला असेल, त्यानें तो चारूला दिला असेल, आणि चारु जरी आजोबांजवळ निजत असला तरी झोंपण्यापूर्वी आईच्या अंथरुणांत हा हातरुमाल घेऊन तो खेळत बसला असेल, अशी अभयनें आपल्या मनाची समजूत घातली. पण पायांतला कांटा सुईनें टोंकरून काढला तरी तिथें कांटा आहेच असें वाटत असतें. तशीच कांहींशी अभयच्या मनाची स्थिति झाली.

आक्काला बेशुद्ध आजोबांच्याजवळ बसवून डॉक्टरांना आणण्याकरितां तो परत आपल्या बिऱ्हाडीं आला.

त्याला लतेची आठवण झाली. अंगांत कोट चढवून त्यानें खोलीकडे पाहिलें. आंतून कुणाचाच आवाज ऐकूं येत नव्हता. त्याला शंका आली—लतेला मारून बिरून तर कांचन निघून गेला नसेल ना? दार उघडून काय झालें आहे तें पहावें असा विचार त्यानें केला. तो पुढें जाणार तों कांचनच दार उघडून बाहेर आला.

अभयनें अंगांत कोट चढविलेला पाहून कांचनला आश्चर्य वाटलें असावें. त्यानें हंसत विचारलें—'कुठं फिरायला निघालांत कीं काय?'

'छेः! डॉक्टर आणायला!'

‘ डॉक्टर ? कुणासाठीं ? ’

‘ पलीकडच्या बिन्हाडांतले आजोबा एकदम बेशुद्ध झाले आहेत ! त्यांच्या घरीं पुरुषमनुष्य कुणी नाहीं. तेव्हां—’

‘ तेव्हां मी डॉक्टर घेऊन येतों. अगदीं सत्तर मैलांच्या स्पीडनं जातों नि येतों. मग तर झालं ? ’

हां हां म्हणतां कांचन बाहेर गेला. अभय त्याच्याकडे पाहतच राहिला. कांचनच्या अंगीं इतकं सौजन्य असेल अशी त्याची कल्पना नव्हती.

लता काय करीत आहे हें पाहण्याकरितां तो खोलीच्या दारांत जाऊन उभा राहिला. उशींत डोकें खुपसून ती स्फुंदून स्फुंदून रडत होती. तिच्या पुढें एक पत्र पडलेलें दिसत होतें.

सहानुभूति आणि कुतूहल यांनीं अभयचें मन अगदीं भारावून गेलें. लतेच्या जवळ बसून तो म्हणाला, ‘ लता, लता— ’

त्याच्या प्रेमळ स्वरानें तिला आपलें दुःख अधिकच असह्य झालें. ती मुसमुसून रडूं लागली.

तिच्या खांद्यावर हळूच हात ठेवून अभय म्हणाला—‘ लता, काय झालंय् तें तरी सांग मला ! ’

दोन्ही हातांनीं आपलें तोंड झांकून घेत लता उद्गारली ‘ काय सांगूं ? ’

तिचें सांत्वन कसें करावें हें अभयला कळेना. लतेच्या दुबळेपणाविषयींही त्याला वाईट वाटलें. त्याच्या मनांत आलें—ही रडवी मुलगी आपल्या गोष्टींतल्या रूपकांतून मोठींमोठीं तत्त्वें कशी मांडते कुणाला ठाऊक !

लतेनें कष्टानें मान वर उचलली, आपले डोळे पुसले आणि समोर पडलेलें पत्र उचलून तें अभयच्या हातांत देत ती म्हणाली.

‘ हें वाचलंत तर तुम्हीं सुद्धां माझ्यासारखे रडायला लागाल ! ’

अभयने त्या पत्राखालची सही पाहिली—**तुझी आई.**

त्याला वाटलें—आईनें लतेला घरीं परत बोलावलें असावें. ही कांचनचें ऐकणार नाहीं म्हणून तिनें मुद्दाम पत्र लिहून तें त्याच्याकडे दिलें असावें. या

कल्पक मुलीला राईचा पर्वत करायची संवय झाली असल्यामुळें आईनें रागानें लिहिलेल्या चार शब्दांनींच ही ओक्साबोक्शीं रडायला लागली आहे !

मनांतल्या मनांत लतेला हंसतच त्यानें पत्र वाचायला सुरुवात केली. पण पहिलें वाक्य वाचतांच त्याच्या मनाची मोठी चमत्कारिक स्थिति झाली. पत्राचा आरंभच किती विचित्र होता !

‘ लता,

मी तुझी आई नाहीं. तुझी पूर्वजन्मींची वैरीण आहे.

नाहीं, मी तुझी आईच आहे. मी आई नसतें तर तूं घरांतून निघून गेलीस म्हणून अशी तडफडली नसतें—’

कावेरी धांवत धांवत येऊन म्हणाली—

‘ आक्कांनीं बोलावलंय् तुम्हांला ! मामंजी कसंसंच करताहेत ! ’

पत्र लतेच्या हातांत परत देऊन अभय उठला.

# १३

## दोन मोतीं

डॉक्टर येईपर्यंत अभय आणि आक्का यांना प्रत्येक क्षण युगासारखा वाटत होता. चारूनें 'आजोबा बोलत कां ग नाहींत?' असें दीनवाण्या मुद्रेनें आक्काला विचारलें, तेव्हां त्याला पोटाशीं धरून त्याच्या प्रश्नाचें उत्तर तिला अश्रूंनींच द्यावें लागलें. पलीकडे कोंपऱ्यांत कावेरी बसली होती. आतां तिच्या डोळ्यांतून अश्रु वाहत नव्हते. पण तिच्या मुद्रेवर प्रेतकळा आली होती. तिच्याकडे पाहून अभयला वाटलें--ही मोकळेपणानें रडेल तर बरें होईल.

मानेची शीर अवघडली म्हणजे धड वर पाहतां येत नाहीं, बाजूला बघतां येत नाहीं, खालींही एकसारखं बघवत नाहीं. डॉक्टर येईपर्यंत सर्वांचीं मनें अशींच अवघडून गेलीं होतीं. डॉक्टर आल्यावर अभयला हायसें वाटलें. खोलीच्या दारांत अगदीं मंद स्वरांत त्यानें कांचनचें मनःपूर्वक आभार मानले.

डॉक्टरांनीं आजोबांना अर्धांगाचा भयंकर झटका आला आहे असें सांगतांच सर्वांच्या मुद्रा हताश झाल्या. डॉक्टर अभयजवळ येऊन विचारूं लागले—'यांना विलक्षण संताप येण्यासारखं कांहीं झालंय् कां?'

या प्रश्नाचें अभय काय उत्तर देणार ? त्यानें कावेरीकडे पाहिलें. कावेरीनें खालीं दृष्टि वळवली. डॉक्टर सांगत असलेले उपचार ऐकून अभयनें कावेरीकडे पाहिलें. ती पदरानें डोळे पुशीत होती.

कांचननें अभयला डॉक्टरांच्याबरोबर दवाखान्यांत नेऊन पोंचविलें. ‘ मी टांगा करून घरीं जाईन ’ असें अभयनें म्हटलें तरी औषध तयार होईपर्यंत तो बसून राहिला. अभयला गाडींतून घरीं पोंचवून जातां जातां तो म्हणाला--

‘ लतेचा कांहीं घरीं परत यायचा बेत दिसत नाहीं. तिचे कपडे वगैरे उद्यां पाठवून देतों ! ’

असल्या रुक्ष बोलण्याचा अभयला एरवीं तिरस्कार वाटला असता ! पण आतां त्याच्या मनांत आलें—कांचन कांहीं उलट्या काळजाचा मनुष्य नाहीं ! मात्र त्याला आपल्या बहिणीविषयीं फारसें प्रेम नाहीं हें उघड आहे. असें कां बरें व्हावें ? छेः ! प्रत्येक मनुष्य हें सहजासहजीं न सुटणारें कोडें असावें असाच सृष्टीचा संकेत आहे कां ?

आजोबांची दांतखिळी उघडून अभयनें त्यांच्या तोंडांत औषध घातलें आणि लता कदाचित् अजूनही रडत बसली असेल असें वाटून तो आपल्या बिऱ्हाडांत आला.

मघाशीं कांचनविषयीं विचार करतांना त्याला प्रत्येक मनुष्य हें सहजासहजीं न सुटणारें कोडें आहे असें वाटलें होतें. आतांही लतेला पाहून तोच विचार त्याच्या मनांत आला. ती ऐटीनें त्याच्या खुर्चीवर बसली होती, तिच्यापुढें गोष्टींची वही पडली होती आणि ती त्या वहींत कांहींतरी लिहीत होती. अभयची चाहूल लागतांच तिनें मान वर करून पाहिलें. हंसत हंसतच ती खुर्चीवरून उठली आणि अभयपुढें वही करीत म्हणाली ‘ कित्ती कित्ती छान गोष्ट लिहिली आहे मी आतां ! ’

अभय विस्मयानें वाचूं लागला—

## हंसाचा चारा.

एका तळ्यांत एक सुंदर हंस राहत होता. त्या तळ्यांत खूप कमळें फुलत. फुललेल्या कमळांतले तंतु खाऊन तो हंस डौलानें पोहत राही.

हळुहळु त्याला पाहण्याकरितां लोक येऊं लागले. एखाद्या यात्रे-प्रमाणें त्या तळ्याच्या कांठीं गर्दी जमूं लागली. तळ्याभोंवतालच्या झाडींत राहणाऱ्या कावळ्यांना हंसाच्या या कीर्तीचा हेवा वाटूं लागला. त्यांतला एक म्हातारा कावळा त्या हंसाला म्हणाला ' तूं कितीही डौल मिरविलास तरी चिखल खाल्ल्याशिवाय तुझं एक दिवस सुद्धां चालत नाहीं ! '

हंसानें रागानें त्या कावळ्याकडे पाहिलें. कावळ्यानें तो चिखल खातो हें तर्कशास्त्रानें सुद्धां सिद्ध होईल असें सांगितलें. चिखलावांचून कमळ उगवत नाहीं, तेव्हां कमळांतल्या तंतूंत चिखल असलाच पाहिजे असें त्याचें म्हणणें पडलें.

हंसानें बिसतंतु खाण्याचें सोडून दिलें. हंस झिजून झिजून लवकरच मरणार या आनंदांत सर्व कावळे दंग होऊन गेले.

पण हंसानें आपलें खाणेंपिणें सोडून दिलें आहे, ही बातमी ऐकतांच त्याला पाहण्याकरितां पूर्वीपेक्षांहि अधिक लोक येऊं लागले.

त्यांत एक राजाही होता. त्याला तो हंस फारफार आवडला. राजवाड्यांत येण्याविषयीं तो हंसाचें मन वळवूं लागला.

हंस म्हणाला, ' मी येईन, पण बिसतंतु खाणार नाहीं ! '

राजा हंसत उद्गारला ' मी तुला मोत्यांचा चारा देईन. मग तर झालें ? '

राजा हंसाला घेऊन निघून गेला. तो गेल्यावर कावळ्यांना वाटूं लागलें.—हंस इथें होता तेंच बरें होतें. त्याला पहायला खूप लोक येत.

ते इथेंच तळ्याच्या कांठीं फराळ करीत. त्यामुळें दररोज आपल्याला मिष्टान्न तरी मिळत होतें ! आतां—

हंसानें तळ्यांत परत यावें म्हणून त्याच्याकडे एक शिष्टमंडळ पाठवावयाचें कावळ्यांनीं ठरविलें.

राजवाड्याभोंवतीं पुष्कळ कावळे कावकाव करीत आहेत असें पाहून रक्षकांनीं भराभर गोफणी फिरवायला सुरवात केली. जिवाच्या भीतीनें उडून जाणाऱ्या त्या कावळ्यांनीं एकदांच मागें वळून पाहिलें—राजवाड्याच्या गच्चीवर एका सुंदर सोनेरी पिंजऱ्यांत हंस मोत्यांचा चारा खात होता.

× × × ×

ही गोष्ट वाचतांना अभयला लतेचें मन हें एक मोठें गूढ आहे असें तर वाटलेंच. पण दुसरे दिवशीं तर हा विचार त्याच्या मनांत अधिकच बळावला. आजोबा बेशुद्धच होते. त्यांच्यापाशीं अभय आणि आक्का आळीपाळीनें बसत. दुपारीं जेवायच्यावेळीं ‘लता थोडा वेळ तिथं बसेल. तूं पड आतां जरा!’ असें अभयनें थट्टेनें आक्काला म्हटलें, तेव्हां अंग शहारल्यासारखें करून लता म्हणाली ‘तेवढं सांगूं नका मला! हवं तर त्या चारूला चार गाणीं म्हणून दाखवतें!’ कावेरीपाशीं घटकाभर बोलत बसणेंसुद्धां तिला कठिण वाटलें हें पाहून तर अभयला मोठाच अचंबा वाटला.

तिच्या या विचित्रपणांत अभयच्या दृष्टीनें आणखी एक भर पडली. ती म्हणजे त्याला राहून राहून होणारी तिच्या आईच्या पत्राची आठवण. लतेसारखी मुलगी अपरात्रीं घरांतून बाहेर पडते काय, आपल्यासारख्या साधारण ओळखीच्या मनुष्याच्या घरीं येते काय, तिची आई लगेच तिला एक लांबलचक पत्र पाठविते काय, सारेंच विलक्षण होतें. आणि त्यांतही त्या पत्राचा आरंभ काय साधासुधा होता? ‘मी तुझी आई नाहीं, तुझी वैरीण आहे,’ असें एखादी आई आपल्या

मुलीला सुखासुखी सांगेल कां? अभयचें मन एकसारखें म्हणत होतें—छेः! त्या पत्रामागें कांहींतरी मोठें रहस्य असलें पाहिजे!

पण हें रहस्य जाणण्याला अभय कितीही उत्सुक झाला असला तरी लता तें सांगायला मुळींच उत्सुक नव्हती असें दिसलें. दोन तीनदां आडानें लतेची आई तिची काळजी करीत असेल असें बोलून दाखविलें. तेव्हां लता हंसून म्हणाली 'मी इथं आहे तोंपर्यंत कांहीं आईला काळजी नाहीं. आपली पोरगी सिनेमांत पळून जाईल या एका गोष्टीचंच काय तें तिला भय वाटतंय्!'

तिचें हें बोलणें ऐकून कालचें लतेच्या घरचें भांडण तिनें सिनेमांत जावें कीं नाहीं याविषयीं असावें अशी अभयला शंका आली. पण लगेच तिनें आपल्या घराला नरक म्हटलें होतें हेंही त्याला आठवलें. तो अगदीं गोंधळून गेला.

आणि त्याच्या मनाचा गोंधळ वाढावा अशाच गोष्टी प्रत्येक दिवशीं घडून येऊं लागल्या.

आजोबा तर अंथरुणावर निपचित पडून होते--ते शुद्धीवर येतील कीं नाहीं याची डॉक्टरांनाही शंकाच होती. छोटा चारु त्यांच्या उशापाशीं जाऊन जेव्हां त्यांच्या भेसूर चेहऱ्याकडे घटकान् घटका पाहत राही तेव्हां अभयच्या मनांत विलक्षण कालवाकालव होई. पण त्या बालकाचें मरणाविषयींचें अज्ञान आणि आपल्या भोंवतालच्या मोठ्या माणसांचें जीवनाविषयींचें अज्ञान हीं दोन्हीं सारखींच आहेत, हें जेव्हां त्याला दिसून आलें तेव्हां त्याच्या अंतःकरणांतला उद्वेग अधिकच वाढला.

दोनतीन दिवसांत दत्तोपंत दोनतीनदां त्याच्याकडे आले. तोंडी क्षमा मागितली तरी हेडमास्तर तुम्हांला पुन्हां शाळेंत घेतील असें त्यांनीं प्रत्येक वेळेला त्याला या नाहीं त्या पर्यायानें सुचविलें. त्याच्या स्नेह्यांपैकींही बहुतेकांनीं पाण्यांत रहायचें तर माशाशीं वैर करून चालत नाहीं असेंच त्याला जाणवलें. अभयला सर्वांत मौज वाटली ती डॉ. देशमुखाच्या बोलण्याची! 'कुंकू' चित्रपटाच्यावेळीं त्याचा विषय फार जुना आहे म्हणून नाक मुरडणाऱ्या या गृहस्थानेंसुद्धां त्याला माफी मागण्याचा सल्ला दिला. डॉक्टर आणि वकील यांचे धंदे

पूर्वीसारखे चालत नाहींत. तेव्हां अभयनें ही हातांतली नोकरी सोडूं नये असें त्यानें अगदीं जीव तोडून सांगितलें.

असले सल्ले ऐकतां ऐकतां अभयचें मन कसें कोंडल्यासारखें होऊन गेलें. पण आपण चोवीस तास आजोबांची शुश्रुषा करीत बसतों हें आक्काला आवडत नाहीं हें जेव्हां त्याच्या लक्षांत आलें, तेव्हां तर त्याच्या या कोंडमाऱ्याचें रूपांतर दुःखांत झालें. भावावरून जीव कुरवंडून टाकणारी, देवाधर्मावर विश्वास असणारी, दररोज नियमानें तुकोबाची गाथा वाचणारी आपली आक्का ! पण तिच्यासुद्धां जीवनाच्या कल्पना इतक्या संकुचित असाव्यात याचें त्याला अत्यंत वाईट वाटलें. आजोबा अंथरुणाला खिळून तीन चार दिवस झाल्यानंतर आक्कानें त्याला एकच प्रश्न विचारला होता--' तूं जन्मभर आजोबांच्या बिछान्यापाशींच बसून राहणार कां ? ' एखादें धार असलेलें हत्यार क्षणार्धांत अंगाला चाटून जातें पण त्यानें केलेल्या जखमेंतून रक्त मात्र भळभळा वाहूं लागतें. आक्काच्या त्या प्रश्नानें त्याच्या मनाची तशीच स्थिति झाली.

लतेच्या सहवासांत आपल्या मनाचा हा कोंडमारा कमी होईल, ही त्याची कल्पना कल्पनाच ठरली. ती त्याला दररोज एखादी नवी कथा लिहून दाखवी, तेव्हां त्याला तिच्या बुद्धिमत्तेचें कौतुक वाटे. शिणलेल्या शरीराला विरंगुळा म्हणून तो घटकाभर घराबाहेर फिरायला पडला तर तीही त्याच्याबरोबर जाई. दोनतीन दिवसांच्या जाग्रणांनीं त्याचें फार डोकें दुःखूं लागलें, तेव्हां आक्काच्या हातांतून अमृतांजनची डबी घेऊन स्वतः तें अभयच्या डोक्याला लगबगीनें चोळण्यांत तिची जी धांदल झाली ती त्याला मोठी गंमतीची वाटली होती. पण अभयबरोबर एकदांही ती आजोबांच्या खोलीकडे फिरकली नाहीं. अभयनें थट्टेनें ' मीच त्या खोलींतून बाहेर येत नाहीं. मग मला भेटायला तरी तूं तिथं येशील कीं नाहीं ? ' असें जेव्हां तिला म्हटलें तेव्हां दोन्ही हातांनीं त्याला नमस्कार करून ती म्हणाली ' तेवढं मात्र करूं नका हं महाराज ! असलं कांहीं बघवत नाहीं म्हणून तर हौसेनं घेतलेला नर्सिंगचा कोर्स सोडून पळून आलें मी ! '

शिकलेल्या लतेच्या भित्रेपणाशीं अशिक्षित कावेरीच्या धीटपणाची अभयचें मन न कळत तुलना करूं लागलें. आजोबांना अर्धांगाचा झटका आला त्या रात्रीं कावेरीच्या डोळ्यांत काय अश्रु उभे राहिले असतील ते ! पुन्हां

केव्हांही अभयनें तिला रडतांना पाहिलें नव्हतें. कावेरी आणि आजोबा यांच्यामधून विस्तवसुद्धां जात नसे हें ज्यांनीं पाहिलें होतें, त्यांनीं आजोबा मृत्युशय्येवर पडल्यामुळें तिला आनंद झाला आहे असाच तर्क केला असता. पण कावेरी किती निष्ठेनें आजोबांची शुश्रुषा करीत आहे हें अभय डोळ्यांनीं पाहत होता. आंत केवढीही आग पेटली तरी डोळ्यांत पाणी उभें राहूं द्यायचें नाहीं असा तिनें निश्चय केलेला दिसत होता. त्याला वाटलें--लतेची शक्ति तिच्या स्वप्नाळु बुद्धींत आहे. पण कावेरीची शक्ति तिच्या खंबीर मनांत आहे.

पांचव्या दिवशीं दुपारीं अभय जेवून आजोबांच्या खोलीकडे आला. दारांतूनच त्यानें जें दृश्य पाहिलें, त्यानें तो अगदीं गांहिंवरून गेला. निश्चेष्ट आजोबांच्या पायांवर डोकें ठेवून कावेरी स्फुंदत म्हणत होती ‘ क्षमा करा, मला क्षमा करा. एकदां तरी माझ्याशीं बोला ! ’

कावेरीच्या जवळ पुष्कळसे कागदांचे चवरके पडले होते. आजोबा मधें जे कागद लिहीत होते त्यांची अभयला आठवण झाली. ते कागद वाचूनच कावेरीला इतका पश्चात्ताप झाला असावा अशी कल्पना त्याच्या मनांत आली. हे कागद लिहितांना ‘ आयुष्याचा हिशेब लिहितोय् मी ! ’ असें कांहींतरी आजोबा त्याला म्हणाले होते. ते शब्द त्याला आठवले. ते कागद वाचण्याची उत्कट इच्छा त्याच्या मनांत उत्पन्न झाली.

पण त्याची चाहूल लागतांच कावेरी गडबडीनें उठली आणि ते कागद उचलून घेऊन मुकाट्यानें खोलींतून निघून गेली. तिच्या मुद्रेवरला शांतकरुण भाव पाहून तिच्यापाशीं ते कागद मागण्याचा धीरच अभयला झाला नाहीं.

आजोबांच्या सुरकुतलेल्या चेहऱ्यावर पडलेल्या मृत्यूच्या छायेकडे पाहणें अभयला नेहमींच अवघड वाटे. आतांही क्षणभरच त्यानें त्यांच्याकडे पाहिलें. आजोबा हंसत आहेत असा त्याला एकदम भास झाला. त्या विचित्र भासानें

गोंधळून तो दुसरीकडे पाहूं लागला. कोंपऱ्यांत पडलेला एक कागद त्याला दिसला. त्यानें जवळ जाऊन पाहिलें. मघांच्या कावेरीच्या चवरक्यांतलाच तो होता. त्यानें तो उत्सुकतेनें उचलला. कावेरीच्या कागदांतला वरचा चवरका वाऱ्यानें उडून कोंपऱ्यांत जाऊन पडला असावा असें त्याला वाटलें. मनांतल्या मनांत वाऱ्याचे आभार मानीत त्यानें तो वाचायला सुरुवात केली--

' माझें आयुष्य ही पानपतची लढाई झाली. मी तिच्यांत हरलों, पूर्णपणें अपेशी ठरलों. पानपतच्या लढाईंत दोन मोत्यें गळालीं, सत्तावीस मोहरा हरवल्या आणि खुर्दा किती नाहींसा झाला याची गणतीच नाहीं, असें वर्णन मी शाळेंत तोंडपाठ केलें होतें. माझ्या आयुष्यांतही तसेंच झालें आहे. तीं गळालेलीं दोन मोत्यें म्हणजे--

' अभय, ' कुणीतरी गोड हांक मारली. ती हांक मालेची वाटून अभयनें मागें वळून पाहिलें. दारांत प्रमिला उभी होती. त्यानें हातांतल्या कागदाची घडी करून ती पायजम्याच्या खिशांत ठेवली.

प्रमिला पुढें येत म्हणाली--

' क्षमा करा हं. तुमच्याकडे येणार, येणार म्हणून दररोज घोंकत होतें. पण बेबीचा ताप कांहीं केल्या कमीच होईना. तो आज उतरला--'

' मालेला बसवायचं होतंस तिच्याजवळ ! '

' तिला बसायला तरी कुठं फुरसद आहे ? सकाळ संध्याकाळ कांचन मोटार घेऊन येतात--' बोलतां बोलतां प्रमिलेनें जीभ चावली. ही गोष्ट अभयपुढें बोलणें इष्ट नाहीं हें तिच्या लक्षांत आलें असावें !

आजोबांना उचकी लागल्यासारखी वाटली म्हणून अभय त्यांच्याजवळ जाऊन बसला. प्रमिलाही खालीं बसून आजोबांच्या पायांवरून हात फिरवूं

लागली. निश्चेष्ट आजोबांच्या शरीराला या अनोळखी मुलीचा प्रेमळपणा जाणवला नसेल. पण प्रमिलेकडे पाहतां पाहतां अभयला तिच्याविषयीं कधींही वाटला नव्हता इतका आपलेपणा वाटूं लागला.

दोघेंही स्तब्ध होतीं. पण दोघांच्याही डोळ्यांतून एकमेकांविषयींचें कौतुक व्यक्त होत होतें.

अशीं पांचच मिनिटें गेलीं असतील. आजोबांना एकदम उलटी होत आहे असें वाटलें. अभय त्यांच्या मानेखालीं हात घालून त्यांना उठवायला गेला. पण उठून बसविण्याच्या आधींच ते ओकूं लागले. अभयचा शर्ट घाण झाला.

प्रमिला पुढें होत म्हणाली ‘ बायकांचीं कामं पुरुष करायला लागले कीं असंच व्हायचं ! ’ हंसत हंसत तिनें अभयची जागा घेतली आणि भिंतीला टेंकून ठेवलेल्या तक्क्याला आजोबांना ओठंगून बसविलें. पण लगेच आजोबांना दुसरी उबळ आली. आतां तिचें पातळ घाण झालें. अभय हंसत म्हणाला ‘ पुरुषांचीं कामं बायका करायला लागल्या कीं असंच व्हायचं ! ’

दोघेंही मनापासून हंसलीं—हंसतां हंसतां त्यांचें लक्ष आजोबांच्याकडे गेलें. ते डोळे उघडून पाहत होते. त्यांनीं बोलण्याचा प्रयत्न केला. पण त्यांच्या तोंडां-तून शब्दच उमटेना. मात्र अभयच्या शर्टवरली आणि प्रमिलेच्या पातळावरली स्वतःच्या ओकारीची घाण त्यांनीं पाहिली असावी. त्यांच्या डोळ्यांतून कृतज्ञतेचे अश्रु डोकावून पाहत होते.

प्रमिलेला पातळ बदलणें प्राप्तच होतें. पण तिला आपलें हें पातळ देऊं कीं तें अशी लतेची स्थिति झालेली पाहून अभयला हंसूं आलें. लतेच्या दहावीस पातळांतून हाताला येईल तें पातळ उचलून पांच मिनिटांत प्रमिला बाहेर आली तेव्हां अभयला तिचें मघासारखेंच कौतुक वाटलें.

आजोबा शुद्धीवर आले असल्यामुळें अभयला कांहीं घरींच रहायला नको होतें. त्याला मालेची आठवण झाली.

प्रमिला आणि लता यांना घेऊन अभय मोठ्या उत्सुकतेनें मालेच्या घरीं आला खरा ! पण मालाच घरीं नव्हती !

कितीतरी दिवसांत अभय लांब फिरायला गेला नव्हता. पर्वतीवर जाऊन शांतपणानें चार घटका बसावें असा विचार त्याच्या मनांत आला. प्रमिलेलाही तो आवडला. बहुमताविरुद्ध जाण्यांत कांहीं अर्थ नाहीं म्हणून लतेनेंही मानेनें होकार दिला.

पण पर्वतीच्या पायथ्याशीं जाईपर्यंतच ती दमून गेली. अभय आणि प्रमिला यांच्या चेहऱ्यांवरून तीं दोघें आणखी पन्नास मैलसुद्धां चालतील असें दिसत होतें. ती कांहींच बोलली नाहीं. हळुहळु पायऱ्या चढायला तिनें सुरुवात केली. पण पंधरावीस पायऱ्या चढून गेल्यावर ती मटकन् खालींच बसली. अभय तिच्याकडे पाहून हंसत म्हणाला—' कांहीं झालं तरी लता नाजुकच असायची ! '

बाजूला असलेल्या एका वर्तुलाकार जागीं बसून जोडीनें भरभर पायऱ्या चढत जाणाऱ्या अभय आणि प्रमिला यांच्या मूर्ती लता टक लावून पाहत होती. कांहीं तरी हरवलें म्हणजे मनुष्य जसा गोंधळून जातो, त्याप्रमाणें ती उगीचच जागच्या जागीं उठली, दोन पायऱ्या चढून गेली, पुन्हां परत आली, पुन्हा चढण्याकरितां म्हणून पायऱ्यांवर जाऊन उभी राहिली.

× × ×

अभय आणि प्रमिला हंसत खिदळत परत आलीं तेव्हां तर लतेच्या मनाचा गोंधळ अधिकच वाढला. पायथ्याशीं अगदीं ओणव्या झालेल्या एका म्हाताऱ्या भिकारणीनें ' बाई, पैसा ' म्हणून तिच्यापुढें हात पसरला तेव्हां तिच्या अंगावर पाकीटांतली आणेली टाकून ती झटकन् पुढें गेली. प्रमिलेनें त्या भिकारणीला

एकच पैसा दिला. पण आपलें दुःख कुणी तरी ऐकावें अशी म्हतारीची इच्छा दिसतांच ती तिच्यापाशीं थांबली आणि मोठ्या मायेनें तिला प्रश्न विचारूं लागली.

अभय मधें उभा राहून आलटून पालटून दोघींकडे कां पाहत आहे हें लतेला कळेना. ती म्हणाली ' चला ना ! '

पण अभय जागचा हलला नाहीं. त्यानें पायजम्याच्या खिशांत हात घालून कागदाची एक घडी बाहेर काढली. मात्र लतेचें आपल्याकडे लक्ष आहे असें वाटतांच त्यानें ती घडी पुन्हां खिशांत घातली.

तें प्रमिलेचें पत्र असावें अशी शंका येऊन लता जवळ आली. तिनें विचारलें ' कुणाचें पत्र आलंय् ?

' असंच आपलं एका मित्राचं ! '

' हा मित्र बहुधा तरुण असेल ! '

' छेः ! फ़ार म्हातारा आहे तो ! '

अभय आपल्याला फसवीत आहे असें वाटून लतेनें त्याच्याकडे किंचित् रोषानें पाहिलें. तो हंसत उद्गारला—

' प्रत्येकांचीं कांहीं गुप्त पत्रं असतातच ! नाहीं कां ? '

आपण आईचें पत्र अभयला अजून दाखविलें नाहीं म्हणून त्यानें हा टोमणा मारला हें लतेनें ओळखलें.

तिच्या मनांत आलें—आपण तें पत्र अभयला दाखविलें तर—छेः ! त्या रात्रीं दुबळेपणाच्या भरांत आपण तें त्याच्या हातांत दिलें होतें. ती चूक पुन्हां करून चालणार नाहीं.

अभय आपल्याला हवा आहे ! पण त्या पत्रांतलें रहस्य कळल्यावर त्याचें आपल्यावर असलेलें प्रेम उडून जाईल. ही प्रमिलासुद्धां त्याला आपल्या हातांतून

हिरावून नेईल ! त्याचा काय नेम आहे ? ज्याचें प्रेम आपल्याला हवें आहे त्याला आपलें रहस्य न सांगणेंच बरें ! हार्डीच्या टेसनें ती चूक केली आणि—

ती अभयकडे पाहून हंसली. आणि म्हणाली ' काँग्रेस सरकार आलं म्हणून कांहीं सी. आय्. डी. खातं नाहींसं झालं नाहीं ! तेव्हां प्रत्येकांचीं कांहीं गुप्त पत्रं असायचींच ! त्यांत काय आहे एवढं मोठं ? '

× × × ×

घरीं पोंचल्याबरोबर आजोबांचा तो कागद वाचायचा असें अभयनें मनांत ठरविलें होतें. पण टेबलावर नरेंद्राचें पत्र येऊन पडलेलें दिसतांच त्यानें तें आधीं फोडलें. पत्र हिंदींत होतें. पत्रावरल्या पत्त्यावरून तें नरेंद्रानें पाठविलें आहे असा त्याचा ग्रह झाला होता. पण खालची सही पाहून तो चकितच झाला—**ज्योति.**

तिनें लिहिलें होतें--

' भाई अभय,

नरेंद्र तापानें अंथरुणावर पडून तुझी सारखी आठवण करतोय् ! पुण्याहून आल्याबरोबर त्यानें तुझ्याविषयीं इतक्या गोष्टी मला सांगितल्या कीं मी त्याला थट्टेनें म्हटलें—हंसानें केलेलें नळाचें वर्णन ऐकून दमयंतीचें त्याच्यावर प्रेम जडलें अशी कांहींतरी एक कथा आहे ना ? माझेंसुद्धां अभयवर तसेंच प्रेम बसेल हं !

ही थट्टा ऐकून नरेंद्र रागावला असेल अशी तूं मनांतल्या मनांत कल्पना करशील !

माझा नरेंद्र ठाऊक नाहीं तुला ! तो म्हणाला--' ज्योति, मनुष्य साऱ्या जगावर प्रेम करण्याकरितां जन्माला येत असतो ! ' आमच्या बोलण्यांत थट्टेचा मक्ता माझ्याकडे आहे नि तत्वांचा नरेंद्राकडे आहे--

संसारांतही असेंच असतें नाहीं का ? पुरुष पैसा आणतो, स्त्री प्रेम आणते आणि--

जाऊं दे तें ! मुलखाची गोष्टीवेल्हाळ आहे मी ! बाकी माझ्या स्वभावामुळें नरेंद्राचा फायदाच झाला आहे हं ! किसानांना नि किसानांच्या बायकांना कितीतरी नव्या गोष्टी शिकवाव्या लागतात ! पण बॉंब गोळ्यांच्या वर्षावांत लढून आलेल्या नरेंद्रालासुद्धां जें कधींकधीं साधत नाहीं तें चुलीपुढें बसून रोटी भाजणारी ज्योति सहज करते ! असा आहे हल्लींचा अनुभव !

तूं मनांत म्हणशील--ही बाई मोठी बढाईखोर दिसते. तेव्हां सोडूनच देतें तो विषय.

नरेंद्रानें तुला पत्ता दिला नव्हता. म्हणून तूं त्याला पत्र पाठविलें नसशील. आमचा पत्ता खालीं दिला आहे. जवळच्या पांचदहा खेड्यांतच सध्यां आम्ही काम करणार आहों.

कॉंग्रेस मंत्रिमंडळें होऊन क्रांति मात्र लांबणीवर पडली ! खेडुतांना आपल्याच लोकांचें राज्य झालें असें वाटतेंय् ! आपण कांहीं आतां उपाशीं मरणार नाहीं अशी त्यांची श्रद्धा आहे. बिचारे भोळे जीव फुलालाच फळ मानताहेत !

अभय, जी नरेंद्राची आवड तीच माझी ! म्हणून तुला कधीं पाहीन असं झालंय् मला ! नरेंद्राचा ताप लवकर बरा होईल असं पत्र अगदीं लवकर पाठीव हं !

तुझी वहिनी

**ज्योति**

× × × ×

जन्मांत कधींही न पाहिलेल्या ज्योतीच्या पत्रांतील मोकळेपणा तर अभयला मोहक वाटलाच. पण प्रेमळपणा इतकाच त्यांत निर्भयपणा होता, बुद्धीही होती. ‘ मनुष्य प्रत्येकावर प्रेम करण्याकरितां जन्माला येत असतो ’ हें वाक्य नरेंद्राचें म्हणून सोडून दिलें तरी काँग्रेस मंत्रिमंडळाच्या दुबळ्या कार्यक्रमावर तिनें एका वाक्यांत केलेली टीका त्याला फार समर्पक वाटली--‘ बिचारे भोळे लोक फुलालाच फळ मानताहेत ! ’ सात नोव्हेंबरच्या संपाविषयीं शाळेंतल्या वादविवाद-सभेंत अभयनें जें भाषण केलें होतें त्याचें सारच जणुं कांहीं ज्योतीच्या या वाक्यांत उतरलें होतें !

कितीतरी वेळानें आजोबांचा कागद वाचायची अभयला आठवण झाली. तो त्यानें उघडला इतक्यांत आक्का खिडकीपाशीं येऊन उभी राहिली. आजोबा शुद्धीवर आल्याबद्दल दोघांचें थोडें आनंदाचें बोलणें झालें. मग आक्का अभय-कडे रोखून पाहत म्हणाली ‘ आतां तुला लवकर वकिली सुरू करायला हवी ! ’

वकिली ? टेबलावर पडलेलें ज्योतीचें पत्र आपल्याकडे पाहून हंसत आहे असा अभयला भास झाला.

अभय कांहींच बोलत नाहीं असें पाहून आक्का अगदीं हळू म्हणाली ‘ या लतेचं काय करायचं बाबा ? पोरगी हुषार आहे, सरळ आहे, प्रेमळ आहे. पण ती आपलं घर सोडून आमच्या घरीं कां आली—नात्यांतली नाहीं, पात्यांतली नाहीं--लोकांना नेहमींच चांभारचौकशा हव्या असतात—त्या समोरच्या माण-सांनीं ‘ ही तुमची कोण ? ’ म्हणून विचारलं तेव्हां मला इतकं विचित्र वाटलं म्हणतोस—’

आक्का पुढें कांहींतरी बोलणार होती. पण मोटारचा आवाज कानांवर पडल्यासारखें वाटल्यामुळें तिनें खिडकींतून बाहेर पाहिलें. ‘ आपल्याकडंच आलंय् कुणी ! ’ असें म्हणून तिनें मोटारींतून उतरणाऱ्या व्यक्तीकडे निरखून

पाहिलें. लगेच ती उद्गारली ‘अगबाई, या बाईला कुठंतरी पाहिल्यासारखं वाटतंय् !’

अभयही कुतूहलानें खिडकीकडे आला होता. बाहेर डोकावून पाहून तो म्हणाला—

‘ही लतेची आई !’

× × × ×

लता आणि तिची आई एका खोलींत दार लावून बोलत बसल्या. आक्का चहा करायला निघून गेली. अभयनें आजोबांचा कागद उघडला. आपल्या आयुष्याला पानिपतची लढाई मानून या लढाईंत दोन मोत्यें गळालीं असें त्यांनीं लिहिलें होतें. हीं दोन मोत्यें कुठलीं हा प्रश्न त्याच्या मनांत तिसऱ्या प्रहरापासून कितीतरी वेळां उत्पन्न झाला होता.

तो वाचूं लागला—‘हीं दोन मोत्यें म्हणजे ध्येयाची भक्ति आणि दुसऱ्याचें दुःख जाणण्याची शक्ति. टिळक–आगरकरांच्या बरोबर मी तुरुंगांत गेलों. पण पुढें ? टिळकांनीं देशाला स्वराज्याचा मंत्र दिला, आगरकरांनीं सामाजिक गुलामगिरी नाहींशी केली. आणि मी ? छीः ! उगीच जन्माला आलों मी !

दुसऱ्याचें दुःख जाणण्याची माझी शक्ति स्वतःच्या मुलाच्या सुखाच्या वेळीं दुबळी ठरली. माया आंधळी असते हेंच खरें ! नाहींतर स्वतःच्या अर्धवट मुलाच्या गळ्यांत कावेरीसारखी सुंदर आणि हुषार मुलगी बांधण्याचा मूर्खपणा–’

कागद इथेंच संपला होता. पण तो कितीदां वाचला तरी अभयचें समाधान होईना. नरेंद्राचें मागचें पत्र—ज्योतीचें समोर पडलेलें पत्र—आजोबांचें हें आत्मपरीक्षण—सारीं त्याला सांगत होती—ध्येयाकडे धांव घे, आपल्या ध्येयाकडे धांव घे.

१४

# पंधरवड्यांत करपलेली लता.

प्रत्येकाच्या आयुष्यांत ध्येयनिश्चितीचा क्षण केव्हां ना केव्हां
उक्तीचा अभयला यावेळीं पुरा प्रत्यय आला. त्याच्या मनांत विचार
लाटा उसळत होत्या. एका लाटेबरोबर तो वैभवाच्या, विलासाच्या
दृष्टीनें पूर्णपणें सुखी अशा जीवनाच्या तीराला पोंचे. पण तिथून व
पैलतीर त्याला दिसत नसे. या तीरावर लहान मुलाप्रमाणें वाळूंत
बसायचें कीं काय हा त्याला प्रश्न पडे. लगेच अस्वस्थपणानें तो पा
टाकी आणि दुसऱ्या उंच लाटेवर चढून पैलतीराकडे जाई. त्या
हजारों बालकें समुद्रांत बुडत असलेलीं त्याला दिसत. त्यांना वांच
तो धडपडूं लागे. इतक्यांत कुठून तरी आक्काचा आवाज त्याच्य
येई. ती म्हणे ' अभय, एकच मूल बुडत असतं तर गोष्ट निराळी
लाखों मुलांना कसा वांचविणार ? पोहतां पोहतां तुझे हात दमू
आणि--' गळा दाटून आल्यामुळें आक्काच्या तोंडून पुढला शब्द उ
हें त्याला कळे.

या द्वंद्वांत त्याचें मन सुन्न होऊन गेलें. इतक्यांत चारूनें धांवत येऊन आजोबा त्याला बोलावीत असल्याचें सांगितलें. अभय त्यांच्या बिछान्यापाशीं जाऊन बसला. त्यांना आतां थोडें थोडें बोलतां येत होतें. पण अर्धी जीभ गेल्यामुळें ते लुडबे बोलत होते. अभयकडे प्रेमळ नजरेनें पाहत ' माझा कांहीं नेम नाहीं आतां. चारूला तुझ्या पदरांत टाकून मी जाणार आहे ! ' एवढें कसेंबसें बोलायला त्यांना पांच मिनिटें लागलीं.

आजोबांच्या कागदांतलीं गळून गेलेल्या दोन मोत्यांविषयींचीं वाक्यें अभयला आठवलीं. त्याला वाटलें——आजोबा चारूला संभाळ असें सांगताहेत. पण त्यांना म्हणायचें आहे, आमच्या पिढीच्या मनांतलीं ध्येयें मनांतच राहिलीं. तीं लहानाचीं मोठीं झालेलीं पहायला आम्हीं असणार नाहीं. तीं मोठी करण्याची जबाबदारी तुझ्यासारख्या तरुण पिढींतल्या माणसांवर आहे.

आजोबांच्या करुणदृष्टींत जणुं आपल्यापुढें पसरलेल्या दोन मार्गांचें प्रतिबिंबच पडलें आहे असा अभयला भास झाला. एक मार्ग कौटुंबिक जीवनाचा आणि दुसरा सामाजिक जीवनाचा ! सुखाच्या मंदिराकडे जाणाऱ्या पहिल्या राजमार्गावर लक्ष्मी पायघड्या पसरीत होती, प्रीति विंझणवारा घालीत होती, आणि कीर्तीचीं कारंजीं जागोजागीं थुईथुई नाचत होतीं. दुसरा मार्ग कांट्यांकुट्यांतून, दऱ्याखोऱ्यांतून कुठें जात होता हें धड कळतही नव्हतें. मार्ग कसला ? पाऊलवाटच होती ती ! या पाऊलवाटेवरले खडक एखादे वेळीं उन्हानें इतके तापत कीं त्यांच्यावर पाऊलही ठरत नसे. एखादे वेळीं पावसानें ते इतके निसरडे होत कीं त्यांच्यावर पाऊल ठेवणारा मनुष्य तोंडघशीं पडे ! या वाटेवर कारंजीं तर नव्हतींच. पण मधेंच डोंगरांतून वाहणारें जें पाणी दिसे, तें सुद्धां झाडांचीं पानें ओल पडल्यामुळें इतकें घाण झालेलें असे कीं——

पण या दुसऱ्या मार्गानेंच बुद्ध गेला होता, शिवाजी गेला होता; मार्टिन ल्यूथर गेला होता, झांशीची लक्ष्मीबाई गेली होती, लोकमान्य टिळक गेले होते.

एका क्षणांत या दुसऱ्या मार्गानें जाणाऱ्या प्रवाश्यांची एक लांबच्या लांब मालिका अभयच्या डोळयांपुढें उभी राहिली. जात, धर्म, राष्ट्र, कुठलाही भेद त्यांच्यांत दिसत नव्हता. तानाजी मालुसरे, लुई पाश्चरशीं गोष्टी करीत होता. फ्लॉरेन्स नाइटिंगेल भगतसिंगाशीं बोलत होती. रामदासस्वामी, जोन ऑफ आर्क, लेनिन आणि आगरकर यांचें संभाषण मोठ्या रंगांत आलें आहे असें त्यांच्या मुद्रांवरून दिसत होतें.

हा भास क्षणभरच टिकला ! पण क्षणार्धांत चमकून जाणारी वीज जशी ब्रम्हांड उजळून जाते, त्याप्रमाणें त्या भासानें अभयच्या जीवनमार्गावर नवा प्रकाश पाडला.

× × × ×

'आईला तुम्हांला भेटायचं आहे' असें लतेनें येऊन सांगितलें. तेव्हां अभय आजोबांच्या जवळून उठला. लतेची आई चहा घेत होती. आक्कानें अभयलाही अर्धा पेला दिला. चहा घेतांना त्याच्या मुद्रेवर जें हंसें दिसत होतें, त्याचें कारण नेम मोडून आज आपण अभयला चहा दिला हें असावें असें आक्काला वाटलें. पण खरें कारण निराळेंच होतें. अभयच्या अंतःश्चक्षूंपुढून गांधी, सावरकर, जवाहरलाल इत्यादि पुढारी जात होते. त्याला वाटलें—गांधीवादाचें सारें सामर्थ्य त्याच्या दुबळेपणांत आहे. आणि सावरकरवादाचा सारा दुबळेपणा त्याच्या सामर्थ्यांत आहे ! जवाहरलाल हें एक सुंदर भाषेंत लिहिलेलें सुंदर विचारांचें पुस्तक आहे. आणि आजच्या समाजवादी पुढाऱ्यांचीं तत्त्वें म्हणजे आकाशांतले तारे ! या दुर्दैवी देवाला काल वाहिलेलीं फुलें आहेत, उद्यां वाहतां येतील अशींही फुलें आहेत. पण आज—आजची पूजा कशी साजरी करायची ? निर्माल्य आणि कळया यांनीं कांहीं कुणी देवाची पूजा करीत नाहीं.

लतेची आई त्याच्याकडे पाहत हंसून म्हणाली 'लतेला तुमच्या स्वाधीन केलं आहे हं आतां !'

अभयला तिच्या बोलण्यापेक्षांहि तिचे वाक्य ऐकतांच आक्काच्या मुद्रेवर जें हास्य चमकलें त्याचेंच आश्चर्य वाटलें.

अभयनें लतेच्या आईला उत्तर दिलें ' पण लवकरच बाहेरगांवीं जाणार आहे मी ! '

' कुठं ? '

' खेड्यापाड्यांत चार सहा महिने फिरावं म्हणतों ! ' आक्काकडे पाहत अभय पुढें म्हणाला ' आतां मधेंच वकिली कोण सुरू करतो ? मे महिन्याच्या सुट्टीनंतर कोर्टं सुरू होतात ! तेव्हां—'

लहान मुलासारखी टाळ्या पिटीत लता अभयला म्हणाली ' मीही तुमच्या बरोबर येईन ! कोंकणांतल्या खेड्यांत जाऊं या आपण ! तिथं खूप खूप सुंदर गोष्टी पहायला मिळतील. समुद्राच्या उंच उंच लाटा—माडांचीं उंचउंच झाडं, सुरंगीचीं नाजुक फुलं नि—'

लतेची आई मधेंच उद्गारली ' अगदीं कुक्कुबाळ आहेस बघ ! ' लता गप्प बसल्यावर ती अभयला उद्देशून म्हणाली ' फार अवखळ आहे हं हें कुक्कुबाळ ! हिला दुसऱ्या कुणाच्या ताब्यांत द्यायचा धीरसुद्धां झाला नसता मला ! पण हिनं दोन अटी माझ्यापाशीं कबूल केल्या. म्हणून—'

' त्या अटीच मी पाठ म्हणून दाखवते ! ' असें म्हणत लता इन्स्पेक्टरपुढें उभ्या राहिलेल्या शाळेंतल्या मुलीसारखी दोन्ही हात अंगाबरोबर ताठ धरून उभी राहिली आणि एका सुरांत सांगूं लागली—पहिली अट—अभय सांगतील तसं वागायचं ! दुसरी अट—सिनेमांत जायचं नाहीं ! '

लतेचा तो अभिनय पाहून हंसतां हंसतां सर्वांची पुरेवाट झाली.

× × × ×

आक्का आपल्याला जायला आनंदानें परवानगी देईल असें अभयला वाटलें नव्हतें. त्यामुळें तिनें मोठ्या आनंदानें प्रवासाची तयारी चालविलेली पाहून त्याला आश्चर्य वाटलें. तें आक्काच्या लक्षांत आलें तेव्हां ती म्हणाली—

'तूं जायचं काढलंस तें बरं झालं. नाहींतर मीच तुला कुठं तरी प्रवास करून यायला सांगणार होतें.'

'कां?'

'घराबाहेर गेल्यावांचून पुरुषाला घराची किंमत कळत नाहीं!'

'पण घराबाहेर पडलेला पुरुष परत घरीं येईल म्हणून काय नेम आहे?'

'नुसत्या पतंगाला कांहीं कोणी वाऱ्यावर सोडीत नाहीं. त्याला दोरी लावतात, ती आपल्या हातांत ठेवतात--'

अभय आणि लता मनापासून हंसल्यामुळें आक्का पुढें कांहीं बोललीच नाहीं. पतंगाची दोरी म्हणून आक्कानें लतेकडे ज्या दृष्टीनें पाहिलें, तिच्यांत फार अर्थ भरला आहे हें अभयनें ओळखलें.

दुसरे दिवशीं एक्स्प्रेसनें मुंबईला जाऊन तिथून बोटीनें कोंकणांत जायचें अभयनें ठरविलें. त्यामुळें त्याला पहांटे उठावें लागलें. प्रथम तो डॉक्टरांच्याकडे जाऊन आला. मग आजोबांना त्यानें आपला जाण्याचा बेत सांगितला. त्याला जवळ घेऊन त्यांनीं त्याच्या पाठीवरून मोठ्या प्रेमानें हात फिरविला. हात फिरवतां फिरवतां त्यांना हुंदका आला. अभय त्यांचें समाधान करण्याकरितां म्हणाला 'मी लवकरच परत येणार आहे, आजोबा. नि डॉक्टर म्हणाले दोन तीन महिन्यांत तुम्ही उठून फिरायलासुद्धां लागाल कदाचित्!'

आजोबा उद्गारले 'खुळ्या, मी मरायला भितोंय् असं कां वाटतं तुला? छेः! उद्यां पटकन् प्राण गेला तर तुला पहायची इच्छा राहून जाईल हें मनांत आलं माझ्या! पण—जाऊं दे! प्रेम हा सुद्धां एक पिंजराच आहे!'

आजोबांच्या अर्धबोबड्या उच्चारांतलें हें बोलणें ऐकतांना अभय गंहीवरून गेला. चारूनेंही त्याच्याबरोबर जायचा हट्ट धरला. त्याची समजूत घालतां घालतां अभयच्या नाकीं नव आले. 'मी जंगलांत जाणार आहे, तिथं मोठेमोठे वाघ आहेत' म्हणून त्यानें चारूला भीति दाखवून पाहिली. पण तो बालवीर मुळींच डगमगला नाहीं. तो म्हणाला--'तुम्ही वाघाची शिकाल कलाल कीं!'

शेवटीं चारूला खेळायला खूप खेळणीं आणून द्यायचीं आणि त्याचा डोळा चुकवून निघून जायचें असें अभयनें मनांत ठरविलें.

कावेरीला त्यानें आपला बेत सांगितला तेव्हां 'लवकरच परत या हं!' एवढेच शब्द ती बोलली. पण जुईच्या चिमुकल्या फुलाचा सुगंध जसा स्मृतीमध्यें तरंगत राहतो तसें तें तिचें वाक्य अभयच्या मनांत एकसारखें घोळूं लागलें. आपल्या घरांत जातां जातां त्यानें मागें वळून पाहिलें. कावेरी त्याच्याकडे पुनःपुन्हां पाहत होती आणि डोळे पुसत होती.

मालेच्या घरीं तो गेला तेव्हां दत्तोपंत कुठें बाहेर गेले होते. दत्तोपंतांच्या पत्नीला त्यानें 'मी बाहेरगांवीं जात आहे' म्हणून सांगितलें. तेव्हां त्यांनीं नुसतें हुं म्हटलें. कुठें, कशाला, असली चौकशी त्यांनीं एका शब्दानेंही केली नाहीं. मालेच्या खोलींत गेल्यावर मात्र अभयला ही गोष्ट बोलणें जरा अवघड वाटूं लागलें. आपला बेत ऐकतांच मालेचें तोंड गोरेंमोरें होईल, गळ्याची शपथ घालून ती आपल्याला 'जाऊं नका' म्हणून आग्रह करील, इत्यादि कल्पना त्याच्या मनांत आल्या. पण त्या साऱ्याच खोट्या ठरल्या.

आरशापुढें उभी राहून माला कानांत नवीन पद्धतीचीं कर्णफुलें घालीत होती. अभयनें हळूच आपला बेत तिला कळविला, तेव्हां ती आपल्या प्रतिबिंबाकडे पाहून हंसत उद्गारली 'ही बातमी सांगायला स्वतः आलांत हेंच

माझं भाग्य म्हणायचं ! ' ती पुढें कांहीं बोलेल अशी अभयची कल्पना होती. पण तिनें मौनव्रत धारण केलेलें दिसलें.

आपल्या जाण्यानें प्रमिलेला वाईट वाटत आहे हें अभयच्या लक्षांत आलें, तेव्हां त्याला वाटलें—माणसाशीं लपंडाव खेळण्यांतच दैवाला गंमत वाटत असावी.

अभयच्या घरून त्याचीं पुस्तकें वाचायला आणण्याची परवानगी तर तिनें मिळविलीच. ती मिळाल्यावर आभाळांत दूर उडणाऱ्या एका घारीकडे पाहत ती म्हणाली ' दर आठ दिवसांनीं मी भेटायला येणार आहे तुम्हांला ! '

' दर आठ दिवसांनीं ? '

' हो ! त्यांत काय कठिण आहे एवढं ? तुम्ही कुठंही असलां तरी माझा प्रवास एका आण्यांत--फारतर दीड आण्यांत होईल ! '

पत्रद्वारानें होणाऱ्या भेटीविषयीं ती बोलत आहे हें लक्षांत येऊन अभयला तिच्या प्रेमळपणाइतकेंच तिच्या मार्मिकपणाचेंही कौतुक वाटलें. तो म्हणाला ' मी सुद्धां तुला दर आठ दिवसांनीं भेटायला येईन ! '

' खरं ? '

' अगदीं खरं ! असल्याच भेटी मला अधिक आवडतात ! माणसाला जें तोंडानं सांगतां येत नाहीं तें पत्रांतनं सहज सांगतां येतं. नाहीं कां ? '

हें वाक्य उच्चारतांना त्याला नरेंद्राच्या पत्राची आठवण झाली होती. प्रत्यक्ष भेटीपेक्षां त्याचें पत्रच अधिक स्फूर्तिदायक होतें.

त्यानें प्रमिलेकडे पाहिलें. आपलें वाक्य ऐकून ती किंचित् लाजली असें त्याला वाटलें. तिनें त्या वाक्याचा अर्थ—

या विचाराला मनांतून हुसकून लावून अभय तिला म्हणाला ' परीक्षेंत पहिल्या वर्गांत यायला हवं हं ! '

‘ पहिल्या वर्गांत आलें तर बक्षिस द्याल ? ’

‘ हं ! ’

‘ काय द्याल ? ’

‘ तूं मागशील तें ! ’

‘ मी मागेन तें ? ’

‘ हं ! ’

घरीं आल्यावर कितीतरी वेळ अभयपुढें ‘ मी मागेन तें ? ’ हा प्रश्न उत्सुकतेनें विचारणारी प्रमिलेची मूर्ति उभी होती.

× × × ×

आक्काला पोस्टांतून दोनशें रुपये काढून देऊन आणि स्वतःच्या खर्चासाठीं शंभर रुपये घेऊन अभय लतेसह दुपारीं गाडींत बसला तेव्हां त्याला आपल्या या स्वैर प्रवासाची मोठी गंमत वाटूं लागली.

आणि नाविन्याची ही गंमत वाढावी अशाच गोष्टी लता त्याला सांगत होती. ‘ तुझ्या आईचा माझ्यावर इतका विश्वास कसा बसला ? ’ या त्याच्या प्रश्नाचें तिनें दिलेलें उत्तर किती अकल्पित होतें !

लतेच्या आईनें अभयच्या वडिलांना पाहिलें होतें, ते किती सच्छील होते हेंही तिला ठाऊक होतें. अभयला दत्तोपंतांच्या घरीं पाहून तिला त्याच्या वडिलांची आठवण झाली, तिनें दत्तोपंतांकडे त्याच्याविषयीं चौकशी केली आणि म्हणूनच लता अपरात्रीं त्याच्या घरीं रहायला गेली तरी ती घाबरली नाहीं. ती लतेला म्हणाली होती ‘ अभयचे डोळे थेट त्याच्या वडिलांच्या सारखे आहेत. असल्या डोळ्यांचीं माणसं दुसऱ्यासाठीं आपला प्राण देतील, पण आपल्या सुखा-साठीं दुसऱ्याचा प्राण कधींही घेणार नाहींत ! ’

या हकीगती इतकीच लतेची आई अभयच्या घरीं कां आली ही हकीगतही आश्चर्यकारक होती. काल एफ्. सूर्यरावांचें लतेच्या नांवाचें पत्र आलें होतें. त्या पत्रांत मातृभूमि चित्रांत काम करण्याकरितां त्यांनीं तिला आठशें रुपये पगार देऊं केला होता व उद्यां संध्याकाळच्या गाडीनें आपण भेटायला येत असल्याचें कळविलें होतें! तें पत्र वाचून लतेच्या आईला वाटलें--आपण हें पत्र मधल्यामधें फाडलें तरी हा डायरेक्टर परस्पर लतेची गांठ घेईल आणि तिला आपल्या कंपनींत घेऊन जाईल. लतेनें सिनेमांत जाऊं नये अशी तिला शपथ घालण्याकरितां ती आली होती.

आई तसें सांगायला आली असली तरी लतेनें तें तावडतोब कबूल कसें केलें याचें अभयला आश्चर्य वाटलें. त्यानें विचारलें ' पण सिनेमांत काम करण्याची तुला हौस आहे ना?'

' नाहीं कोण म्हणतं?

' मग हा आठशें रुपये पगार सोडून--'

' उगीच नाहीं सोडला तो मी! त्याच्या पेक्षां अधिक पगार मला सध्यां मिळतोय् असें लिहिणार आहे मी त्या एफ्. ला!'

' आठशेंपेक्षां अधिक पगार तुला मिळतोय्?'

' हं!'

' कुठं?'

लतेनें भावपूर्ण दृष्टीनें त्याच्याकडे पाहिलें. ती म्हणत होती—तुमच्या सहवासांत.

जूनपासून आपण पुण्यांत ज्या ज्या ठिकाणीं बोललों तिथें तिथें लता हजर होती, आपल्या भाषणांनीं तिच्या मनांत आपल्याविषयीं आदरभाव निर्माण

झाला आणि मोतिरामाबरोबर ती आपल्याकडे आली, ती तिकीटें खपविण्यापेक्षां आपली ओळख करून घेण्याच्या हेतूनेंच, हें जेव्हां अभयला कळलें तेव्हां तर त्याच्या मनांत एक सुखद संभ्रम उत्पन्न झाला--आपल्या हृदयाची स्वामिनी कोण होणार आहे ? माला कीं लता ?

आक्का आणि लतेची आई यांचें काल काय बोलणें झालें याविषयीं अभयनें विचारलें तेव्हां तर लता हंसत हंसत स्वतःशीं गुणगुणूं लागली--' एक बंगला बने न्यारा ! ' अभयनें तिच्या या गाण्याचीही थट्टा उडवायला सुरुवात केली. इतक्यांत मुंबईहून येणारी गाडी धाडधाड करीत पलीकडून जाऊं लागली. खिडकींतून तोंड बाहेर काढीत लता ओरडली.

' गुड्बाय्, मिस्टर एफ् सूर्यराव ! '

× × × ×

बोटींत चढल्यावर तर लतेच्या या पोरकटपणाला ऊतच आला. अभय-बरोबर ती तिसऱ्या वर्गांत बसली होती. पलीकडेच गांठोडें घेऊन बसलेल्या एका म्हातारीनें तिला विचारलें ' धाकटं बिकटं कांहीं नाहीं वाटतं अजून माझ्या बाईला ? ' ती काय म्हणत आहे हें लतेला चटकन् कळलें नाहीं. पण म्हातारीच्या म्हणण्याचा अर्थ ध्यानांत येतांच तिनें असा कांहीं हिरमुसला चेहरा केला कीं पाहणाराला वाटावें--या बाईचें लग्न होऊन पांच-सात वर्षें झालीं आहेत, तिला मुलांची फार हौस आहे, पण बिचारीवर देवच कोपला आहे !

ती म्हातारी ओकूं लागली तेव्हां मात्र लतेनें तेथून पळ काढला. अभय तिचें डोकें धरून बसला हेंही तिला आवडलें नाहीं. कठड्यापाशीं उभी राहून ती समुद्राकडे पाहूं लागली. हां हां म्हणतां तिच्या डोळ्यांत आनंद चमकूं लागला. अभयला वाटलें—समुद्राकडे पाहून लतेच्या डोळ्यांपुढें कितीतरी सुंदर दृश्यें उभीं राहिलीं असतील ! गोकुळांतल्या दहीं घुसळणाऱ्या गौळणी-सारखी ही आगबोट तिला वाटत असेल आणि—

लता त्याच्याजळ धांवत येऊन म्हणाली ‘ आतां माझ्या मनांत काय आलं ठाऊक आहे कां ? ’

‘ काय ? ’

‘ एकदम समुद्रांत उडी टाकावी ! ’

‘ तुला पोहायला येतं कां ? ’

‘ चांगलंसं नाहीं ! ’

‘ मग उडी टाकशील तर बुडशील ! ’

‘ मुळींच नाहीं. मी बुडत असतांना तुम्ही कांहीं बोटींत बसून राहणार नाहीं !’

× × × ×

बोटीनें कुठल्याशा बंदरांत नांगर टाकला. त्या आवाजानें अभय जागा झाला. कोकणपट्टींतलें अगदीं शेवटचें बंदर म्हणून त्यानें वेंगुर्ल्यांचीं तिकिटें काढलीं होतीं. झोंपेंत त्याला वाटलें--वेंगुर्लेंच आलें असावें. पण तें देवगड होतें हें खलाश्यांचा ओरडण्यावरून स्पष्ट ऐकूं येत होतें.

लता गाढ झोंपली आहे कीं नाहीं हें पाहण्याकरितां अभय दुसऱ्या कुशीवर वळला. तो चकित झाला. अंगाभोंवतीं रग गुंडाळून घेऊन लता त्याच्याकडे पाहत बसली होती.

‘ काय पाहतेस ? चांदणं ? ’ त्यानें विचारलें.

‘ हं ! ’

‘ मग उभी राहून तरी पहा ! ’

‘ समुद्रावरलं चांदणं नाहीं हें ! ’

‘ मग ? ’

‘ एका माणसाच्या चेहऱ्यावरलं ! ’

‘ मी झोंपेंत हंसत होतों ? छे : ! ’

‘ आतां साक्षीपुरावा कुठून आणायचा बाई ? पण तुम्ही इतकं गोड हांसत होतां कीं मला उषास्वप्नाचीच आठवण झाली. उषेच्या स्वप्नांत अनिरुद्ध आला होता ना ? ’

अभय आपलें स्वप्न आठवूं लागला. स्वप्नांत तो एक पत्र वाचीत होता. त्या पत्रांत मजकूर ज्योतीचा पण अक्षर प्रमिलेचें असा कांहींतरी विचित्र संकर झाला होता.

× × × ×

बंदरांत मोटारी निरनिराळ्या गांवांचीं नांवें घेऊन ओरडत होत्या. उतारूही निरनिराळ्या खेड्यांचीं नांवें घेऊन तिकीटें विचारीत होते. बरेच लोक ज्याचें नांव घेत होतें अशा एका अप्रसिद्ध गांवाचीं दोन तिकीटें अभयनें घेतलीं. तीं तिकीटें त्याला सोडतीच्या तिकीटासारखींच वाटलीं. ज्या खेड्यांत आपण जाणार तिथें आपली कुणाची ओळख नाहीं, तिथें सोयी गैरसोयी काय आहेत हेंही आपल्याला ठाऊक नाहीं—त्याला आक्काच्या बोलण्याची आठवण झाली. ‘ घराबाहेर पडल्याशिवाय पुरुषांना घराची खरी किंमत कळत नाहीं ! ’

पण त्या खेड्यांतल्या धर्मशाळेंत घरापेक्षां कांहीं कमी नाहीं असें अभयला एकदोन दिवसांत वाटूं लागलें. तीन दगडांच्या चुलीवरली स्वतः केलेली भात आमटी त्याला घरच्याइतकीच गोड वाटली. लतेला फारसें कांहीं करतां येत नसलें तरी ती त्याच्याबरोबर एकसारखी लुडबुडत असे. त्या लुडबुडण्यानें अभयलाही आनंद होई.

लता बरोबर असल्यामुळें याच गांवांत पंधरा दिवस तरी रहायचें असें त्यानें ठरविलें. तिला घेऊन गांवोगांव भटकणें शक्य नव्हतें. शिवाय गांवाला

समुद्र होता, बागाईत होती, इंग्रजी तीन यत्तांची शाळाही होती. तेव्हां नरेंद्रानें वर्णन केलेल्या जीवनग्रंथाचीं दोन चार तरी पानें आपल्याला इथें वाचायला मिळतील अशी अभयच्या मनांत अपेक्षा उत्पन्न झाली.

पहिल्या आठच दिवसांत ती अपेक्षा बरीचशी सफळ झाली. गांवांतल्या प्रमुख सावकारांच्या दुकानांवर नारळाचा भाव पडल्याच्या गोष्टी व पैसे लावून चाललेला पत्त्यांचा खेळ यापेक्षां तिसरें कांहीं घडत नाहीं हें त्यानें पाहिलें. इंग्रजी शाळेच्या हेडमास्तरांनीं सध्यां सरकार ग्रँट देत नाहीं तरी आम्ही गांवाच्या उन्नती-करितां शिक्षणांत सर्व प्रकारच्या सुधारणा करीत आहों असें त्याला सांगितलें. गतवर्षी सात मुलांनीं इंग्रजी तिसरीबरोबरच व्हॅर्नक्यूलर फायनल परीक्षेचा अभ्यास केला आणि त्यांतले पांच पास झाले हें सांगतांना तर त्यांच्या मुद्रेवर विजयाचा आनंद नाचत होता.

पांढरपेशा वर्गांतल्या मध्यम स्थितीच्या लोकांत त्याला सर्वत्र निराशा पसरलेली दिसली. कुणी मॅट्रिक झालेला मुलगा बेकार आहे म्हणून रडत होता, तर कुणी मुली तीस तीस वर्षांच्या झाल्या तरी त्यांचीं लग्नें होत नाहींत म्हणून ओरडत होता. बहुतेक घरें छोट्या जमीनदारांचीं! मुंबईला नोकरी करणाऱ्या घरांतल्या माणसानें कांहीं पैसे पाठविले तरच यांच्या संसाराचा गाडा सुरळीत चालायचा! असें असून बहुतेक सर्व लोक रिकामे! कुठल्यातरी दुकानावर अगर लायब्ररींत जाऊन वर्तमानपत्रें वाचायचीं, त्यांतल्यात्यांत सर्व वर्तमानपत्रांतलीं भविष्यें अगत्य वाचायचीं, ही बहुतेक लोकांची करमणूक! या मंडळींत कांहीं कॉंग्रेसचे सभासद होते, एकदोघे खादीही वापरीत. पण त्यांनासुद्धां यापलीकडे आपलें कांहीं कर्तव्य आहे याची फारशी जाणीव नव्हती!

शेतकरी, कोळी, मजूर, हरिजन यांच्या झोंपड्यांतून अभय जसजसा फिरूं लागला, तसतसें त्याचें मन विलक्षण अस्वस्थ होऊं लागलें. या वर्गांतले पुरुष, बायका किंबहुना लहान मुलेंसुद्धां सकाळपासून संध्याकाळपर्यंत काम करीत.

पर्ण काम करूनही अंगावर धड वस्त्र नाहीं, कधीं कधीं पोटभर अन्न नाहीं अशी त्यांतल्या बहुतेकांची स्थिति होती. या लोकांना काम न मिळाल्यामुळें अनेकदां उपाशीं राहण्याची पाळी येते हेंही त्याच्या लक्षांत आलें. हे बहुतेक लोक आपल्या नशिबाला बोल लावीत. पांच मैलांवर असलेल्या दुसऱ्या एका खेड्यांत आक्का म्हणून एक बाई आहे. तिच्यासारखी बाई आपल्या गांवांत आली असती तर आपले इतके हाल झाले नसते, औषध नाहीं म्हणून आपलीं पोरेंबाळें तरी उपाशीं मेलीं नसतीं, असले उद्गार या लोकांच्या तोंडून अभयनें चार पांच वेळां ऐकले. त्या आक्काला पाहण्याची विलक्षण उत्सुकता त्याच्या मनांत उत्पन्न झाली.

अभय कोळ्यांच्या झोंपड्यांत गेला कीं लता समुद्राच्या किनाऱ्यावर जाऊन बसे. तो शेतकऱ्यांच्या झोपड्यांत गप्पागोष्टी करीत बसला कीं ही माडांच्या रायांत फिरे आणि वाऱ्यानें हलणाऱ्या चुडतांचें नृत्य एकाग्र दृष्टीनें पाहत राही. अशा वेळीं अभयला तिचा राग येई ! तो तिच्याशीं अबोलाच धरी. पण संध्याकाळीं धर्मशाळेंत परत आल्यावर दिवसां पाहिलेलीं दृश्यें त्याच्या डोळ्यांपुढें नाचूं लागत, त्याचें मन तडफडूं लागे, आणि मग मात्र लतेच्या हास्यांत, तिच्या स्पर्शांत, तिच्या दृष्टींत आपलें दुःख हलकें करण्याचें सामर्थ्य आहे असा विचार त्याच्या मनांत येऊन जाई. तो तिच्याशीं प्रेमानें बोलूं लागे, तीही त्याला गाणीं म्हणून दाखवी. मात्र ती दररोज नवी गोष्ट लिहीत असली तरी अभयला तिच्या गोष्टी वाचतांना पूर्वी जो आनंद होई तो आतां होईनासा झाला.

मधूनमधून लतेचा मोकळेपणा अतिरेकाला जातो असें त्याला वाटे. एकदां तीं दोघेंही समुद्रस्नान करायला गेलीं. लता ‘ बुडतें, बुडतें ’ म्हणून ओरडली. अभयनें जाऊन तिला घट्ट धरली. ती हंसली तेव्हां ही थट्टा त्याच्या लक्षांत आली. घरींही एखादी वस्तु त्याच्या हातांत देतांना ती उगीचच त्याचा हात आपल्या हातांत धरून ठेवी. पण लता जीवनांत रंगली नव्हती, तर नावीन्यांत गुंग झाली होती. आठ दिवसांनीं लतेला या आयुष्याचा कंटाळा येऊं लागला आहे असें अभयला दिसलें.

एके दिवशीं अभयला आलेलें प्रमिलेचें पत्र तिनें वाचायला मागितलें. अभयनें तें न देतां ' माणसाचीं कांहीं गुप्त पत्रं असायचींच ' असा तिला टोमणा मारला. त्यानें ती इतकी फुरंगटून बसली कीं सबंध दिवसांत ती आपणाहून त्याच्यापाशीं एक शब्दसुद्धां बोलली नाहीं. तिच्यासारख्या स्वप्नाळु सौंदर्यांत रममाण होणाऱ्या मुलीला खेड्यांतल्या भटक्या आयुष्यक्रमांत फार दिवस आनंद वाटणार नाहीं अशी अभयची खात्री होऊं लागली.

तिला कांहींतरी नवीन पहायला मिळावें म्हणून पांच मैलांवरल्या खेड्यांतल्या त्या परोपकारी आक्काला पहायला जायचें त्यानें ठरविलें. त्या गांवाला जायला मोटारीचा रस्ता नव्हता. त्यामुळें शेवटले तीन मैल लतेला चालतच जावें लागलें. ती आधींच दमून गेली होती. त्यांत अभयनें ज्या आक्काचें दर्शन घ्यायला तिला आणलें होतें ती अतिशय आजारी आहे असें तिला गांवाच्या सीमेवरच कळलें. इथूनच परत जावें असें तिच्या मनांत आलें. पण अभयला तसें सांगण्याचा धीर तिला झाला नाहीं. देवळापाशीं आक्काच्या झोंपडींभोंवतीं खूप गर्दी जमली होती. लंगोट्या लावलेले पुरुष, फाटक्या लक्तरांनीं आपल्या लज्जेचें रक्षण करणाऱ्या बायका, त्यांचीं उघडींनागडीं पोरें, साऱ्यांच्या मुद्रांवर दुःख दिसत होतें !

लतेच्या मनांत आलें--सबंध गांवाला ही बाई आपली आई आहे असेंच वाटत असलें पाहिजे. ही बाई पांढरपेशांतली असून पुष्कळ वर्षांपूर्वीं या खेड्यांत आली, आपले दागिने मोडून त्या पैशांतून ती गोरगरीबांना औषधें देऊं लागली, अशी अभय तिची माहिती सांगत होता. पाहिलेंच पाहिजे हिला.

पण अभयबरोबर लतेनें झोंपडींत प्रवेश करून मृत्युशय्येवरील आक्काकडे पाहिलें मात्र--तिनें झटकन् आपलें तोंड फिरविलें आणि अभय काय म्हणेल याचा विचारही न करतां ती बाहेर आली. बाहेर आल्यावर आंत पाहिलेल्या

दृश्यानें तिचें अंग पुन्हां शहारलें. तिचें मन म्हणत होतें--नखशिखान्त कोडानें पांढरी झालेली ही विद्रूप आक्का—छीः !

× × ×

अभय खूप वेळानें बाहेर आला. आपल्यासारखा पुण्यामुंबईकडला मनुष्य आपल्याला पहायला आला आहे हें कळतांच आक्काला किती आनंद झाला, तिनें आपला क्षीण हात उचलून आपल्या पाठीवरून कसा फिरविला, त्या हातावर गोंदलेलें ' देवदत्त ' हें नांव पाहून आपल्याला आश्चर्याचा झटका कसा बसला, हें सारें त्यानें मोठ्या उत्साहानें लतेला सांगितलें.

लता एकाच गोष्टीचा विचार करीत होती--तो विद्रूप पांढरा हात पाठीवरून फिरवून घेण्यांत अभयला आनंद वाटावा ! छीः !

सारे लोक आक्काला बरें वाटावें म्हणून देवाला गाऱ्हाणें घालण्याकरितां देवळांत गेले. गाऱ्हाणें घालतांना प्रत्येकाच्या मुद्रेवर जो भाव दिसत होता तो पाहून अभयला आक्काच्या कर्तृत्वाची खात्री पटली. औषधपाणी, सेवाचाकरी, भांडणें मिटविणें, या नाहीं त्या रूपानें आक्कानें त्या चिमुकल्या गांवांतल्या हरएक कुटुंबावर उपकार केले होतें, हें प्रत्येकाच्या चेहऱ्यावरून दिसत होतें. रात्र पडल्यामुळें परत जाणें कांहीं शक्य नव्हतें. एका शेतकऱ्यानें आपल्या झोंपडींत अभय आणि लता यांची झोंपण्याची सोय करून दिली. मध्यरात्रीपर्यंत अभय आपल्या गोणपाटावर जागाच होता. तो एकसारखा आक्काविषयीं विचार करीत होता. त्याचा डोळा लागला न लागला तोंच कुणीतरी आपल्याला हलवीत आहे असें त्याला वाटलें. पलीकडे निजलेली लता त्याच्याजवळ आली होती. ती थरथर कांपत होती.

' काय झालं ग ? ' अभयनें विचारलें.

' एक भयंकर स्वप्न पडलं मला ! '

' कोण आलं होतं तुझ्या स्वप्नांत ? वाघ कीं--

लता त्याचे दोन्ही हात घट्ट धरीत म्हणाली ' स्वप्नांत माझी मीच दिसलें मला ! '

' स्वतःची इतकी भीति वाटते तुला ? '

' पण—पण—माझं सारं अंग त्या आक्कासारखं विद्रूप झालं होतं ! '

× × × ×

दुसरे दिवशीं सकाळीं लतेनें परत जायचा हट्ट धरला. आक्काची शेवटची सेवा आपल्या हातून व्हावी या इच्छेनें अभयनें तिथेंच रहायचें ठरविलें.

रबरसुद्धां फार ताणलें म्हणजे तुटतें ! तशीच त्यांच्यामधल्या कोमल धाग्याची स्थिति झाली. लता एका मनुष्याची सोबत घेऊन रागारागानें जायला निघाली.

' धर्मशाळेंत जाऊन राहणार कीं पुण्या मुंबईकडे जाणार ? ' असें अभयनें विचारतांच ती उत्तरली ' मी वाटेल तिथं जाईन. तुम्हांला काय करायचंय् ? '

× × × ×

तीन दिवस अभय आक्कापाशीं बसून होता. त्याच्या मांडीवर डोकें ठेवूनच तिनें प्राण सोडला.

स्मशानांत सारें गांव तिच्या पायांवर डोकें ठेवून ढळढळां रडलें. अभयही तिला वंदन करण्याकरितां वांकला. इतक्यांत कुणीतरी म्हणालें,

' साहेब, त्या आल्या आहेत ! '

अभयनें मागें वळून पाहिलें—लता आणि एफ्. सूर्यराव ! या मानी मुलीनें इथून गेल्यावर या मनुष्याला आपल्याला घेऊन जाण्याविषयीं तार केली असावी हें अभयनें ताडलें.

लता कुर्ह्यानें म्हणाली ' मातृभूमीची नायिका तुमचा निरोप घ्यायला आली आहे ! '

अभयनें हंसून लतेला नमस्कार केला आणि आक्काच्या पायांवर डोकें ठेवलें.

# १५

# सहा महिने आणि सहा पत्रें

धर्मशाळेंतल्या आपल्या मकाणांत परत आल्यावर अभयला एकदोन दिवस लतेच्या कितीतरी गंमती आठवल्या—स्टोव्ह पेटवितांना ती एकदम जोरानें पंप करी, तेल वर येऊन भडका झाला म्हणजे तिच्या हातांतून पंप घेऊन आपण तिला म्हणत असूं ‘ तूं कशाला स्वतःला जाळून घेतेस ? तुझ्यासारख्या हुषार पोरीला सहज नवरा मिळेल ! ’ कोयत्यावर खोबऱ्याचे तुकडे करतां करतां एकदां आपलें एक बोट कापलें. तें रक्त पाहून लता गडबडली. बोट बांधण्याकरितां ती चांगलेसें फडकें शोधूं लागली. त्यावेळीं आपण तिला म्हटलें ‘ तुझं माझ्या-वर खरं प्रेमच नाहीं ! ’ हें ऐकून ती हिरमुसली झाली. मग आपण तिला द्रौपदीची गोष्ट सांगितली. कृष्णाची करंगळी कापली तेव्हां चटकन् आपला शालू फाडून तिनें ती जखम बांधली होती. लतेला ही गोष्ट सांगतांना आप-ल्याला प्रमिलेची आठवण कां व्हावी हें त्यावेळीं आपल्याला कोडें पडलें होतें. नाहीं कां ?

धर्मशाळेंत दोन महिने राहून अभय खेड्यापाड्यांतल्या गोरगरीबांच्या जीवनाशीं जसजसा समरस होऊं लागला तसतसें हें कोडें त्याला सुटूं लागलें. त्याचें मन माला, लता आणि प्रमिला यांची नव्या दृष्टीनें तुलना करूं लागलें. या तुलनेंतून निघालेला निष्कर्ष त्याला मोठा मार्गदर्शक वाटला. या तिघींत माला अत्यंत सुंदर होती. स्त्रीप्रेमाची कल्पना आल्यावर अभयला भेटलेली पहिली तरुणी तीच होती ! तिच्याविषयीं त्याच्या मनांत उत्पन्न झालेल्या प्रेमभावाला निसर्गच कारणीभूत होता. पण प्रेमाचा हा अंकुर वाढविण्याची शक्ति मालेंत नव्हती. त्यामुळें ती समोर असतांना माला हीच आपल्या हृदयाची स्वामिनी आहे असें जरी अभयला वाटे, तरी तो तिला लवकर विसरून जाई. आठ आठ दिवस तिची गांठ पडली नाहीं तरी त्याला चुकल्याचुकल्यासारखें होत नसें ! दिवसभर सेवाधर्माचें पालन करून रात्रीं धर्मशाळेंतल्या अंथरुणावर पडल्यावर अभयचें मन म्हणे ‘ माला एक सुंदर पुतळी आहे हेंच खरें ! ’

लगेच त्याच्यापुढें लतेची मूर्ति उभी राही. लता मालेइतकी रेखीव नव्हती. पण तिचें सौंदर्य अधिक सजीव होतें. पुण्याला पांचसहा दिवस आणि धर्मशाळेंत सात आठ दिवस असा अवघा पंधरवाडाच तिचा सहवास अभयला घडला होता. पण या पंधरा दिवसांत अभयला तिचें जेवढें आकर्षण वाटलें होतें, तेवढें गेल्या उभ्या वर्षांत मालेनें आपलें प्रेम प्रगट केलें असूनही त्याला वाटलें नव्हतें. या आकर्षणाचें मुख्य कारण केवळ शारीरिक सौंदर्य नव्हतें. गोष्टींतून चमकणारी लतेची कल्पकता, साध्या बोलण्यांतही अभिनयानें आपलें मनोगत मूर्तिमंत उभें करण्याची तिची शक्ति, सर्व सुंदर गोष्टींचें तिला असलेलें विलक्षण वेड—अभयचें मन म्हणे—‘ लता गंधर्वलोकांतली एक परी आहे हेंच खरं ! ’

लगेच त्याच्यापुढें लता निघून गेली तो दिवस उभा राही ! जवळजवळ वीस वर्षे एका खेडेगांवाच्या सेवेला वाहून घेणाऱ्या आकाच्या हृदयाचें सौंदर्य

लतेच्या लक्षांत आलें नाहीं. तिला कोडानें विद्रूप झालेलें तिचें शरीर तेवढें दिसलें. खुळी पोर! जग काय नुसत्या सौंदर्यानें भरलेलें आहे? त्याला वाटे—गिरणीच्या पट्ट्यांत हात सांपडलेला मनुष्य पहायला लता तयार होणार नाहीं. त्याच गिरणींत तयार झालेलें सुंदर पातळ मात्र ती हांसत नेसेल! लतेंत मालेपेक्षां बुद्धीचें सौंदर्य अधिक आहे. पण असलें दुबळें सौंदर्य यक्षलोकांत चालेल. जिथें पदोपदीं अज्ञानाशीं, दारिद्र्याशीं, दुबळेपणाशीं आणि दुष्टपणाशीं लढाई करायला हवी, अशा या सध्यांच्या जगांत त्याचा काय उपयोग आहे?

लतेच्या दुबळेपणाशीं तुलना करितां करितां त्याला कावेरी, प्रमिला, ज्योति आणि आपली आक्का यांची आठवण होई. कावेरी सुंदर होती. एवढेंच नव्हे तर आजोबांच्या आजारांत तिच्या मनाची शक्ति किती मोठी आहे हेंही दिसून आलें होतें. पण तिच्याविषयीं विचार करतांना अभयच्या मनांत एक प्रश्न पुनःपुन्हां उभा राही. आजोबांविषयींची कावेरीची ही भक्ति पूर्वीं कुठें गेली होती? चारूलासुद्धां ती किती हिडिसफिडीस करीत असे, तिचा नट्टयापट्टयाचा सोस, उपभोगाची हौस, या सान्या गोष्टी दुबळेपणाच्याच द्योतक नव्हत्या कां? आपल्याला जें आयुष्यांत मिळणें शक्य नाहीं त्याच्यासाठीं झुरणें हें दुबळ्या मनाचेंच लक्षण आहे!

लगेच त्याची न्यायबुद्धि म्हणे—कावेरीच्या या दुबळेपणाची जबाबदारी तिच्यावर लादणें म्हणजे चोर सोडून संन्याशाला सुळीं देण्यासारखें होईल. तिच्या आयुष्यांत उदात्त असें काय आलें होतें? बळजबरीनें झालेलें लग्न, सृष्टिक्रमानें झालेला मुलगा—छेः! कावेरीचा दुबळेपणा ही तिच्या करारी मनाची दुसरी बाजू असली पाहिजे. दुर्दैवानें तीच आपल्याला नेहमीं दिसत होती! आजोबा अर्धांगानें अंथरुणाला खिळले नसते तर—तर एक दुबळी सामान्य स्त्री म्हणूनच आपण तिच्याकडे पहात राहिलों असतों! छेः! संधि मिळाली असती तर तीही प्रमिलेसारखी—

प्रमिलेची आठवण झाली कीं अभयला स्वतःचें हंसूं येई. मालेच्या घरीं जाऊं लागल्यासून इतरांबरोबर त्यानेंही प्रमिलेच्या सौंदर्याच्या अभावाची चेष्टा केली होती. मालेची धाकटी बहीण या दृष्टीनेंच तो तिच्याकडे पाहत असे, हें खरें–पण आपल्या एखाद्या मित्राला ही मुलगी करून घे असें म्हणायला त्याचें मन वर्षापूर्वी मुळींच तयार झालें नसतें. आतां मात्र--

आतां त्याचें मन प्रमिलेच्या व्यक्तित्वानें आकृष्ट केलें होतें. घरीं पाहुणे आले कीं स्वयंपाकापासून वाढण्यापर्यंत ती आईला हातभार लावी. घरीं कुणी आजारी असलें तर त्याची शुश्रूषा करूनही ती वर्गांतला आपला पहिला नंबर टिकवी. घरीं आई अंथरुणावर असतांनाही मॅट्रिकच्या परीक्षेंत तिचा पन्नासाच्या आंत नंबर आला होता. अभ्यास इतका चांगला असूनही पुस्तकांतला किडा होऊन राहणें तिला कधींच आवडत नसे. हाताला मिळेल तें पुस्तक वाचायचें, त्याच्यावर विचार करायचा, त्यांतले उतारे टिपून ध्यायचे, इत्यादि गोष्टींत तिला केवढा आनंद वाटे. त्याच्या मनांत येई–कॉलेजांतल्या पहिल्या वर्षांतल्या कितीशा मुली No Pasaran, Cofessions of an Average Man, The mind in Chains असलीं पुस्तकें आवडीनें वाचतील ? प्रमिला सौंदर्याची माला नाहीं, कल्पकतेची कल्पलताही नाहीं ! पण तिचें विकास पावणारें व्यक्तित्व किती मोहक आहे, किती तेजस्वी आहे !

प्रमिलेच्या या व्यक्तित्वाचा अभयला दर आठवड्याला अधिक अधिक साक्षात्कार होऊं लागला. ती नवीं नवीं पुस्तकें वाचून आपल्या पत्रांतून त्याला शंका विचारी, कॉलेजांतले आणि बाहेरचे अनेक प्रसंग वर्णन करून त्यांच्यावर टीका करी, आणि मधून मधून ‘ तुम्ही तिकडे एकटे असला तरी तुमचे जेवणाचे हाल होत नाहींत अशी माझी खात्री आहे. कारण सांगू कां ! मी पानावर बसलें कीं तुमची आठवण करतें. आणि मनांतल्या मनांत तुम्हांला नैवेद्य दाखवितें. नैवेद्य न खातां देवाचें पोट भरतें ना ? मग तुमचेंही भरायलाच हवें ! ”

असें कांहींतरी गंमतीनें लिही. या पत्रामुळेंच माला आणि लता यांच्यापेक्षां प्रमिला अभयला अधिक जवळची वाटूं लागली.

आक्काचेंही दर आठवड्याला पत्र येई. पण तिचें एकही पत्र प्रमिलेप्रमाणें तन्मयतेनें लिहिलेलें नसे. प्रत्येक पत्रांत तोच तोच ठराविक मजकूर असायचा– ‘ प्रकृतीला संभाळून रहा ! गोरगरीबांची सेवा करणं वाईट नाहीं. पण टायफॉईडसारखे रोग सांसर्गिक असतात. तेव्हां तसल्या रोग्यांच्यापाशीं बसत जाऊं नकोस. प्रमिला एक दिवसाआड माझ्या गोष्टीला येऊन बसते. शिवाय खुन्या मुरलीधराच्या देवळांत काशीच्या एका पंडितांची प्रवचनेंही सुरू आहेत. त्यामुळें माझा वेळ सहज निघून जातो. एखादे वेळीं कंटाळा आला तर चारु आहेच कीं ! गुलाम ‘ अभयदादा वाघाची शिकार करून कधीं येणार ? ’ म्हणून दररोज विचारतो. कावेरी आजोबांची सेवा मनापासून करते. तिचे डोळे फार उशीरां उघडले. आजोबा कांहीं या दुखण्यांतून उठतील असें दिसत नाहीं. माणूस असेपर्यंत त्याची किंमत कळत नाहीं हेंच खरें. बाकी आजोबांचें दुखणें कावेरीनें जीवाला फार लावून घेतलें आहे असें दिसतें. ती कुणाशीं फार बोलत सुद्धां नाहीं आतांशीं ! तूं असतांना तो मोतिराम आजोबांच्या बिऱ्हाडीं तासतास बसत असे. पण आतां तो फारसा फिरकतही नाहीं. आणि आलाच तर कावेरीशीं पांच दहा मिनिटें बोलून माझ्याकडेच येऊन बसतो. लतेची आई भेटली होती. तूंच लतेला एका चित्रांत काम करून पहायला सांगितलें आहेस असें ती म्हणत होती ! ’ या गोष्टीपलीकडे तिच्या आठदहा पत्रांत कांहींच नव्हतें !

ज्योतीचीं पत्रें अनियमितपणें येत आणि बहुधा लहान असत ! पण त्यांतलें एखादेंच वाक्य चारचार दिवस अभयला आठवत राही. नरेंद्राला मधून मधून ताप येतो ही गोष्ट अभयला कळवितांना तिनें लिहिलें होतें—‘ मला मधून-मधून थट्टा करण्याची लहर येते ना ? तसा त्याला ताप येतो ! ’ मनुष्य म्हणून

जगण्याचा आपला हक्क आहे ही जाणीव किसानांत आणि कामकऱ्यांत तीव्र झाल्याखेरीज आजचे प्रश्न सुटणार नाहींत, हा आपला अनुभव सांगतांना तिनें एक विचित्रच दाखला दिला होता—' मूल झालं कीं आईला आपोआप पान्हा फुटतो. क्रांतीमागून प्रगती तशीच येते. पण गांधींना नि गांधीछाप काँग्रेसला या बाळंतपणाच्या वेदनावांचून पुत्रसुख पाहण्याची इच्छा आहे. त्यांच्या अलीकडच्या चळवळी म्हणजे वांझेनें कचकड्याची बाहुली पाजायला घेण्यांतला प्रकार आहे झालं ! '

ज्योतीच्या पत्रांतले असले विचार वाचले कीं एका खेड्याची वीस वर्षे सेवा केलेल्या त्या आक्काची अभयला आठवण होई. बाजाराला आलेले त्या खेड्यांतले लोक आक्का गेल्यामुळें आपल्या मुलाबाळांचे औषधपाण्याचे कसे हाल होत आहेत हें त्याला नेहमीं सांगत. तें ऐकले कीं त्याला वाटे—त्या आक्कानें आपलें आयुष्य किती सार्थकीं लावलें. नाहींतर आपली आक्का--त्यागाच्या दृष्टीनें त्या आक्काएवढीच मोठी. पण आपल्या आक्काचा सारा त्याग एका कुटुंबाकरितां झाला—त्या कुटुंबाला भोग मिळावा म्हणूनच झाला. आपल्या भावानें त्याग करावा ही कल्पनासुद्धां तिला आतां पटत नाहीं !

ती आक्का--आपली आक्का--ज्योति—तिघींतही एकाच प्रकारचें तेज असलें पाहिजे. पण--अवघें एक घर प्रकाशित करण्यापलीकडे आपल्या आक्काचा उपयोग झाला नाहीं, एका गांवाला प्रकाश देण्यापलीकडे त्या आक्काचा उपयोग झाला नाहीं. ज्योति तेवढी--

ज्योति कशी दिसत असेल ? मालेसारखी ? लतेसारखी ? छेः ! प्रमिलेसारखी ?

कर्तृत्वाचा सौंदर्याशीं कांहीं संबंध नाहीं हें कळत असूनही अभयच्या डोळ्यांपुढें ज्योतीची जी मूर्ति उभी राही ती सुंदरच असे.

× × × ×

हीं स्मृतिचित्रें आणि कल्पनाचित्रें त्याची विश्रांतीच्या वेळची करमणूक होऊन बसली. सकाळपासून संध्याकाळपर्यंत तो बाहेर फिरत असे. कोळी, शेतकरी, मजूर, हरिजन यांच्या घरीं जायचें, त्यांच्याशीं सुखदुःखाच्या गोष्टी बोलायच्या, कुणी आजारी असलें तर त्याला औषधपाणी सुचवायचें हा त्याचा नित्याचा कार्यक्रम होता. रांपण घालायला जाणाऱ्या कोळ्यांबरोबर तो अनेकदां होडींतून जाई, पोटाकरितां दररोज समुद्राच्या अक्राळ विक्राळ जबड्यांत नाचत जाणाऱ्या त्या खेडवळ जीवांच्या धिटाईचें त्याला कौतुक वाटे. शेतकऱ्यांबरोबर वायंगण लावायलाही त्यानें कमी केलें नाहीं. चार कुडव तांदूळ पदरांत पडण्याच्या आशेनें उन्हाळ्यांतलें हें भात शेतकरी किती कष्टानें पिकवितो हें जेव्हां त्यानें डोळ्यांनीं पाहिलें तेव्हां नरेंद्रानें ‘ जीवनग्रंथ घरांत बसून कुणालाही वाचतां येत नाहीं ’ असें कां लिहिलें होतें याची त्याला कल्पना आली. नारळाच्या झाडावर चढण्याचा त्यानें एकदोनदां प्रयत्न केला. पण त्या कामाचा अवघड-पणा त्याला लवकरच कळला. त्यामुळें एखाद्या बागेंत नारळाचें पाडप सुरू असलें कीं पायांत दोर अडकवून आणि कंबरेला कोयता लटकावून झपाझप झाडावर चढणाऱ्या माणसाकडे तो पाहतच राही.

शिरोड्याला जाऊन त्यानें रखरखणाऱ्या उन्हांत मिठागरांत कष्ट करणारीं माणसें पाहिलीं, वेंगुर्ल्यासारख्या ठिकाणीं चारचार मैलांवरून भाज्यांनीं भरलेल्या जड टोपल्या घेऊन येणाऱ्या किरिस्तांवणी पाहिल्या आणि रात्रभर जागून बेळगांवहून अगर कोल्हापुराहून माल घेऊन येणाऱ्या गाडीवानांच्या बरोबरही त्यानें गोष्टी केल्या. त्याला एक गोष्ट पुरी कळून चुकली—समाजांत बेगडी देवांची पूजा होत आहे. आणि खरे देव देव्हाऱ्याबाहेर पायांखालीं तुडविले जात आहेत.

हळुहळु या कटु अनुभवांतला नवीनपणा कमी झाला. पण प्रमिलेला पत्र लिहायच्या वेळीं तो जेव्हां त्या आठवड्यांत अनुभवलेल्या प्रसंगांची आठवण करूं लागे, तेव्हां विविध सामाजिक अन्यायाच्या स्मृतींनीं त्याच्या मनाला झालेल्या

जखमा अधिकच खोल होत. आसपासच्या एक दोन नव्या खेड्यांत तो दर आठवड्याला जाऊन येई. या छोट्या प्रवासांतही आपल्या समाजांत माणुसकी किती कमी झाली आहे, याचें एखादेंदुसरें दृश्य त्याच्या दृष्टीला पडे. एका खेडेगांवांत देवळाच्या जीर्णोद्धाराकरितां दोन हजार रूपये जमले होते. मात्र उन्हाळ्यांत महारांना प्यायलासुद्धां पाणी मिळत नाहीं याची दाद कुणीच घेत नव्हतें. डॉक्टराला द्यायला पैसा नाहीं म्हणून एका गरीब आईनें आपलें मूल तापानें तडफडत असून कांहीं उपाय केला नाहीं, हें त्यानें डोळ्यांनीं पाहिलें. तें मूल मेल्यावर तिनें एवढेच उद्गार काढले ‘ तेंही सुटलें नि मीही सुटलें ! आतां कांहीं पुन्हां मरणार नाहीं तें !’

या अनुभवांनीं हळुहळु त्याची झोंप नाहींशी झाली. आठवड्यामागून आठवडे आणि महिन्यामागून महिने जात होते. पण अभयच्या डोक्यांत एकच विचारचक्र सुरू होतें—‘ आपण आतां काय करायचें ? ’

दत्तोपंतांचें मधेंच ‘ तुम्ही परत केव्हां येणार ? वकिली केव्हां सुरू करणार ? अशा अर्थाचें पत्र आलें. अभयनें त्याचें उत्तर पाठविलें ‘ मी वकिलीच करणार आहे. पण ही कोर्टांतली वकिली नाहीं, समाजांतली आहे. आजच्या समाजांत खरे गुन्हेगार मोकळे आहेत. ते बंगल्यांत राहतात, मोटारी उडवितात, चैनी करतात. त्यांच्या गुन्ह्यांची शिक्षा मात्र दुसऱ्याच निरपराधी लोकांना भोगावी लागत आहे. या निरपराधी लोकांचें मी वकीलपत्र घेणार आहे ! ’

पुढें कांहीं दिवसांनीं आजोबा एकाएकीं वारल्याचें आक्काचें पत्र आलें. ‘सुटले बिचारे !’ असें तिनें पत्रांत लिहिलें होतें. अभयच्या डोळ्यांत आजोबांच्या आठवणीनें पाणी उभें राहिलें. तो समुद्राच्या किनाऱ्यावर एका बाजूला जाऊन बसला. मन थोडेसें हलकें झाल्यावर त्यानें आजोबांच्या आत्मचरित्रांतला तो कागद अक्षरशः वाचला. त्याला भास झाला—आजोबा हंसून आपल्याला म्हणत

आहेत, ' खुर्दा जाऊं दे, मोहरा हरवूं देत ! तेवढे दोन मोतीं मात्र गळूं देऊं नकोस--ध्येयावरली भक्ति आणि दुसऱ्याचं दुःख जाणण्याची शक्ति ! '

मनांतल्या या वादळापुढें भोंवतालच्या सृष्टींतले बदल आणि वर्तमानपत्रां-तल्या विविध बातम्या यांच्याकडे अभयचें फारसें लक्षच जाईना. काजूंच्या झाडांवर तांबडे पिवळे बोंड्र लटकूं लागलेले त्यानें पाहिले. बाजारांत येणाऱ्या सुरंगीच्या फुलांच्या माळांभोंवतीं भुंगे किती जमतात हेंही त्यानें पाहिलें. लुसलुशीत शेंगांची आणि फणसाची भाजी त्याला शेतकऱ्यांच्या घरीं केव्हांतरी खायला मिळूं लागली. पुढें पिकलेल्या फणसांचा वास बाजारांत पसरूं लागला. जणुं कांहीं हिरव्या चांफ्यांच्या राशीच्या राशी कुणीतरी आणल्या आहेत आणि त्या फुलांचा हा वास आहे अशी कल्पना यावेळीं अभयच्या मनांत येऊन गेली. त्याला वाटलें—फळांफुलांचीं हीं रम्य दृश्यें लतेला फार आवडलीं असतीं ! कोंकणांतल्या खेड्यांत जाण्याची कल्पना तिनेंच सुचविली होती. पण इथल्या प्रत्येक खेड्यांत जेवढें सृष्टीचें सौंदर्य आहे, तेवढेंच जीवनाचें दारिद्र्य आहे याची तिला कल्पना तरी असेल कां ?

त्याला हंसूं आलें--लता आपल्याबरोबर राहिली असती तरीसुद्धां तिलाही कल्पना आली नसती हा विचार त्याच्या मनांत आला. त्याला वाटलें—तिनें सुरंगीच्या माळा माळल्या असत्या, पिकलेल्या फणसाचा एखाद्या लहान मुला-प्रमाणें वास घेतला असता, वालीच्या हिरव्या शेंगा खाल्ल्या असत्या, आणि फार फार तर त्यांच्यावर दोन रूपककथा लिहिल्या असत्या. लता हें फुल-पांखरू आहे. तिला या जगांतल्या कांट्यांची कधींच कल्पना यायची नाहीं. एका फुलावरून दुसऱ्या फुलावर—

ही फुलाची कल्पना मनांत येतांच लतेचे वर्तमानपत्रांत आलेले दोन तीन फोटो अभयला आठवले. ' मातृभूमि ' चित्रांत तिचें काम किती सुंदर होत आहे या विषयींच्या बातम्या वर्तमानपत्रांत नेहमीं येत असत. त्या बातम्यां-

खालीं केव्हांतरी चित्रांतल्या तिच्या भूमिकेचा फोटोही येई. प्रत्येक फोटोंत तिचें शारीरिक सौंदर्य उठून कसें दिसेल याकडेच मुख्यतः लक्ष दिलेलें दिसे. एका फोटोंत तर ती ओलेती असून तिच्या पाठीवरला पदर गळून बाजूला पडला आहे असें दाखविलें होतें.

लतेचे असले फोटो पाहून वर्तमानपत्रांवर अभय खूप रागावला होता. इतके दिवसांत त्यांनीं चांगली अशी एकच बातमी त्याला आणून दिली होती! ती म्हणजे प्रमिला पहिल्या वर्गांत पास झाली ही! ती वाचतांना त्याच्या मनांत आलें—आतां आपण तिला बक्षीस द्यायला हवें! काय बरं मागेल ती आपल्या-कडे? एखादें सुंदर पुस्तक?

'मी मागेन तें बक्षीस द्याल?' हा प्रश्न करणारी प्रमिलेची मूर्ति डोळ्यांपुढें पुनःपुन्हां उभी करण्यांत त्याला आनंद होऊं लागला.

× × × ×

अभयला पुणें सोडल्याला सहा महिने होत आले. त्याचें मन म्हणूं लागलें--नरेंद्रानें सांगितल्याप्रमाणें आपण लक्ष लावून जीवनग्रंथाचीं कांहीं पानें वाचलीं--अगदीं पारायण केलें त्यांचें! पण या पारायणाची फलश्रुति काय?

सात वर्षांत शरीर बदलतें म्हणतात. पण आपली जगाकडे पाहण्याची दृष्टीच या सहा महिन्यांत बदलून गेली. आपली कॉलेजांतली सुधारणेची कल्पना—सुधारणा म्हणजे प्रीतिविवाह, सहभोजन—छेः! सामाजिक मनाची कल्पनाच आपल्या समाजाला नाहीं. ती आधीं निर्माण केली पाहिजे. रानटी स्थितींतून पुढें येतांना ज्या कौटुंबिक, सामाजिक आणि आर्थिक कल्पना समा-जाला हितकारक झाल्या त्यांनींच आपला आजचा समाजहि बांधला गेला आहे. मनाची वल्कलें सोडायला कांहीं आपण अजून तयार नाहीं. रानटी काळांत माणसें पशूंसारखीं जगतात. दुबळ्यानें बलाढ्याच्या भक्ष्यस्थानीं पडायचें हीच नीति त्यावेळीं प्रचलित असते. पण महाभारतासारखे ग्रंथ, शाकुंतलासारखीं

नाटकें, शिवाजीसारखे योद्धे आणि तुकारामासारखे संत होऊन गेले तरी अजून आपल्या समाजावर त्याच पुराण्या नीतीचा पगडा कायम असावा हें केवढें आश्चर्य आहे. पन्नास वर्षांपूर्वींच्या सुधारकांनीं जातीविरुद्ध अकांडतांडव केलें तें ठीक होतें. पण रोटी व्यवहार सर्रास होण्यापेक्षां सर्वांना रोटी मिळण्याचा प्रश्न अधिक महत्त्वाचा नाहीं कां ? बेटीव्यवहाराला निर्बंध असूं नयेत यापेक्षां स्त्रीला दारिद्र्यामुळें शील विकण्याची पाळी येऊं नये, लहान मुलें अन्नाच्या अथवा औषधाच्या अभावीं मृत्युमुखीं पडूं नयेत ही गोष्ट अधिक महत्त्वाची नाहीं कां ? पण पांढरपेशांच्या साऱ्या सुधारणा वैय्यक्तिक मनांतून स्फुरतात. सामाजिक मनच त्यांना असत नाहीं. जिथें एक वर्ग दुसऱ्या वर्गाला गुलामगिरींत ठेवतो, जिथें बुद्धीच्या अथवा शरीराच्या श्रमाची किंमत आळशी मिरासदारीपेक्षां हलकी मानली जाते, सत्ता आणि संपत्ति या कात्रींत गरीबांच्या चिंधड्या उडत असल्या तरी जिथें समाजदेवता तें हूं कीं चूं न करतां पाहते--

गांधीवाद ! गांधींनीं बहुजनसमाजाला साधेपणानें अंकित केलें. अन्न, वस्त्र राहणी या साऱ्या गोष्टींत गरीबांना जवळचीं वाटणारीं माणसेंच त्यांच्या मनांत क्रांतीचीं बीजें टाकूं शकतील. पण गांधींना क्रांति कुठें हवी आहे ? यंत्रयुगानें निर्माण झालेले प्रश्न ते पोथ्यापुराणांतल्या तत्त्वज्ञानानें सोडविण्याचा प्रयत्न करीत आहेत ! व्यक्तीचे प्रश्न आत्मिक असूं शकतील; पण समाज आत्मिक तत्त्वज्ञानावर जगत नाहीं ही गोष्ट गांधींच्या गांवींही नाहीं. मद्यपानबंदीइतकेंच संततिनियमनाचें ज्ञान गरीबांना करून देणेंही आवश्यक आहे. पण गांधी गरीब जोडप्यांना सल्ला देणार—तुम्हीं भावाबहिणींप्रमाणें रहा. गांधींना हृदय आहे; पण सामाजिक मन नाहीं ! समाजांतल्या सामान्य माणसाचें सुखदुःख त्यांना त्याच्या दृष्टीनें पाहतांच येत नाहीं !

समाज सुखी करायला आधीं सामाजिक मन निर्माण केलें पाहिजे. मानवी हक्कांकरितां झगडायला, लढायला, प्रसंगीं मरायलाही ज्यावेळीं दलित वर्ग तयार होईल त्याचवेळीं आजचे बिकट प्रश्न सुटतील.

सामाजिक मन जागृत करायचें हेंच आपल्या पिढीचें पहिलें कर्तव्य आहे, असें अभयनें ठरविलें तेव्हां कुठें त्याच्या डोक्यांत थैमान घालणारें वादळ थोडेसें शांत झालें.

× × × ×

पुण्याला जाऊन आक्काला भेटून यावें व नंतर आपल्या कामाला सुरुवात करावी असा त्यानें विचार केला. इतक्यांत त्याच्या हातांत एके दिवशीं सहा पत्रें पडलीं. त्यांतल्या दोन पत्रांवरचें अक्षर त्याला अगदींच अपरिचित होतें. म्हणून त्यानें तीं बाजूला ठेवलीं.

त्यानें प्रथम ज्योतीचें पत्र उघडलें. तिनें लिहिलें होतें—

'स्पेनमध्यें कामगारांच्या पक्षाचा पराभव झाला हें ऐकल्या दिवसापासून नरेंद्रानें अंथरुण धरलें आहे. त्याच्या तापाचें लक्षण कांहीं बरें दिसत नाहीं. किती फिकट झाला आहे तो! भाई अभय, त्याला भेटायला तूं येशील कां? खूप खूप आनंद होईल त्याला. त्याचें सारें काम मी करतें--पण हल्लीं मलाही चालणें, बोलणें, जाग्रणें करणें सोसत नाहीं. पंधरा दिवसांपूर्वी तुला एक आनंदाची गोष्ट कळवायचें नरेंद्रानें ठरविलें होतें. पण या बारा दिवसांत तो अंथरुणावरून उठलाच नाहीं. त्याची शक्ति पळापळाला कमी होत आहे. कुठल्या तरी चांगल्या डॉक्टराला त्याची प्रकृति दाखवावी म्हणतें. त्याला बरें वाटलें तर ती आनंदाची बातमी मी सुद्धां तुला कळवीन हं!'

दुसरें पत्र आक्काचें होतें--

'तुला जाऊन सहा महिने झाले. जूनपासून मुंबईंत एका मोठ्या वकिलाच्या हाताखालीं तुला काम करायला मिळेल असें वाटतें. तरी पत्र हातांत पडतांच निघून ये!'

लतेचें पत्रही असेंच त्रोटक होतें--

'अभय, मातृभूमीचा हा दुसरा आठवडा ! एकाच आठवड्यांत मी किती लोकप्रिय झालें आहे म्हणून सांगूं ! रस्त्यानें माझी मोटार जाऊं लागली कीं—तुम्हांला कळायचें नाहीं तें ! पण माझें चित्र पहायला एकदां मुंबईला याल कीं नाहीं ?'

पुढचें पत्र मालेचें होतें. अभय तें उघडतांना साशंक झाला. इतके दिवसांनीं मालेचें आपल्याला एकदम पत्र कां यावें ही त्याला आलेली शंका निराधार नव्हती. मालेचें कांचनशीं लग्न ठरलें होतें. लग्न होतांच कांचनबरोबर ती कानपूरला जाणार होती. देवदत्तांच्या ओळखीनें त्याला तिथल्या एका गिरणींत मोठ्या पगाराची नोकरी मिळाली होती. पत्राच्या शेवटीं मालेनें लिहिलें होतें—

'अभय, गौरीहर पूजल्यानंतर तुमच्यावर माझें प्रेम होतें हें बोलून दाखविणें पाप ठरेल. मी हें पत्र आधींच लिहून टाकीत आहे.

तुमच्यावर प्रेम असूनही माझें कांचनांच्यावर कसें प्रेम बसलें याचें माझें मलाच नवल वाटतें. एकाच वेळीं दोघांवर प्रेम करणें हें पाप आहे. असेल ! पण अशक्यच खास नाहीं.

खरं सांगूं ? पहिल्यापासून तुमची भीति वाटत होती मला ! एका रूपाखेरीज माझ्यापाशीं दुसरें काय आहे ? कांचन तुमच्या मानानें कितीतरी दुबळे आहेत. त्यामुळें त्यांची मला अशी भीति वाटली नाहीं. तुम्ही कोंकणांतल्या खेड्यांत कसे राहतां, काय करतां हें प्रमिला वरचेवर सांगे—त्यानें तर माझी भीति अधिकच वाढली. तुम्ही समुद्रांत पोहणारे शूर पुरुष आहांत—मी तीरावर बसून वाळूंत घर बांधणारी अल्लड मुलगी आहे ! मला तुमच्याबरोबर उडी टाकायचा धीर कसा व्हावा ?

एवढें एकच कारण असतें तर माला तुमच्या मूर्तीची पूजा करीत जन्मभर कुंवार राहिली असती ! पण कांचनच्या वैभवाचा मोह मला भुलवीत होता आणि त्यांतच—

बाबांनीं काकांचें म्हणणें ऐकलें नाहीं, मंत्रिमंडळांत कुणालाही भीड घातली नाहीं. शेवटीं व्हायचें तेंच झालें. काकांची नोकरी गेली. ते आतां पैसुद्धां पाठवीत नाहींत आम्हांला. मागच्या पैशांबद्दल बाबांवर फिर्याद करणार आहेत म्हणे ते ! बाबांनीं सारा जन्म खादीच्या आणि हरिजनांच्या कामांत काढला. प्रपंचाचा एवढा मोठा पसारा संभाळायला लागणारा पैसा त्यांनीं कुठून आणायचा ? मी कुंवार राहून कांहीं बाबांची ही चिंता दूर होणार नव्हती !

कांचनाशीं लग्न करण्याचें हें कारण तुम्हांला खरें वाटेल ना ? कांहीं वाटो तुम्हांला ! माला दुबळी आहे, खुळी आहे हें खरें. पण तिचें अभयवर प्रेम होतें हेंही तितकेंच खरें !

डोळयांत पाणी उभें राहिलें आहे. पत्रावरलीं अक्षरेंच दिसत नाहींत तेव्हां—

तुमची असलेली—

पण तुमची नसलेली

**माला—'**

अभयनें खिन्नपणानें हंसत पुढलें पत्र उघडलें. त्यांत एवढाच मजकूर होता--

' मी मोठ्या संकटांत आहे. संकटांत बहिणीनें भावाच्या तोंडाकडे पहायचें नाहीं, तर काय करायचें ? लवकर याल का ?

' अभागी--**कावेरी** '

अभयला या योगायोगाचें नवल वाटलें. प्रत्येक पत्र त्याला खेड्यांतून हेर बोलावीत होतें.

शेवटचें अनोळखी अक्षराचें पत्र त्यानें फोडलें. त्यानें सही पाहिली--तैची आई.

आरंभींच तिनें लिहिलें होतें--

'अभय, एक आई तुमच्यापुढें पदर पसरून भीक मागत आहे. ही आई पापी आहे. पण ती पापी आहे म्हणूनच तिला आपल्या मुलीच्या आयुष्याची अधिक भीति वाटायला लागली आहे.

अभय, सहा महिन्यांत लता इतकी हाताबाहेर गेली आहे कीं—

असाल तसे निघून या. एका आईच्या तळमळणाऱ्या हृदयासाठीं, निदान तुमच्या लतेसाठीं तरी या!'

# १६

# रक्तांत भिनलेलें विष

बोट चांगलीच हलत होती. पण अभयचें मन तिच्याहूनही अधिक हलत होतें. एकदां त्याला वाटे—बायका फार भित्र्या असतात. चांदण्यांतल्या सावल्या त्यांना भुतांसारख्या भासतात. लता त्या एफ्. सूर्यरावाबरोबर मोटारींतून फिरत असेल, एखाद्या नटाशीं हंसतखेळत बोलत असेल आणि पराचा कावळा करणारे लोक हें पाहून तिच्याविषयीं वाटेल तें बडबडत असतील. समाजाचे डोळे लहान मुलाच्यासारखे असतात. तान्ह्या मुलाला एकदम प्रकाशांत नेलें कीं तें जसें डोळे मिटून घेतें, तशी कुठलीही नवी गोष्ट पाहिली कीं समाजाची स्थिति होते. लता नटी झाली म्हणून त्यांत भिण्यासारखें काय आहे एवढें मोठें ?

लगेच त्याचें मन दुसऱ्या टोंकाला झुके ! त्याला वाटे--समाजांत स्त्री अजून सुरक्षित नाहीं. रानटी पुरुषाच्या कामुकतेनें सध्यां सभ्य स्वरूप धारण केलें आहे हें खोटें नाहीं. एकदम एखाद्या स्त्रीचा हात धरून पुरुष पूर्वीप्रमाणें

तिला पळवून नेत नाहीं. पण तिच्या दारिद्र्याचा किंवा दुबळेपणाचा फायदा घ्यायला तो नेहमीं तयार असतो. सत्ता आणि संपत्ति यांचीं जाळीं पसरून ठेवलीं कीं त्यांत अल्लड हरिणाक्षी सहज सांपडतात. याचें प्रत्यंतर मजुरांच्या गिरण्यांपासून सुशिक्षितांच्या शाळाकॉलेजांपर्यंत सर्वत्र येतें. वेळोवेळीं कानांवर आलेल्या असल्या कितीतरी करुणकथा आगबोटीच्या कठड्यापाशीं विमनस्कपणें उभ्या राहिलेल्या अभयला आठवल्या.

त्याच्या मनांत विलक्षण अस्वस्थता उत्पन्न झाली. लतेला सिनेमांत जाऊन जवळ जवळ सहा महिने झाले. चित्रपटसृष्टि म्हणजे मोहाचें आगर—दुसरी यमसभाच ! लतेसारख्या अष्टौप्रहर स्वप्नसृष्टींत वावरणाऱ्या मुलीला यमसभेंत जिथें पाणी दिसतें तिथें दगड असतात हें कळणें शक्य आहे काय ? आणि हें न कळल्यामुळें ती फसली असली तर—

लतेच्या आईच्या पत्रांतली भीति सर्वस्वीं निराधार नाहीं हें अभयला मनांतल्या मनांत कबूल करावें लागलें.

× × × ×

मुंबईंत उतरल्याबरोबर एका कोंपऱ्यावर ' मातृभूमि ' चित्रपटाचें एक मोठें पोस्टर अभयला जातां जातां दिसलें. तो त्या चित्राकडे पाहतच राहिला ! लतेचें चित्र होतें तें ! विशाल डोळे आणि गालावरली खळी हे तिच्या चेहऱ्याचे विशेष चित्रांत हुबेहुब उतरले होते. त्या चित्रांत एवढेंच असतें तर तें अभयला आवडलें असतें. पण पाहणाराची कामुकता जागृत होईल असें तिच्या अंगोपांगांचें उत्तान प्रदर्शनही त्यांत होतें. अभयच्या मनांत आलें—हें चित्र कोंपऱ्याकोंपऱ्यावर लावलें गेलें असेल. तें पाहून लतेला चीड यायला हवी होती, तिनें तें फाडून टाकायला—

पलीकडे ट्रॅममधें मोतिराम चढत आहे असें वाटल्यामुळें अभयनें त्याला हांक मारली. त्यानें ती ऐकली, मागें वळून पाहिलें आणि लगेच तो ट्रॅममधें

सुरू झाला. फार दिवसांनीं आपली गांठ पडत असतांना मोतिरामानें आपल्याकरितां पांच मिनिटें सुद्धां थांबू नये याचें अभयला आश्चर्य वाटल्यावांचून राहिलें नाहीं.

त्याला लतेच्या स्टुडिओचा पत्ता मोठ्या कष्टानें मिळाला. तिथें गेल्यावर एफ्. सूर्यराव आजारी असल्यामुळें आज शूटिंग बंद आहे असें त्याला कळलें. त्याच्यासारख्या सामान्य मनुष्याचें लतेशीं कांहीं काम असणें शक्य नाहीं असा तर्क करून सुटाबुटांत वावरणाऱ्या दोन तीन लोकांनीं त्याला तिचा घरचा पत्ता सांगण्याची टाळाटाळच केली. शेवटीं पहारेकऱ्याच्या हातांवर चिरीमिरी देऊन त्यानें तो पैदा केला.

पण लतेच्या उत्कृष्ट रीतीनें शृंगारलेल्या फ्लॅटमध्यें त्याला एक बाल्या तेवढा भेटला. बाईसाहेब बुवासाहेबांबरोबर कुठलीशीं लेणीं पहायला गेल्या आहेत, त्या रात्रीं नऊदहा वाजतां परत येतील एवढी माहिती त्याच्याकडून त्याला कळली. बुवासाहेब हें एफ. सूर्यरावांना त्या बाल्यानें ठेवलेलें नांव असावें हें अभयच्या लक्षांत यायला फार वेळ लागला नाहीं. 'कोन आलं होतं म्हून सांगूं ?' या त्याच्या प्रश्नाला अभयनें 'तुमचा भाऊ आला होता म्हणून सांग' असें उत्तर देतांच त्याची कळी खुलली. 'काल आईसाहेब आल्या होत्या, त्याचं नि बाईसाहेबांचं मोठं भांडण झालं,' इत्यादि गोष्टी त्यानें मोठ्या रंगांत येऊन अभयला सांगितल्या.

अभयला रात्रींपर्यंतचा वेळ कुठें तरी काढायलाच हवा होता. दुपारीं राईस प्लेटला आश्रय देतांना अभयनें वर्तमानपत्रांत एका कामगार सभेची बातमी वाचली. कांहीं गिरण्यांनीं रात्रपाळी बंद केली होती, आणि पुष्कळ गिरण्या पगार काटींची भाषा बोलूं लागल्या होत्या. त्यासाठीं मजुरांची ही सभा होती.

या सभेला जमलेल्या हजारों कामगारांकडे आणि त्यांना आपल्या हक्कांची जाणीव करून देणाऱ्या पुढाऱ्यांकडे पाहतां पाहतां अभयला वाटलें—या जगाची लतेला कल्पना तरी असेल कां ?

सभेहून तो ' मातृभूमि ' बोलपट पहायला गेला. लतेनें आपलें काम मोठ्या मोकळेपणानें केलें होतें. तिचें पहिलें गाणेंही फार गोड होतें. पण चित्रपट पाहतां पाहतां अभयला त्याचा तिरस्कार येऊं लागला. ' मातृभूमि ' या नांवावरून या चित्रपटांत एखादी देशभक्तीची गोष्ट असावी अशी त्यानें कल्पना केली होती. पण हें नांव लोकांना फसविण्याकरितां दिलें आहे हें त्याला लवकरच कळून चुकलें. ती एक मामुली प्रणयकथा होती. पण तिच्यांतले शृंगाराचे रंग इतके भडक होते कीं—

' यशस्वी चित्रपट कसा काढावा ? ' या मथळ्याखालीं सातआठ महिन्यांपूर्वी वाचलेल्या एका विनोदी लेखाची अभयला आठवण झाली. त्या लेखकानें लिहिलें होतें—

' चित्रांतल्या प्रत्येक पात्रानें शक्य तितका आचरटपणा करावा. बोलण्यापेक्षां कृतीचें महत्त्व केव्हांही अधिक असतें, हें या बाबतींत अवश्य लक्षांत ठेवावें. एखादी आचरट कोटि करण्यापेक्षां मुलगा जर उडी मारून बापाच्या पाठीवर बसला किंवा नायिकेनें नायकाचा गालगुच्चा घेतला तर त्याचा चित्रपटाला अधिक फायदा होतो ! दुसरी गोष्ट—नायिका सुरूप असेल तर ठीकच आहे. साहाजिकच तिच्यावर लोक खूष होतील. नसल्यास तिच्या शरीराचें जेवढें चित्रविचित्र प्रदर्शन करणें शक्य असेल तेवढें करावें. असलीं प्रदर्शनें नेहमींच यशस्वी होतात. सकच्छ नायिकेच्या चित्रापेक्षां विकच्छ अधिक आठवडे चालतें, विकच्छ नायिकेची छत्री वाऱ्यानें उडून जाऊन ती तनुलतिका पावसांत भिजत आहे असें दाखविलें तर बॉक्स-ऑफिसचा प्रश्नच उरणार नाहीं ! याच प्रसंगांतून कॉमेडीही उत्पन्न करतां येईल. ती उडणारी छत्री एखाद्या गाढवाच्या डोक्यावर जाऊन बसली असें दाखवावें ! तिसरी गोष्ट—गाण्यांत शृंगाराचा गरमागरम मसाला भरपूर वापरावा. ' हं मदंगा कर लावुं नका तुम्हीं दूर सरा हो दूर सरा । खराच नसतो धीर नरा ! ' या एका पदासाठीं आजच्या पिढीचे कितीतरी आजोबा एक भिकार

नाटक पन्नास वेळां पाहत होते. त्याच आजोबांचें रक्त त्यांच्या नातवांच्या अंगांत खेळत नाहीं असें कोण म्हणेल ?'

अभयला त्या लेखांतील असल्या कितीतरी गोष्टी आठवल्या—तो लेख पुढें ठेवूनच 'मातृभूमि' चित्र तयार केलें असावें असें त्याला वाटलें. तो मध्येंच उठून थिएटराबाहेर चालता झाला.

× × ×

साडेनऊच्या सुमाराला अभय लतेच्या बिन्हाडीं आला तेव्हांसुद्धां त्याच्या मनाची काहिली कमी झाली नव्हती. त्याच्या डोळयांपुढें दोन चित्रें पालटून उभीं राहत होतीं—कष्टाला आनंदानें तयार असूनही बेकारीचें भूत ज्यांना भेवडावीत होतें अशा श्रमिकांचा तो समुद्र आणि करमणुकीच्या नांवाखालीं आपल्या विकृत मनोवृत्तींची तृप्ति करून घेणारा प्रेमिकांचा हा संमर्द !

अभयनें घंटा वाजविली तेव्हां सकाळच्या गड्यानें दार उघडलें. अभयनें विचारलें 'लताबाई आल्या कां ?

'व्हय्-नाहीं !'

उत्तर देतांना तो इतका कां गोंधळला हें अभयला कळेना. तो सरळ पुढें गेला.

हॉलमध्यें एका वर्तुळाकार मेजावर दोन बाटल्या आणि तीनचार ग्लास त्याला दिसले. खुर्चीत बसलेल्या पुरुषानें दाराकडे पाठ केली होती. पण डोक्यावरल्या केंसांचा अस्ताव्यस्त भार ती व्यक्ति एफ्. सूर्यराव आहे हें उघड-उघड सुचवीत होती. अभयनें आंत पाऊल टाकलें तेव्हां लतेच्या पेल्यांत एफ्. सूर्यराव सोडा ओतीत होते. लतेनें तो पेला टेबलावरून उचलला आणि तोंडाला लावण्याकरितां वर नेला. इतक्यांत तिची नजर दारांतून येणाऱ्या अभयकडे गेली. पेला तिच्या हातांतून खालीं पडला आणि खळकन् फुटला.

'Oh! What's the matter dearie?' असा प्रश्न रीत एफ्. सूर्यराव तिच्याजवळ जाण्याकरितां उठले. पण अभयला पाहतांच जागच्याजागीं उभे राहिले.

लगेच त्याच्या अंगावर खेकसून ते म्हणाले, 'Get out, you rute!'

सरळ पुढें व्हावें आणि या एफ्. सूर्यरावाच्या श्रीमुखांत द्यावी असें भयच्या मनांत आलें. पण इतक्यांत थरथर कांपणारी लताच त्या दोघांच्या-धें येऊन उभी राहिली.

'कोण जंगली मनुष्य आहे हा?' एफ्. सूर्यरावांनीं प्रश्न केला.

'माझे मित्र आहेत ते!'

'त्यांना चालते व्हायला सांग!' स्वरावरून स्वारीनें बरीच झोंकली सावी असा अभयनें तर्क केला.

'ते जाणार नाहींत!' लतेनें उत्तर दिलें.

'हा इथून जाणार नाहीं? मग माझ्याशीं कशाला लग्न करतेस? त्याच्या-ंच कर कीं!' बिकट हास्य करीत एफ्. सूर्यराव हॉलमधून बाहेर गेले.

अभय एखाद्या दगडी पुतळ्याप्रमाणें स्तब्ध होता. त्यानें लतेकडे ाहिलें. तिच्याशीं एक अक्षरही न बोलतां निघून जावें असें त्याला वाटलें. ानें पाठ फिरविली. इतक्यांत धाडकन् आवाज झाला. त्यानें वळून पाहिलें. तेनें कोचावर अंग टाकलें होतें. ती स्फुंदस्फुंदून रडत होती.

अभयला तिची कींव आली. तो तिच्या जवळ जाऊन म्हणाला 'लता, ाझ्याबरोबर चल!'

'कुठं?'

‘ या नरकाबाहेर ! ’

‘ तुम्हीं पुण्याला परत आलां ? ’

‘ हो ! ’

लतेनें मोठ्या आशेनें मान वर करून अभयला विचारलें ‘ वकिली करणार ? ’

‘ नाहीं ! ’

ती निराशेनें मान खालीं घालून पुन्हां स्फुंदूं लागली. अभयला याचा अर्थच कळेना. क्षणभर स्तब्ध राहून तो म्हणाला ‘ लता, माझ्याबरोबर यायची तुझी तयारी आहे ? ’

‘ कुठं ? ’

‘ कुठंही, आपल्या मातृभूमीच्या पाठीवर कुठंही ! ’

‘ कशाला ?

‘ खेड्यांतल्या लोकांना जागृत करायला—आपल्या हक्कांकरितां कसं लढायचं हें माणसांना शिकवायला ! ’

लता स्तब्ध राहिली.

अभयनें विचारलें ‘ जाऊं मी ? ’

सारें धैर्य एकवटून लतेनें आपले डोळे पुसले. अभयकडे पाहत ती म्हणाली.

‘ अभय, क्षमा करा मला. लहानपणापासनं मी विलासांत वाढलें आहे. तुमच्या त्या खेड्यांची, त्या कोडानं पांढऱ्या झालेल्या बाईची आठवण झाली कीं अजून माझ्या अंगावर शहारे येतात ! ’

टेबलावरल्या मद्याच्या बाटलीकडे बोट दाखवीत अभय रागानें उद्गारला ‘ शहरांतही माणसाला पवित्र राहतां येतं ! ’

‘ पण—’

‘ पण काय ? ’

‘ मी मुळांतच अपवित्र आहे. माझ्यासारखाच ज्याचा जन्म आहे त्याच्याशीं लग्न करणं बरं म्हणून त्या माणसावर मी प्रेम करायला लागलें. तुमच्या पायाचं तीर्थ घेण्याचीसुद्धां त्याची लायकी नाहीं हें गेल्या सहा महिन्यांत मला पदोपदीं कळत होतें. पण—पण गरिबीचं वाण घेतल्यावांचून तुमच्याजवळ येणं शक्य नव्हतं ! अभय, लतेच्या रक्तांत श्रीमंतीचं विष नसतं तर—’

लता घाईघाईनें पलीकडच्या खोलींत गेली. जिवाचें कांहीं बरें वाईट करण्याकरितां तर ती आंतल्या खोलींत गेली नसेल ना अशी अभयला शंका आली. इतक्यांत ती बाहेर आली. अभयच्या हातांत एक पत्र टाकून ती पुन्हां कोचांत तोंड खुपसून बसली.

अभयनें तें पत्र उघडलें मात्र !

लता आपल्या घरीं आली त्या रात्रीं तिच्या आईनें कांचनबरोबर पाठविलेलें पत्र आपण वाचीत आहों हें त्यानें ओळखलें.

‘ लता,

मी तुझी आई नाहीं. पूर्वजन्मींची वैरीण आहे.

नाहीं, मी तुझी आईच आहे. मी आई नसतें तर तूं घरांतून निघून गेलीस म्हणून अशी तडफडलें नसतें—

लता, मघाशीं तूं संतापानें घरांतून निघून गेलीस. तुला देवदत्तांचा तिटकारा आला. मामा म्हणविणाऱ्या माणसानें फाजीलपणानें भाचीचें चुंबन घ्यावें ही गोष्ट कुणालाही किळसवाणी वाटेल. पण—देवदत्तांनीं आज खूप घेतली होती. माझें डोकें दुखत असल्यामुळें मी आज त्यांच्याशीं न बोलतां खोलींत जाऊन निजलें. ते

दोनतीनदां दाराशीं येऊन गेले. ‘ बरं वाटल्यावर मी बाहेर येतें ’ असें मी त्यांना सांगितलें.

तूं वाचत बसलीस म्हणजे दुरून मीच बसलें आहे असें वाटण्या-इतकें तुझ्या माझ्यांत साम्य आहे. देवदत्तांना खूष ठेवण्यासाठीं मलाही तरुण पोरीचं सोंग सजवावं लागतं. त्यामुळं तर हें साम्य अधिकच वाढलं आहे हें तुझ्या लक्षांत आलं नसेल. पण कांचन विलायतेहून आल्यावर एकदां रात्रीं हॉलमध्यें तूं वाचीत बसली होतीस नि त्यानं दारांतून तुला आई म्हणून हांक मारली होती. आठवतं कां तुला हें ?

देवदत्तसुद्धां तसेच फसले असावेत ! त्यांना मी बसलें आहे असं वाटलं. आणि--

केव्हांतरी हें तुला सांगायलाच हवं होतं. लता, तूं माझी मुलगी आहेस. पण कांचनची सख्खी बहीण मात्र नाहींस. देवदत्त तुझे वडील आहेत.

उमाळ्यासरशी साीच कुळकथा तुला सांगून टाकलेली बरी.

कांचनचे वडील तो दोन वर्षांचा असतांनाच वारले. वकील होते ते. नुक्तीच वकिली सुरू केली होती त्यांनीं ! तेव्हां शिल्लक काय असणार मागं ? मी एका खेडेगांवांत मुलींच्या शाळेंतील मास्तरीण झालें. कांचनला वकील करायचा या ईर्ष्येनें मी दुर्दैवाशीं झगडूं लागलें.

पण दैव माझ्या विरुद्ध होतें. एका इन्स्पेक्टरची वाईट दृष्टि माझ्यावर गेली. तो मुलांच्या मराठी शाळेंत उतरला होता. रात्रीं दहा वाजतां ‘ तुमच्या शाळेचे कागद पहायचे आहेत, ते घेऊन

मुलांच्या शाळेंत या.' म्हणून त्यानें मला निरोप पाठविला. नाहीं म्हणायचा मला धीर झाला नाहीं. खाटकाच्या घरीं जाणाऱ्या बकरीप्रमाणें मी मुलांच्या शाळेकडे गेलें.

दत्तोपंतांच्या घरीं तो अभय जेवायला आला होता ना? त्याचे वडील त्या मुलांच्या शाळेचे हेडमास्तर होते. त्यांना ही बातमी कशी कळली कुणाला ठाऊक! अगदीं आयत्यावेळीं ते तिथें आले, त्यांनीं त्या राक्षसाला शाळेबाहेर काढलें, आणि शाळेला कुलूप लावून किल्ल्या आपल्या हातांत घेतल्या. त्या इन्स्पेक्टरला चडफडत धर्मशाळेंत जाऊन निजावें लागलें.

त्या मांगानें या अपमानाचा सूड अभयच्या बापावर तर घेतलाच. पण लवकरच माझीही जिल्ह्याच्या गांवीं बदली झाली. या बदलीचें कारण मी ओळखलें. नोकरी सोडून द्यावी असं घटकाभर वाटलं. पण मी नोकरी सोडली असती तर कांचन जन्माचा भिकारी झाला असता! पोटच्या गोळ्यासाठीं—त्याचं आयुष्य श्रीमंतींत नि सुखांत जावं म्हणून मी माझं मन मारून टाकलं.

जिल्ह्याच्या त्या गांवीं सबजज्जाची एक मुलगी मोटार हांकायला शिकत होती. तिचा नवरा परदेशांत गिरणीचं काम शिकायला गेला होता. मोटार हांकतांना तिची कांहींतरी चूक झाली नि कांचन तिच्या मोटारीखालीं सांपडला, किती दिवस तरी तो शुद्धीवर येईना. नवरा इंग्लंडहून येणार म्हणून तिला मुंबईला जायचें होतें. स्पेशल मोटारनें मला आणि कांचनला घेऊनच ती मुंबईला गेली. प्रवासांत त्या प्रेमळ बाईच्या पाठीवर कोडाचे डाग दिसले, तेव्हां मला किती वाईट वाटलें म्हणून सांगूं?

पण माणूस हें तेरड्याचें फूल आहे. त्याचे रंग सारखे बदलतात. ज्या बाईनें माझ्या मुलाचा प्राण वांचविला, तिच्यावरच मी उलटलें. सहा महिन्यांतच मी तिची सवत झालें.

माझं मलासुद्धां नवल वाटतं आतां या गोष्टीचं! पण त्यावेळीं तें घडून आलं खरं! कांचनला इस्पितळांत ठेवलं होतं. ती माउली सकाळ-संध्याकाळ त्याला पहायला येई. तिचा नवरा लवकरच इंग्लंडहून परत आला. तोही तिच्याबरोबर समाचाराला यायला लागला.

हीच देवदत्तांची नि माझी पहिली भेट. त्यांना आपली बायको आवडत नाहीं हें लवकरच माझ्या लक्षांत आलें. पहिल्यांदा त्यांचा खूप राग आला मला. वाटलं—इंग्लंडांतल्या एखाद्या गोऱ्या बाईच्या नादीं स्वारी लागली असेल!

कांचन बरा झाल्यावर मी देवदत्तांच्या घरीं रहायला गेलें. मुंबईतच मास्तरीण व्हायचा बेत केला होता मी! पण देवदत्तांच्या घरीं गेल्यावर माझ्या मनाला निराळाच मोह पडूं लागला. नवराबायको एका खोलींत कधींच झोंपत नाहींत, देवदत्त रात्रीं अपरात्रीं बाहेरून येतात, या गोष्टी कळायला कांहीं फार दिवस लागले नाहींत मला! देवदत्तांना गिरणींत मोठ्या पगाराची नोकरी आहे ही गोष्ट एकसारखी माझ्या डोळ्यांपुढें नाचूं लागली. वाटूं लागलं—मुंबईत मास्तरीण होण्यापेक्षां—

पुढं कांचनला इंग्लंडलासुद्धां जातां येईल ही आशा मनांत डोकावूं लागली. मी देवदत्तांना आपलंसं केलं नाहीं तरी बाहेरच्या कुणातरी बाईच्या नादीं लागणार हेंही उघड होतं. त्यांच्या बायकोचं कोड तर दिवसेदिवस वाढतच होतं! तेव्हां—

स्त्रीची अब्रू म्हणजे कांचेचं भांडं ! माझ्या या भांड्याचे त्या इन्स्पेक्टरानें कधींच तुकडे केले होते. ते तुकडे गोळा करून पुन्हां सांधतां येतील या वेड्या आशेंत अर्थ नव्हता. एके दिवशीं रात्रीं देवदत्त बाहेर जायला निघाले. मी त्यांना हंसत विचारलें—' असं बाहेर जाणं शोभतं कां पुरुषांना ? '

त्यांनीं उत्तर दिलें—' जें सुख घरांत मिळत नाहीं तें मिळवायला पुरुषांना घराबाहेर जावं लागतं ! '

मी निर्लज्जपणानें बोलून गेलें ' घरांत सुद्धां सुख असतं ! पण पुरुषांना तें दिसतच नाहीं ! '

लता, इतके दिवस स्वतःच्या पापावर पांघरुण घालण्यांत मला आनंद होत असे. आतां वाटतें—तें पांघरुण दूर फेंकावें, तुझ्यासारख्या पोरीपुढें सगळे ढोंग सोडून द्यावें, तूं मला खूप खूप टाकून बोलावेंस, तूं आई नाहींस, चांडाळीण आहेस असें कांहींतरी म्हणावेंस—म्हणजे मला रडून तरी आपलं दुःख हलकं करून घेतां येईल.

पुढची कहाणी–देवदत्तांनीं दिल्लीच्या कुठल्यातरी गिरणींत नोकरी धरली. त्यांची बायको एके दिवशीं नाहींशी झाली. ती कुठं गेली याचा कुणालाच पत्ता लागला नाहीं. कोडानें तोंड अगदीं विद्रूप दिसूं लागल्यामुळें तिनें नदीबिदींत जीव दिला असावा ! अंगावरल्या दागिन्यांखेरीज तिनें घरांतला सुतळीचा तोडासुद्धां नेला नव्हता. तिचे ते दागिने कुठें गेले कुणाला ठाऊक ! दागिन्यांवरनं तरी तिच्या प्रेताचा पत्ता लागायला हवा होता. ज्यांना तें प्रेत सांपडलं असेल, त्यांनींच ते दागिने खाऊन टाकले असतील, झालं.

लता, तुझा जन्म दिल्लीला झाला. तुला बोलायला यायला लागलं तेव्हांच देवदत्तांना मामा म्हणायला शिकविलें मी तुला ! पण

कांचनपेक्षां तुझी भीति मला अधिक वाटूं लागली. कांचननं आतां-पर्यंत या गोष्टीविषयीं माझ्यापाशीं ब्रसुद्धां काढला नाहीं. पण तूं सहासात वर्षांची चिमुरडी पोरगी असतांनाच मला नाहीं नाहीं ते प्रश्न विचारायला लागलीस. तेव्हां तुला कुठें तरी दूर बोर्डींगांत ठेवायचें ठरविलें. पांचगणी, पुणें, मुंबई इत्यादि ठिकाणीं तूं लहान असल्या-पासून राहिलीस, याला कारण तुझ्या शिक्षणाची काळजी हें नव्हे; तर हें लाजिरवाणं रहस्य तुला कळेल ही भीति !

पण तुला लहानपणापासून मी दूर ठेवलं ही फार मोठी चूक झाली. तूं शाळेच्या जगांत वाढलीस. पुस्तकांपलीकडे तुझें मन कधींच गेलें नाहीं. तुझ्या त्या गोष्टी वाचल्या, सुंदर गोष्टींचा सोस पाहिला, हौसेनं नर्स व्हायला जाऊन ऑपरेशन बघवत नाहीं म्हणून तिथून पळून येणं पाहिलं, म्हणजे तूं कुठं तरी अंतराळांत राहत आहेस असं वाटायला लागतं !

अंतराळांत राहणारें माणूस कुठल्या धक्क्यानें केव्हां पडेल याचा नेम नसतो. लता, लता—

तुला सारें खरें खरें सांगायचें म्हणून कितीतरी दिवस मी हें पत्र लिहून ठेवलें होतें. त्यांतला पहिला नि शेवटचा कागद बदलून तें पाठवून देत आहे. तूं अभयबरोबर आहेस असा टेलिफोन आला म्हणून कांचननें आतांच सांगितलें. माझा जीव भांड्यांत पडला. अभयचे डोळे थेट त्याच्या वडिलांच्यासारखे आहेत. त्याच्याबरोबर तूं कुठेंही गेलीस तरी माझी हरकत नाहीं. पण या सिनेमांत मात्र पाऊल टाकूं नकोस. मोहावर जय मिळविणाऱ्या माणसांपेक्षां मोहाला बळी पडणारीं माणसंच जगांत जास्त असतात. त्यांतून श्रीमंतीचं

विष तुझ्या रक्तांत भिनलं आहे. चैनीची चटक लागली कीं मनुष्य नरकांतच स्वर्गसुख आहे असं मानूं लागतो. लता, तूं तरी आईनं केलेली चूक पुन्हां करूं नकोस.

तुझी आई.

× × × ×

दोन तीन दिवसांत तुला भेटायला परत येतों असें लतेला सांगून अभय पुण्याच्या गाडींत चढला खरा ! पण त्या आगगाडीपेक्षांही अधिक वेगानें त्याचें मन भूतकाळांत भ्रमण करीत होतें. हत्तींच्या साठमारीप्रमाणें परस्परविरोधी विचारांची टक्कर एकसारखी त्याच्या मनांत चालली होती.

आपल्या वडिलांचें धैर्य किती असामान्य होतें ! पण त्यांच्या एवढ्या मोठ्या त्यागाचा काय उपयोग झाला ? ज्या स्त्रीचें शील सुरक्षित राखण्याचा त्यांनीं प्रयत्न केला, तिला तें शेवटीं विकावें लागलेंच !

ती खेड्यांतली आक्का--तिच्या हातावर ‘ देवदत्त ’ हीं अक्षरें कां गोंदली होतीं हें आतां आपल्याला कळलें. पण देवदत्तांना ती न आवडण्याचें कारण तिचें कोड एवढेंच होतें ? कीं—

लतेचा हा अधःपात—पण तिच्या आईचें तें पत्र वाचल्यावर आपल्या मनांत लतेविषयीं करुणाच उत्पन्न झाली. हीच सामाजिक नीति झाली कीं असलींच माणसें समाजांत निर्माण व्हायचीं !

घरांत पाऊल टाकेपर्यंत अभयचें मन लता, लतेची आई, देवदत्त आणि ती खेड्यांतली आक्का यांनीं इतकें व्यापून टाकलें होतें कीं, आक्कानें आपल्याला चकिली करायला पुण्याला परत बोलावलें आहे, ही गोष्ट तो विसरूनच गेला होता. पण चहा झाल्यावर आक्कानेंच ती काढली.

‘ मुंबईला कोण मदत करणार आहे मला ? ’ अभयनें प्रश्न केला.

‘ देवदत्त ! ’

अभय स्तिमित झाला. आक्का हंसत म्हणाली—‘ रात्रीं जेवायलाच येणार आहेत ते इथं ! ’

अभयनें विचारलें ‘ चारु कुठं आहे ? ’

देवदत्तांची गोष्ट अभयनें मुद्दाम टाळली हें आक्काच्या लक्षांत आलें. ती त्याच्या अगदीं कानांत म्हणाली ‘ चारुकड मुद्दाम जाऊं नकोस हं बाबा ! ’

‘ कां ? ’

‘ त्या कावेरीला चांगले सहा महिने गेलेत बघ. समोरच्या माणसांनीं तुझं नांव घेतलं तेव्हां तर मला मेल्याहून मेल्यासारखं झालं ! ’

कावेरीनें ‘ मी संकटांत आहे ’ असें पत्र आपल्याला कां पाठविलें याचा अभयला आतां उलगडा झाला. तिच्या घरांत पाऊल न टाकण्याच्या आक्काच्या उपदेशाचा त्याला मनस्वी राग आला. कावेरीच्या दारांत जाऊन त्यानें मोठ्यानें हांक मारली—‘ कावेरी, कावेरी—’

कावेरी धांवतच बाहेर आली. अभयला पाहतांच तिच्या मुद्रेवर आनंदाची छटा चमकून गेली. पण लगेच तिचा चेहरा काळवंडला.

अभय हंसून म्हणाला ‘ कावेरी, तुझा भाऊ आला आहे ! ’

# १७

## पुनर्जन्म.

‘ कावेरी, तुझा भाऊ आला आहे ! ’ असें अभय उमाळ्यासरशीं बोलून गेला. पण पुढें कावेरीशीं काय बोलायचें हें मात्र त्याला कळेना. चारूचा घोडा होऊन तो थोडा वेळ इकडे तिकडे फिरला. शेवटीं ‘ उद्यां सकाळीं शांतपणानं बोलूं आपण ’ असें म्हणून त्यानें कावेरीचा निरोप घेतला.

मात्र आपल्या खोलींत आल्यावर त्याला कोंडल्यासारखें झालें. त्याची दृष्टि भिंतीवर लावलेल्या फोटोंकडे गेली. तिथल्या देशभक्तांचें उच्चाटन झालें होतें. त्यांची जागा संतांनीं घेतली होती. आक्काच्या या देवभोळेपणाची थट्टा करण्याकरितां त्यानें तिच्याकडे पाहिलें. कारुण्य आणि क्रूरपणा यांचा विचित्र संगम तिच्या दृष्टींत झाला होता. ही आपली आक्का नव्हे असा क्षणभर त्याला भास झाला.

‘ काय करणार आहेस तूं या कावेरीचं ? ’ आक्कानें प्रश्न केला. गाभाऱ्यांत घुमणाऱ्या आवाजाप्रमाणें तिचा स्वर अभयला वाटला.

‘ काय करणार ? एखाद्याची बहीण असल्या संकटांत सांपडली तर तो जें करतो—’

‘ बहीण ? तुला एकच बहीण आहे ? ’

‘ होय ! या छोट्या घरांत मला एकच बहीण आहे ! पण बाहेरच्या मोठ्या घरांत माझ्या हाजारों, लाखों अनाथ बहिणी आहेत—’

‘ घरांत एक बहीण आहे तिला सुखी करतां येईना नि म्हणे—माझ्या हजारों, लाखों अनाथ बहिणी आहेत ! ’

आक्काच्या जवळ जाऊन अभयनें विचारलें ‘ आक्का, सुख म्हणजे काय ग ? सुख पक्वान्नांत असतं, जरीच्या वस्त्रांत असतं, बंगल्यांत असतं, मोटारींत असतं, सुंदर नवऱ्यांत अगर बायकोंत असतं, असं कां तुला वाटतं ? ’

तो क्षणभर थांबला. लगेच गंहिवरलेल्या स्वरानें तो उद्गारला ‘ माझ्या आक्काची सुखाची कल्पना इतकी खुळेपणाची नाहीं. लहानपणींच पोरक्या झालेल्या अभय नांवाच्या एका पोराला लहानाचा मोठा करण्याकरितां तिनं आपल्या आयुष्याचा होम केला हें ज्याला ठाऊक आहे—’

‘ अभय—’ एवढा उद्गार आणि त्याच्या मागून एक हुंदका आक्काच्या तोंडून बाहेर पडला. लगेच मन आवरून ती म्हणाली ‘ कावेरीच्या पापाला कधींच वाचा फुटली आहे बाबा ! शेजाऱ्यापाजाऱ्यांना तोंड दाखवायचा धीर नाहीं तिला ! अभय, सापाला नि पापाला दया दाखवूं नये म्हणतात. दया दाखविणारालाच डसतात तीं ! ’

उजव्या हाताची मूठ पुढें धरून संतप्त स्वरानें अभय म्हणाला ‘ पाप ! अनीति ! समाजांत असलीं पापं कां होतात, याचा तूं कधीं विचार केला आहेस कां ? तुझ्यासारखीं पवित्र माणसं स्वतःपलीकडे, आपल्या घरापलीकडे पाहत नाहींत, म्हणून जगांतलीं पापं अजून कमी होत नाहींत. तूं आणि मी कावेरीला

आपली बहीण मानली असती, तिच्या अल्लड मनाला विरंगुळा दिला असता, तिच्या दुखावलेल्या भावनांना हळुवारपणानं कुरवाळलं असतं, तर ती या मोहाला बळी पडली असती असं तुला वाटतं कां ? पण–आमचा त्याग, आमचं तत्त्वज्ञान, आमची संस्कृति, सारं कांहीं घराच्या चार भिंतींत पाहून घ्यावं ! त्याच्या पलीकडं—'

आपल्या उजव्या हाताची मूठ पुढें धरून अभय आवेशानें बोलूं लागला, कीं त्याच्या भाषणानें श्रोते किती मुग्ध होऊन जातात हें आक्कानें अनेकदां कौतुकानें पाहिलें होतें. पण आज मात्र अभयच्या त्या मुठीची आणि अस्खलित बोलण्याची आक्काला भीति वाटूं लागली. कांहींतरी उत्तर देऊन ती त्याला थांबविणार होती इतक्यांत तोच खिडकीजवळ गेला आणि समोरच्या घराकडे बोट दाखवीत म्हणाला—'आक्का, गतवर्षी या समोरच्या घरांतल्या सासऱ्यानं सुनेवर हात टाकला होता. पण तें पाप त्याला पचलं. तो श्रीमंत आहे म्हणून समाजानं त्याचा गुन्हा माफ केला. नि कावेरी गरीब आहे म्हणून समाज तिला सुळावर चढविणार आहे ! आक्का, तूं या घरव्यांत तुकारामाची गाथा वाचीत बसतेस म्हणून तुला कल्पना नाहीं. आजच्या जगांत श्रीमंतीसारखं पुण्य नाहीं नि गरिबीसारखं पाप नाहीं !'

क्षणभर थांबून भिंतीवरल्या आपल्या वडिलांच्या फोटोकडे पहात तो म्हणाला 'आजचं हें जगच बदलून टाकायला हवं ! अठरा टक्के व्याजानं पैसे देणाऱ्या नीतिमान सावकारापेक्षां अनाथ पोरांना संभाळणाऱ्या वेश्येंत अधिक माणुसकी असते हें समाजाला ज्या दिवशीं कळेल—तें कांहीं नाहीं. कावेरीला मी आपल्या घरांत ठेवून घेणार !'

'खुशाल ठेवून घे ! ती ज्या दिवशीं या घरांत रहायला येईल, त्याच दिवशीं मी सरळ माझी वाट सुधारीन !'

'कुठं जाणार तूं ?'

‘ पंढरपुराला ! भावाची माया आटली तरी देवाची कधीं आटत नाहीं ! ’ बोलतां बोलतां आक्का डोळ्याला पदर लावून स्फुंदूं लागली. गोंधळलेल्या मनः-स्थितींत अभयनें बाहेरच्या दरवाजाकडे पाहिलें. कावेरी कुठूनतरी आपल्या बिऱ्हाडांत परत जात होती.

× × + ×

आक्का आंत स्वयंपाक करत होती. अभय अस्वस्थपणानें एकटाच फेऱ्या घालीत होता. एक वावटळ गेली न गेली तोंच दुसरी त्याच्या मनांत उठत होती. लता—लतेची आई—कावेरी—देवदत्त—माला—

आक्काची नि देवदत्तांची ओळख असली पाहिजे हें तर उघड होतें. ती केव्हां झाली ? लतेची आई त्यांना घेऊन आली असेल कदाचित् ! या देवदत्तांच्या नीतीची काय आक्काला मुळींच कल्पना नसेल ? मग त्यांच्या मदतीनें आपण आपली वकिली थाटावी ही गोष्ट तिला कशी आवडली ?

× × × ×

देवदत्त जेवायला आल्यावर त्यांच्याशीं कसें वागायचें याविषयीं अभय मनांत विचार करीत होता. पण देवदत्त आलेच नाहींत, त्यांना एकाएकीं मुंबईला जावें लागलें. त्यांचा निरोप आणि पत्र घेऊन एक मनुष्य आला, तें पत्र वाचून होतांच आक्काच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले. अभय अधिकच चकित झाला. त्याच्या हातांत तें पत्र देऊन आक्का आंत देवापाशीं जाऊन बसली. अभय वाचूं लागला.

‘ प्रिय विमल,

प्रिय म्हटल्याचा तुला राग येईल कदाचित् ! पण खरंच सांगतों, माझ्यासारख्या पापी मनुष्याच्या मनांतही भक्तिभाव असतो. पाप्यालाही कशाची तरी पूजा करावी असें वाटतें ! अशी देवता—अजूनही तूंच माझी देवता आहेस. एका मुलाला आगींतून काढतां

काढतां मी भाजलों तो प्रसंग इतकीं वर्षें घडलीं तरी मला काल घडल्यासारखा वाटतो ! त्यामुळेंच तर इस्पितळांत तुझी माझी ओळख झाली, प्रेम जडलें.

पण त्या प्रसंगानें माझ्या आयुष्यांत सुखापेक्षां दुःखच अधिक उत्पन्न केलें. वर्तमानपत्रांत ती सर्व हकीगत आली. आमच्या जातींतल्या सबजज्ज असलेल्या एका श्रीमंताचें लक्ष माझ्याकडे गेलें. त्याच्या मुलीशीं लग्न केलें तर परदेशीं जाऊन-शिक्षण घेण्याची संधि मिळेल असें दिसूं लागलें. परदेशाहून परत आल्यावर आपण गिरणींत मोठ्या जागेवर लागूं, हजारों कामगारांना सुखी करायला कारणीभूत होऊं, इत्यादि मनोराज्यांत मी गुंग झालों. विमल, प्रीतीची मीठभाकरी अमृतापेक्षांही गोड असते असं सांगून तूं त्यावेळीं मला मागं ओढलं असतंस तर किती बरं झालं असतं. तसं झालं असतं तर मी इतका श्रीमंत झालों नसतों हें खरं ! पण सध्यांपेक्षां मी हजारपटींनीं सुखी झालों असतों यांत संशय नाहीं.

मी दुःखी आहे हें वाचून तुला आश्चर्य वाटेल. मी दुःखी आहे म्हणूनच मनांत डांचणाऱ्या साऱ्या गोष्टी आज तुझ्यापाशीं ओकून टाकीत आहे.

त्या सबजज्जानें मला विकत घेतलें. त्यानें आपली कोड असलेली मुलगी माझ्या गळ्यांत बांधली. तिचें कोड भराभर वाढतच गेलें. तिच्या विद्रूपपणाचा मला तिटकारा येऊं लागला. तिला तर मुलांची मोठी हौस होती. पण मला कोड असलेलीं विद्रूप मुलें नको होतीं. मी तिच्यावर काडीइतकेंही प्रेम करूं शकलों नाहीं. एके दिवशीं ती घर सोडून गेली—तिचें पुढें काय

झालें हें मला कधींच कळलें नाहीं. आतां वाटतें–तिचा खून मींच केला.

ती घरून निघून जाण्याच्या आधींच मी दुसऱ्या स्त्रीच्या मोहांत पडलों होतों. मी श्रीमंत नसतों तर किती बरें झालें असतें ! त्या स्त्रीलाही माझा मोह पडला नसता, माझें मन जिची पूजा करीत आलें होतें, तिच्यासमोर उजळ माथ्यानें मला उभें राहतां आलें असतें. पण—

पण श्रीमंतीनें मनुष्याच्या रक्तांतला त्याग कमी होतो; भोग वाढतो. दिवसेंदिवस माझें मन दुबळें होत गेलें; शरीराची भोगाची चटक मात्र वाढत चालली.

जाऊं दे ही कर्मकथा ! आपण लावलेल्या विषवृक्षाचीं फळें आपणालाच चाखावीं लागतात, हा अनुभव मी आज घेत आहे.

लता माझी मुलगी. तिच्या आईशीं मी लग्न केलं नाहीं. त्यामुळें वात्सल्याचा अद्भुत आनंद मी घेऊं शकलों नाहीं. पण–पण तिच्यावर मी नेहमीं माया करीत आलों आहे.

लता एफ्. सूर्यराव नांवाच्या डायरेक्टरांबरोबर लग्न करणार आहे अशी बातमी माझ्या एका मित्रानें आतांच फोनवरून कळविली. परवांच पोरीनें आईपाशीं ‘मी त्यांच्याशीं लग्न करणार नाहीं’ असें कबूल केलें होतें. पण–लता आणि अभय यांचा जोडा कसा छान दिसला असता नाहीं ? त्या एफ्. सूर्यरावानं आपली पहिली बायको टाकून दिली आहे म्हणे. त्याच्याशीं लग्न करून ही पोरटी जन्माची दुःखी होईल. मी तिच्या आईला घेऊन तिची समजूत घालायला जात आहे. काय होतं तें पहावं !

अभयसंबंधानं तुझीं दोन पत्रं आलीं. मी त्याला मदत करायचं कबूल केलं. पण इथं पुष्कळदां येऊनही तुला एकदांच भेटलों आणि आज मी जेवायला येतों असें कबूल करून एकदम मुंबईला निघून चाललों. यामुळें तुझा कदाचित् गैरसमज होईल म्हणून हें सर्व मुद्दाम लिहिलं आहे!

जखमेंतला पू पिळतांना फार त्रास होतो. पण मग माणसाला कितीतरी आराम वाटूं लागतो! मनाचंही तसंच आहे. हें पत्र लिहिल्यामुळं मला हुषारी वाटूं लागली आहे. इस्पितळांत असतांना गिरणींतल्या मजुरांना सुखी करण्याच्या खूप खूप कल्पना माझ्या डोक्यांत येत असत नाहीं? आतांही तसंच कांहींतरी करावं असं वाटूं लागलं आहे!

पण काय करणार मी? गिरणींतला अधिकारी हें सुद्धां एक यंत्रच आहे!

तें जाऊं दे. मी लवकर परत आलों नाहीं तर अभयला माझ्याकडे मुंबईला पाठवून दे. अगदीं संकोच बाळगूं नकोस म्हणावं. दोनतीन बडे वकील माझ्या ओळखीचे आहेत. हां हां म्हणतां अभय पुढं येईल.

तुझा—

देवदत्त'

पत्र वाचून झाल्यावर अभय कितीतरी वेळ सुन्न होऊन बसला होता. आक्का देवापाशीं बसली होती. तिनें तिथूनच त्याला हांक मारली. चुकलेल्या वांसरासाठीं गाय हंबरूं लागली म्हणजे तिच्या हंबरण्यांत जें कारुण्य असतें, तें आक्काच्या या हांकेंत होतें.

अभय तिच्या अगदीं जवळ बसला.

समोरच्या विठ्ठलाच्या तसबिरीकडे एकाग्र दृष्टीनें पाहत आक्का म्हणाली ' दोन दिवस देवदत्तांची वाट पहा नि मग मुंबईला जा ! '

' मुंबईला ? '

' नाहींतर कुठं जाणार ? '

' कानपूरला जावं म्हणतों ? '

' कशाला ?

' तो मागं आलेला माझा तिकडला मित्र फार आजारी आहे ! '

' त्याला भेटून येणार ? '

' कदाचित् येईन, कदाचित् तिथंच राहीन ! '

' तिथं ! तिथं कोण आहे बाबा तुझं ? '

' तो नरेंद्र आहे, त्याची बायको ज्योति आहे, तीं दोघं ज्यांच्यांत काम करताहेत ते आहेत---कानपूरच्या गिरण्यांतले मजूर आहेत--'

' हेंच काम करणार तूं जन्मभर ? '

' हो. आक्का, या कामांत मी श्रीमंत होणार नाहीं. पण सुखी होईन. आजपर्यंत तूं माझ्या सुखाची काळजी करीत आलीस ना ? मग, आतांच—'

' आपल्या जातीचीं माणसं सोडून, सुखानं संसार करायचा सोडून, काय मांडलं आहेस तूं हें ? !

' पूजा ! '

' कुणाची ? '

' माझ्या देवाची ! '

' मग मीही माझ्या देवाची पूजा करायला पंढरपूरला जातें. मी निघून गेल्यावर कुठंही जा तूं ! ' बोलतां बोलतां आक्काच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले. अभयलाही गहिंवर आला. तिच्या मांडीवर डोकें ठेवून त्यानें आपलें दुःख लपविण्याच्या प्रयत्न केला. त्याच्या पाठीवरून हात फिरवीत आक्का उद्गारली—'पृथ्वीच्या पाठीवर कुठंही जा बाबा ! तूं सुखी असलास म्हणजे सारं पावलं मला !'

आक्कानें उठण्याचा प्रयत्न केला. तिच्या मांडीवरलें डोकें न उचलतां अभय म्हणाला ' बैस जरा ! '

' कां ? '

' एक उंट पाणी पिऊन घेतोय् ! '

' म्हणजे ? '

' वाळवंटांत उंटाला पाणी मिळत नाहीं म्हणून प्रवास सुरू करायच्या आधीं तो तें भरपूर पिऊन घेतो म्हणे ! मीही तेंच करतोंय्. जें सुख पुष्कळ दिवस मिळणार नाहीं तें—' अभयनें एखाद्या लहान मुलाप्रमाणें स्निग्धतेनें आपलें मस्तक आक्काच्या मांडीवर घांसलें. तो स्पर्श तिला सांगत होता—अभय तुझाच आहे. लगेच त्यानें डोकें वर उचलून आक्काकडे पाहिलें. त्याची दृष्टि म्हणत होती—अभय तुझा एकट्याचा नाहीं.

× × × ×

रात्रभर बहीण भावंडें तळमळत होतीं. पहांटेच्या गार वाऱ्यानें त्यांचा डोळा लागला. पण त्यांना घटकाभरसुद्धां गाढ झोंप लागली नाहीं. पलीकडच्या बिऱ्हाडांत चारु मोठमोठ्यानें रडत आहे असें वाटून दोघेंही जागीं झालीं. चारु ' आई, आई ' म्हणून ओरडत होता.

अभय धांवतच गेला. कावेरीच्या बिऱ्हाडाचें पुढचें दार उघडेंच होतें. आंत जाऊन त्यानें दिवा लावला. अंधारांत जागा झालेला चारु अगदीं भिऊन

गेला होता. अभयनें त्याला घट्ट पोटाशीं धरलें. चारूला खांद्यावर घेऊन त्यानें सारें घर शोधलें. कावेरीचा कुठेंच पत्ता नव्हता! अभय मनांत चरकला.

तो पुन्हां चारूच्या अंथरुणापाशीं आला तेव्हां उशाजवळ एक पत्र व्यवस्थित ठेवलेलें त्याला दिसलें. त्यानें वर नांव पाहिलें—'प्रिय बंधु अभय यांस.'

पत्रांत लिहिलें होतें—

'भर मध्यरात्रीं घर सोडून, मूल सोडून, मी निघून जात आहे. मी जीव द्यायला जात नाहीं. मी जगणार आहे, माझ्या पोटांतल्या निष्पाप जीवालाही मी जगविणार आहे.

अभय, काल तुमचं नि आक्कांचं बोलणं मी चोरून ऐकलं. क्षमा करा मला. तुम्ही ही धोंड गळ्यांत बांधून घ्यायला तयार झालांत हा तुमचा उदारपणा! पण मला वाटायला लागलं—जिथं आक्कासारख्या प्रेमळ स्त्रीलासुद्धां अभयांनीं कावेरीला बहीण मानणं खपत नाहीं, तिथं समाज त्यांना फाडून खाल्ल्याशिवाय राहणार नाहीं. अभय फार मोठे आहेत. एका कावेरीचं रक्षण करण्याच्या कामांत त्यांची सगळी शक्ति खर्च होणं बरं नाहीं. या जगांत कावेरीसारख्या हजारों, लाखों दुर्दैवी बायका असतील. त्यांचं दुःख हलकं करायला, असल्या अभागी कावेरी निर्माणच होऊं नयेत असं कांहींतरी करायला, त्यांची जरुरी आहे.

अभय, अलीकडे तुम्ही प्रमिलेला जीं पत्रं पाठवीत होतां तीं सारीं मला वाचायला मिळालीं. त्या पत्रांनीं किती धीर आला मला! त्या धीराच्या बळावरच मी आज घराबाहेर पडत आहे.

माझी चौकशी करूं नका. माझ्यासाठीं तुमचा बळी मी कधींही देणार नाहीं. कधींतरी मी तुमच्या पायांवर डोकं ठेवायला, माझ्या चारूचा गोडगोड मुका घ्यायला येईन. चारूची मला

मुलींच काळजी नाहीं, तुम्हीं माझ्यापेक्षांहि अधिक मायेनं त्याला संभाळाल—

अभय, कावेरी मोहाला बळी पडली म्हणून तुम्ही तिच्यावर रागावलां नाहीं ना ? त्या मोतिरामानं पुनर्विवाहाचं आमिष दाखवलं—नाहींतर—किती दुबळा आहे तो ! ' मुंबईला नेऊन तुला मोकळी करतों ' म्हणून सांगत होता मेला मला !

हातांतलीं चार कांकणं नि मामंजींनीं लिहून ठेवलेले स्वतःच्या चरित्राचे कागद एवढें मी बरोबर घेऊन जात आहे. त्या कागदांतला पहिला कागद कुठंतरी हरवला. पण बाकीच्या कागदांनीं मला किती किती गोष्टी शिकविल्या. त्या कागदांत लिहिलं आहे तेंच जर मोकळेपणानं मामंजींनीं मला सांगितलं असतं तर——

' हा तुझ्या आईच्या मुका ' म्हणून दररोज चारूचा एक पापा घेत चला हं !

तुमची दुर्दैवी बहीण

कावेरी '

* * * *

अभयनें हें पत्र आक्काला वाचायला दिलें. पत्र वाचून होतांच आक्का उद्गारली ' जगांत दुःख फार आहे हेंच खरं ! '

' म्हणूनच तें कमी करण्याची धडपड प्रत्येकानं करायला हवी ! '

आक्का कांहींच बोलली नाहीं. अभय हंसत म्हणाला ' आतां कांहीं तुला पंढरपूरला जातां यायचं नाहीं ! '

' कां ? '

' तुझा देव इथंच आहे कीं ! '

' कुठं ? '

अभयनें चारूकडे बोट दाखविलें. आक्का एक सुस्कारा सोडून म्हणाली ' या मोहांत पुन्हां मला कशाला गुंतवितोस बाबा ? चारू मोठा झाला कीं तोही तुझ्यासारखा आपल्या देवाची पूजा करायला कुठंतरी निघून जाईल ! '

प्रमिला मोठी लाघवी पोरगी आहे, तिची गांठ पडली तर ती आपल्याला पंढरपूरला जाऊं देणार नाहीं, या कल्पनेनें आक्कानें तिला सुद्धां न भेटतां निघून जायचें ठरविलें. दुपारीं अभय पोस्टांतले सर्व पैसे काढून तिच्या हवालीं करणार होता. पण ' पैसे काय पोस्टानं येतील ' असें म्हणून तिनें अगदीं पहिली गाडी गांठली.

आक्काची गाडी सुटल्यावर चारूला घेऊन स्टेशनाबाहेर पडतां पडतां अभयनें सहज एक वर्तमानपत्र विकत घेतलें. त्यांत ठळक अक्षरांत बातमी छापली होती—

## अभिनंदनीय विवाह.

**सुप्रसिद्ध चित्रपटतारका कल्पलता आणि प्रख्यात दिग्दर्शक एफ्. सूर्यराव यांचा विवाह काल सायंकाळीं वैदिक पद्धतीनें साजरा करण्यांत आला.**

टांग्यांत येऊन बसल्यावर चारु टांगेवाल्याचें चाबूक मारण्याचें कौशल्य पाहण्यांत दंग झाला. पण अभयला मात्र राहून राहून कल्पलतेची आठवण होत होती. कोंपऱ्यावरल्या एका हॉटेलांत लावलेल्या ग्रामोफोनमधून गाणें ऐकूं येऊं लागलें—

**प्रेमवेडी बालिका**
**करुणा न ये काय कांता ?**
**बघतां किती अंत आतां**
**प्रेमवेडी बालिका—वेडी बालिका—**

हें गाणें ऐकून अभय स्वतःशींच हंसला.

× × × ×

तो घरीं येऊन पाहतो तों ज्योतीचें पत्र त्याच्या खेडेगांवांतल्या पत्त्यावर जाऊन इकडे आलें होतें. पत्र अगदींच त्रोटक होतें. पण विजेच्या लहानशा धक्क्यानेंसुद्धां मनुष्य बेशुद्ध होतो, त्याप्रमाणें तें वाचून अभय सुन्न झाला. ज्योतीनें लिहिलें होतें—

प्रिय अभय,

नरेंद्राला रक्तक्षय झाला आहे असं डॉक्टरांच्या तपासणींत ठरलं. त्याच्या दुखण्याइतकंच दुसरं दुःख म्हणजे त्याचं काम मला पूर्वींसारखं करतां येत नाहीं हें आहे. कारण—मी अगदीं निर्लज्ज आहे असं मला वाटत होतं. पण हें लिहितांना मला अनुभवानं कळतंय् कीं स्त्रीच्या मनांतली लज्जेची वेल कधींतरी फुलल्याशिवाय राहत नाहीं.

मी आई होणार आहे. किती आनंदाची गोष्ट! पण ती जेवढी आनंदाची तेवढीच दुःखाची गोष्ट आहे. नरेंद्राचं काम एक-सारखं सुरू रहायला हवं! कार्य बंद पडलं तर औषधानंसुद्धां त्याला गुण येणार नाहीं.

आईचं कर्तव्य करूं कीं पत्नीचं कर्तव्य करूं? अभय, गेलीं दहा वर्षं माझं मन मुलासाठीं आसावलं आहे, माझं शरीर मूल पोटाशीं धरल्यावर अंगावर जे आनंदाचे रोमांच उभे राहतील त्याची वाट पहात आहे. पण—खेडेगांवांतलं एखादं जहाल औषध घेतलं तर मी आई होणार नाहीं. पण—

तुझी
**ज्योति**'

× × × ×

दारांत प्रमिला दिसतांच अभयनें पत्र बाजूला ठेवून तिचें स्वागत केलें. अभयला नमस्कार करीत तीं म्हणाली ' आलांत तें एका शब्दानं तरी कळवायचं कीं नाहीं ? अगदीं दुरूनच नमस्कार करायला हवा तुम्हांला ! '

' फारच दुरून करावा लागेल आतां ! '

' म्हणजे ? '

' आजच्या आज कानपूरला गेलं पाहिजे मला ! '

' त्या ज्योतीला भेटायला ? '

' हं ! '

प्रमिला कांहींतरी थट्टा करणार होती. पण अभयनें दिलेलें पत्र वाचतांच ती गंभीर झाली.

ती म्हणाली ' जा ना ! आक्कांची काळजी करूं नका ! '

' तिची काळजी पांडुरंग करणार आहे ! '

प्रमिला पाहतच राहिली.

अभय खिन्नपणानें हंसून म्हणाला—

' ती पंढरपुरला निघून गेली ! '

प्रमिलेच्या गोंधळलेल्या चेहऱ्याकडे पाहत अभय म्हणाला ' चारूचं काय करायचं हा प्रश्न पडलाय् मला ! '

' मी आहे ना ! '

' नुसतं असून चालणार नाहीं ! '

' मग ? '

' त्याची आई व्हायला हवं तुला ! कावेरीही कुठं निघून गेली आहे ! '

× × ×

आक्का आणि कावेरी यांच्या आकस्मिक निघून जाण्यानें मनाचा झालेला गोंधळ प्रमिलेनें इतक्या लौकर लपविला कीं अभयला तिच्या या वृत्तीचें कौतुक वाटलें. आपल्या आईबापांचे आणि धाकट्या बहिणीचे हाल होऊं नयेत म्हणून तिनें सध्यां शिकवण्या पतकरल्या आहेत हें कळतांच त्या कौतुकाचें रूपांतर आदरांत झालें.

एका दिवसांत अभयनें जाण्याची सर्व तयारी केली. घराचें काय करा-यचें हाच काय तो त्याच्यापुढें प्रश्न पडला होता. तो प्रमिलेनें चटकन् सोडविला. ती म्हणाली ' माला दोघी बहिणींना घेऊन जाणार आहे. तेव्हां आम्हांलासुद्धां आतां मोठं घर नकोय् ! आम्हींच येऊं इथं रहायला ! मोठ्या माणसांच्या घरांत राहिलें कीं मींही मोठी होईन ! '

अभयनें तिच्याकडे पाहिलें. तिच्या डोळ्यांतून आदर ओसंडून वाहत होता. त्यानें पुन्हां पाहिलें. त्याच्या मनांत आलें--आदराच्या दृष्टींत कोवळें ऊन असतें. पण प्रमिलेच्या डोळ्यांत तर चांदणें फुललें आहे. हा नुसता आदर नव्हे ! हें--

तो म्हणाला ' तुला बक्षिस द्यायचं राहिलंय अजून ? इथं देऊं कीं कानपूर-हून पाठवूं ? '

' तिथं चांगले फोटोग्राफर आहेत कां ? '

' कां ? '

' मला तुमचा फोटो हवा आहे ! '

विलक्षण घाई असूनही अभयनें त्या दिवशीं आपला फोटो काढून घेतला.

\+ \+ \+ \+

आपल्याच गाडीनें कांचन, माला आणि मालेच्या बहिणी कानपूरला जात आहेत या योगायोगाचें अभयला नवल वाटलें. लगेच त्याच्या मनांत एक विचित्र कल्पना येऊन गेली. जीवनांत जन्मापासूनच योगायोगाला सुरवात होते.

ज्या आईबापाच्या पोटीं आपण जन्माला येतों ते सुद्धां योगायोगानेंच आपल्याला मिळालेले असतात !

त्यानें आकाशाकडे पाहिलें. पांढऱ्या ढगांना काळसर रंग येऊं लागला होता. त्याला वाटलें—देवदत्त, लता, लतेची आई, मोतिराम यांच्यासारखीं दुबळीं आणि दत्तोपंत, आपली आक्का, कावेरी, इत्यादि कणखर माणसें ज्या पांढर-पेशेपणाच्या पाशांत सांपडलीं होतीं, त्यांतून आपण आज मुक्त होत आहों. आज आपला पुनर्जन्म होत आहे.

चारू त्याचे हात धरून नाचत म्हणाला

' अभय दादा, तुम्ही शिकाल करून वाघ आनणाल ना ? '

' हो ! ' अभय हंसत म्हणाला.

गाडी सुटायची वेळ झाली होती. प्रमिला किंचित् कंपित स्वरानें म्हणाली ' मीही एक बक्षिस देणार आहे तुम्हांला ! '

' काय ? '

तिनें आपल्या वेणींतले गुलाबाचे ताजें फूल त्याच्या कोटाला लावलें. लगेच ती मालेच्या डब्याकडे धांवत गेली.

गाडी सुटायच्या वेळीं ती परत आली. अभय डब्यांत चढत होता. तिनें त्याच्या पायांना हात लावून त्याला वंदन केलें आणि लगेच तो हात पूज्य भावानें आपल्या मस्तकाला लावला.

समाप्त.

# खांडेकर वाङ्मय.

## ( आगामी )

| | |
|---|---|
| सुखाचा शोध— | ( हंस पिक्चर्सच्या आगामी बोलपटाची कादंबरी )<br>प्रकाशन—ऑगस्ट १९३९<br>किं. १ रु. |
| सायंकाल— | ( अठरा लघुनिबंधांचा संग्रह )<br>प्रकाशन—ऑक्टोबर १९३९ |
| चार भिंती— | ( कादंबरी )<br>वीणा-प्रकाशन—डिसेंबर १९३९ |
| पहिली लाट— | ( लघुकथा )<br>वीणाप्रकाशन जानेवारी १९४० |
| छाया— | ( कादंबरी )<br>प्रकाशन—फेब्रुवारी १९४० |
| वर्षाकाल— | ( पांढरे ढग या कादंबरींतील नायक नायिकांचा पुढ इतिहास )<br>वीणा-प्रकाशन—जुलै १९४० |

# वीणाप्रकाशनाचीं प्रसिद्ध पुस्तकें



(१) समरभूमि ... ... प्रो. ना. सी. फडके.
कि. १॥ रु.

(२) स्वैरविचार ... ... श्री. ग. त्र्यं. माडखोलकर
किं. १॥ रु.

(३) दोन मनें ... ... श्री. वि. स. खांडेकर
किं. २ रु.

(४) कांता ... ... श्री. ग. त्र्यं. माडखोलकर
किं. २ रु.

(५) आविष्कार ... ... गीता साने
किं. १॥ रु.

(६) हेमलता ... ... श्री. द्वा. वा. घाटे
किं. १ रु.

(७) पांढरे ढग ... ... श्री. वि. स. खांडेकर
किं. २ रु.

(८) निष्कलंक ... ... कु. कमल दीक्षित एम्. ए.
१५ ऑगष्ट १९३९

(९) उषःप्रभा ... ... श्री. मांजरेकर

एक रुपया प्रवेश-फी भरून वीणाप्रकाशनाचे कायम ग्राहक झाल्यास सर्व पुस्तकें पाऊणपट किंमतींत मिळतील. प्रत्येक पुस्तक घेतलेंच पाहिजे असें बंधन नाहीं.

# खांडेकर वाङ्मय

## कथासंग्रह

नवमल्लिका
दत्तक व इतर गोष्टी
ऊन-पाऊस
विद्युत्प्रकाश
जीवनकला

दंव-बिंदु
पूजन
अबोली
नवचंद्रिका
फुलें आणि दगड

पाकळ्या ( दुसरी आवृत्ति )
नवा प्रातःकाल

## बोलपट

छाया
ज्वाला
देवता
सुखाचा शोध
पहिलें चुंबन
अमृत

## कादंबऱ्या

हृदयाची हांक
कांचनमृग
उल्का ( २ री आवृत्ति )
दोन ध्रुव ( ,, )
हिरवा चांफा ( २ री आवृत्ति लवकरच प्रसिद्ध होईल. )
दोन मनें वीणा-प्रकाशन
रिकामा देव्हारा
पांढरे ढग

## लघुनिबंध

वायु लहरी ( २ री आवृत्ति लवकरच प्रसिद्ध होईल. )

चांदण्यांत

## इतर

गडकरी (व्यक्ति आणि वाङ्मय)
वनभोजन ( टीका )
आगरकर ( चरित्र )
रंकाचें राज्य ( नाटक )

